स्वल्प किंमतींची सुलभ-पुराण-ग्रंथमाला.
पुस्तक ८ वें.

# स्कंदपुराण.

## भाग चौथा.

लेखक
शास्त्री नरहर रावजी जोगळेकर.



प्रकाशक
दामोदर सांवळाराम आणि मंडळी,
जनरल प्रिंटर्स, पब्लिशर्स व एजंटस्, इत्यादि ठाकुरद्वाररोड—मुंबई, २.

सन १९२१ इसवी.



किंमत दीड रुपया.

# प्रस्तावना.

नारायणं नमस्कृत्य नरं चैव नरोत्तमम् ।
देवीं सरस्वतीं व्यासं ततो जयमुदीरयेत् ॥ १ ॥

स्कंदपुराणाचा हा चवथा व शेवटचा भाग आज वाचकांच्या सेवेंत सादर करीत आहोंत. कित्येक अपरिहार्य अडचणीमुळें हें स्कंदपुराण पूर्ण होण्यास कल्पनेबाहेर वेळ लागला; व त्यामुळें पुराणग्रंथमालेच्या वाचकांस दीर्घ काल तिष्ठत बसावें लागलें, याबद्दल आह्मी दिलगीर आहोंत; परंतु गेल्या पांच सहा वर्षांतील परिस्थिति ज्यांच्या लक्षांत आली असेल, ते सुज्ञ वाचक या दिरंगाईबद्दल आह्मांस दोष देणार नाहींत, अशी आशा आहे.

लौकिकांत असलेल्या अठरा पुराणांमध्यें पद्मपुराण, मत्स्यपुराण व स्कंदपुराण हीं पुराणें विशेष मोठीं आहेत; आणि हीं तिन्हीं पुराणें परमेश्वरकृपेनें आमच्या हातून शेवटास गेलीं आहेत. पैकीं मत्स्यपुराण एकाच भागांत पूर्ण केलें असून पद्मपुराण दोन भागांत पूर्ण केलें आहे; परंतु स्कंद पुराणाचे चार भाग करावे लागले आहेत. याशिवाय उपपुराणापैकीं गणेशपुराणही एक भागांत प्रसिद्ध केलें आहे.

ह्या पुराणाच्या प्रसाराला आरंभ स्कंदापासून झाला; म्हणून ह्याचें नांव स्कंद पुराण असें प्रसिद्ध झालें. ह्या पुराणांत ७ खंडें असून त्या सर्वांचें मिळून १८३० अध्याय आहेत. ह्या पुराणांत विशेषतः शंकरासंबंधीच्या कथा आल्या आहेत. कांहीं कांहीं भाग विष्णुप्रमुख देवतांच्या कथांनींही भरला आहे; परंतु ह्या विष्णुकथा वैष्णवखंड व प्रभासखंड ह्या दोन खंडांतच आढळतात. प्रभासखंड हें ह्या पुराणांतील शेवटचें सातवें खंड होय. ह्या प्रभासखंडाच्या अन्तर्गत चार खंडें असून त्या सर्वांचे मिळून एकंदर ४९१ अध्याय आहेत. तीं चार अन्तर्गत खंडें अनुक्रमें प्रभासक्षेत्रमाहात्म्य, वस्त्रापथक्षेत्रमाहात्म्य, अर्बुदाचलमाहात्म्य; व द्वारकामाहात्म्य अशीं आहेत. आतां ह्या चार खंडांतील कथांचा सारांश थोडक्यांत पुढीलप्रमाणें आहे.

**प्रभासक्षेत्रमाहात्म्यः**—ह्या पहिल्या खंडांत एकंदर अध्याय २६५ आहेत. ह्यांत प्रभास नांवाचें जें प्रसिद्ध क्षेत्र आहे; व ज्यास प्रचार ह्लीं प्रभासपाटण म्हणतात, त्या क्षेत्रांत अनेक ऋषींनीं पूर्वी

व शिवलिंगें ह्यांची स्थापना केली आहे. एकादश रुद्र, बारा आदित्य; व आठ वसु यांनींहि ह्या ठिकाणीं आपल्या नावानें तीर्थें निर्माण करून शिवपूजन केलें आहे. ह्या प्रभासक्षेत्रीं तेहत्तीस कोटी तीर्थें व शिवलिंगें नेहमीं रहातात; व त्यांच्या दर्शनानें व स्नानानें सर्व तीर्थांत स्नान केल्याचें फळ मिळतें, अशाप्रकारें ह्या प्रभासक्षेत्राचें माहात्म्य वर्णिलें आहे.

वस्त्रापथक्षेत्रमाहात्म्य:—हें क्षेत्रहि प्रभासपाटण क्षेत्राच्या जवळच आहे. ह्या भागाचे एकंदर अध्याय १९ आहेत. ह्यांत विष्णूनें वामन अवतार घेऊन बलिराजाला तीन पावलें भूमीची याचना करून तन्निमित्तानें पाताळांत ठेविलें; व इंद्राला इंद्रपद मिळवून दिलें, अशी कथा आहे; व अशाप्रमाणें दुसऱ्याहि कथा आहेत. ह्या क्षेत्रांत श्राद्ध केल्यानें पितरांना मुक्ति मिळतें, असें ह्या क्षेत्राचें माहात्म्य वर्णिलें आहे.

अर्बुदाचलमाहात्म्य: —प्रभासखंडांतील तिसऱ्या खंडाचे ६३ अध्याय असून त्यात अर्बुदाचल म्हणजे ज्याला आपण अबूचा पहाड म्हणतों, ( अबूरोड स्टेशनपासून हा पहाड ५–६ मैलावर आहेत. ) त्या पर्वतावर अनेक तीर्थें व शिवलिंगें असून व्यासतीर्थ, कोटीतीर्थ, चंद्रोद्भेदतीर्थ, चद्रप्रभास तीर्थ वगैरे २५ तीर्थांचीं माहात्म्यें व सिद्धेश्वर, गुहेश्वर, गंगेश्वर, पार्थेश्वर वगैरे ४१ शिवलिंगांचीं माहात्म्यें सांगितलीं आहेत.

द्वारकामाहात्म्य:—ह्या द्वारकामाहात्म्याचें एकंदर ४४ अध्याय आहेत. द्वारका क्षेत्र आबालवृद्धांस माहीत आहेच. ह्या द्वारकेंत श्रीकृष्ण, बळराम, अनिरुद्ध, प्रद्युम्न, इतर यादव, रुक्मिणीप्रमुख अष्टनायका व दुसऱ्या श्रीकृष्णाच्या १६१०० स्त्रिया, दुर्वासादि ऋषि, या सर्वांनीं आपआपल्या नांवानें तीर्थ निर्माण केलें आहे. द्वारकेंत गोमतीनदीचें माहात्म्य इतर गंगादि नद्यांहून श्रेष्ठ आहे, असें वर्णन आहे. दुर्वास ऋषि अति क्रोधी असतांही त्याची गोमतीसंगमाचे ठिकाणीं कशी फजिती झाली आहे, ही कथा इतर कोणत्याही पुराणांत दुर्लभ, अशी येथें दिली आहे. शेवटीं स्कंदपुराण अगर निदान द्वारकामाहात्म्य तरी पठण करणारास साहा महिन्याच्या आंत पुत्रप्राप्ती होतें, अशी फलश्रुति सांगून ग्रंथाचा उपसंहार केला आहे.

नरहर रावजी शास्त्री जोगळेकर.

---

# विषयानुक्रमणिका.

## प्रभासखण्ड ७

### ( प्रभासक्षेत्रमाहात्म्य १ ).

॥ इति प्रभासखंडे प्रभासक्षेत्रमाहात्म्यम् ॥ ७–१ ॥

---

## प्रभासखंड ७

### ( वस्त्रापथक्षेत्रमाहात्म्य २. )

॥ इति प्रभासखंडे अर्बुदखंडं समाप्तम् ॥ ७ ॥ ३ ॥

---

## प्रभासखंड ७

### ( द्वारकामाहात्म्य ४. )



॥ इति प्रभासखंडे द्वारकामाहात्म्यम् ॥ ७ ॥

---

॥ स्कंदपुराण प्रभासखंड अनुक्रमणिका समाप्ता: ॥

---

# स्कंदपुराण.

## भाग चवथा.

## प्रभासखंड ७.

## ( प्रभासक्षेत्रमाहात्म्य १ ).

### अध्याय १ ला.

### ग्रंथारंभ.

यश्चाद्यः पुरुषः पुराण इति यः संस्तूयते सर्वतः
सोमेशः सुरसंयुतः क्षितितले यैर्वीक्षितो ह्रीक्षणैः ॥
ते तीर्त्वा विततान्तरं भवभयं भूत्याभिसंभूषिताः
स्वर्गं यानवरैः प्रयान्ति सुकृतैर्यज्ञैर्यथा यज्विनः ॥ १ ॥

ज्या पुराणपुरुषाची सर्वप्रकारें स्तुति केली जाते, जे संतजन देवांसह बसलेल्या शंकराला पृथ्वीतलावर अवलोकन करून मुक्त होतात; जे शिवभक्त ज्याच्या कृपेनें अंगाला भस्म लावून संसारसमुद्रापासून तरून जातात; व ज्या पुण्यपुरुषांनीं यज्ञयागादि सत्कृत्यांनीं ज्याला संतुष्ट करून, शिवविमानांत बसून शिवलोकीं प्रयाण केलें; त्या श्रीशंकराला नमस्कार करून, मी हें प्रभासक्षेत्रमाहात्म्य सांगण्याला यथाशक्ति प्रारंभ करितों.

एकदां नैमिषारण्यांत पुराणें श्रवण करण्याच्या इच्छेनें शौनकादि ऋषि बसले असतां, त्या ठिकाणीं प्राप्त झालेल्या सूतांना ते ऋषि सत्कारपूर्वक प्रश्न करितात कीं, हे सूत ! आपण मला प्रभासक्षेत्राचें माहात्म्य सांगा. नंतर सूत प्रथमतः व्यासांना साष्टांग नमस्कार घालून, कथा सांगण्याला प्रारंभ करितात. सूत म्हणतात, अहो शौनकादि ऋषिहो ! तुमचा हा प्रश्न ऐकून मला फारच आनंद

झाला आहे; करितां मी तुम्हांला प्रभासक्षेत्राचें माहात्म्य सांगतों, ऐका. जसा तुम्ही मला आज प्रश्न केलात असाच पूर्वी पार्वतीनें शंकराला प्रश्न केला होता; व त्यामुळें शंकरानें पार्वतीला जें प्रभासक्षेत्रमाहात्म्य सांगितलें; व नंतर पार्वतीनें स्कंदाला ( कार्तिकस्वामीला ), स्कंदानें नंदीला, नंदीनें सनकादि मुनींना, सनकादिकांनीं व्यासाला; व व्यासानें मला ह्याप्रमाणें परंपरागत प्राप्त झालेलें जें प्रभासक्षेत्रमाहात्म्य तेंच मी आतां तुह्माला सांगतों; श्रवण करा.

---

# अध्याय २ रा.

## पुराणसंख्यावर्णन.

सूत म्हणतात; शौनकादि ऋषिहो ! आतां तुम्हाला प्रथम पुराणें किती आहेत व त्यांची संख्या किती हें सांगतों. पूर्वी एकदां ब्रह्मदेवानें तपश्चर्येला प्रारंभ केला असतां साहा अंगांसह सर्व वेद ब्रह्मदेवाजवळ प्रगट झाले. त्यानंतर सर्व शास्त्रें व पुराणें निर्माण झालीं. एकंदर शास्त्रीय शब्दजालाची संख्या शंभर कोटी आहे. ब्रह्मदेवाच्या मुखापासून जीं पुराणें निर्माण झालीं तीं अनुक्रमें ब्रह्म, पद्म, विष्णु, शैव, भागवत, भविष्य, नारद, मार्कंण्डेय, अग्नि, ब्रह्मवैवर्त, लिंग, वाराह, स्कंद, वामन, कूर्म, मत्स्य, गरुड व वायु हीं अठरा महापुराणें होत. पूर्वी ब्रह्माण्डपुराण हें एकटेंच शंभर कोटी श्लोकांनीं युक्त होतें. त्या एका पुराणाचे व्यासानें हे अठरा भाग पाडिले. ह्या अठरा महापुराणाहून आणखी दुसरीं अठरा उपपुराणें आहेत. तीं अनुक्रमें सनत्कुमारसंहिता, नारसिंहपुराण, स्कंदपुराण, शिवधर्मपुराण, दुर्वासपुराण, नारदपुराण, कपिलपुराण, उशनसपुराण, मानवपुराण, ब्रह्माण्डपुराण, वरुणपुराण, कालिकापुराण, माहेश्वरपुराण, सांबपुराण, सौरपुराण, पराशरपुराण, मारीचपुराण व भार्गवपुराण हीं उपपुराणें होत. पूर्वींची जरी पुराणसंख्या शंभर कोटी असली, तरीसुद्धां व्यासांनीं लोकहितार्थ त्यांचा संक्षेप करून चार लक्षपर्यंत अठरा महापुराणांची संख्या निश्चित ठरविली आहे. हल्लींसुद्धां देवलोकामध्यें शंभरकोटि संख्येचें ब्रह्माण्डपुराण अस्तित्वांत आहे. आतां अठरापुराणांची संख्या वेगवेगळी सांगतों. ब्रह्मपुराण दहा हजार, पद्मपुराण पंचावन हजार, विष्णुपुराण तेवीस हजार, वायुपुराण चोवीस हजार, भागवतपुराण अठरा हजार, नारदपुराण पंचवीस हजार, मार्कण्डेयपुराण नऊ हजार, अग्निपुराण सोळा हजार, भविष्यपुराण चौदा हजार पांचशें, ब्रह्मवैवर्तपुराण, अठरा हजार, लिंगपुराण अकरा हजार, वराहपुराण चोवीस हजार, स्कंद-

पुराण एक्यांयशी हजार एकशें, वामनपुराण दहा हजार, कूर्मपुराण सतरा हजार, मत्स्यपुराण चौदा हजार, गरुडपुराण एकोणीस हजार, ब्रह्माण्डपुराण बारा हजार दोनशें, ह्याप्रमाणें अठरा महापुराणांची श्लोकसंख्या चार लक्ष आहे. पुराणांमध्यें, ब्रह्मदेव, विष्णु व शंकर ह्यांचीं माहात्म्यें वर्णिलीं असून सूर्यवंश, चंद्रवंश, मन्वन्तरें, ईश्वरावतार, अनेक राजांचीं चरित्रेंहि वर्णिलीं असतात. ह्या अठरा महापुराणांचें पठन करून ब्राम्हणांना ग्रन्थदान करणारे त्रैलोक्यांत धन्य होऊन मुक्त होतात. हें पुराणवर्णन कीर्ति, धन, धान्य व ऐश्वर्य देणारें आहे.

## अध्याय ३ रा.

### प्रभासक्षेत्रविस्तार.

एकदां शंकर पार्वतीसह कैलासपर्वतावर बसले असतां व त्याठिकाणीं शिवगण व इंद्रादि देव शंकराची स्तुति करीत असतां पार्वतीला आनंद होऊन तिनें शंकराची स्तुति केली; व प्रार्थना केली कीं, आपल्या मुखानें प्रभासादि क्षेत्राचें माहात्म्य श्रवण करावें, असा माझा मानस आहे. असा पार्वतीचा प्रश्न ऐकून शंकर म्हणतात; पार्वती! तुझा हा सर्वोत्कृष्ट प्रश्न ऐकून मला फार आनंद झाला आहे; करितां मी तुला प्रभासादि क्षेत्राचें माहात्म्य सांगतों; श्रवण कर. त्रैलोक्यांत असणारीं जीं साडेतीन कोटी तीर्थें तीं सर्व ह्या प्रभासक्षेत्रांत राहत असतात. प्रभासक्षेत्र मला फारच प्रिय आहे. मी ह्या क्षेत्राचें माहात्म्य आजपर्यंत गुप्त ठेविलें होतें; तथापि तुझा माझा फारच प्रेमसंबंध असल्यामुळें तें मी तुला आज उघड करून सांगतों. प्रभासक्षेत्रांत असणाऱ्या सोमेश्वरलिंगापासून सर्व जगताची उत्पत्ति झाली. मी आजपर्यंत हें स्थानमाहात्म्य गुप्त ठेविलें होतें ह्याचें कारण कलियुगांत पुढें पापी लोक ह्या स्थानाला भ्रष्ट करितील; व त्यामुळें ह्या स्थानाला कमीपणा व अशौचत्व प्राप्त होईल. हें क्षेत्र कलियुगांत तर फारच अत्युत्कट फल देणारें आहे. ह्या प्रभासक्षेत्राचा विस्तार अठ्ठेचाळीस कोस औरसचौरस असून त्यांत अनंत तीर्थें व शिवलिंगें आहेत.

## अध्याय ४ था.

### प्रभासप्रमाण.

पार्वतीनें शंकराला प्रभासक्षेत्राचें माहात्म्य विचारिलें असतां शंकर म्हणतात; हे प्रिये! सर्व क्षेत्रांमध्यें प्रभासक्षेत्र श्रेष्ठ आहे. प्रभासक्षेत्रांत स्नानादि कृत्यें

केलीं असतां उत्तम सिद्धि व गति प्राप्त होते. त्या क्षेत्राचा विस्तार अठ्ठेचाळीस कोस आहे. ह्या क्षेत्राच्या पूर्वेस तप्तोदक स्वामीचा मठ आहे; पश्चिमेस माधव-क्षेत्र आहे; दक्षिणेस समुद्र आहे; व उत्तरेस भद्रा नांवाची नदी आहे. अशी ह्या प्रभासक्षेत्राची चतुःसीमा आहे. ह्या अठ्ठेचाळीस कोस प्रमाणाच्या क्षेत्रांत वीस कोस प्रमाणाची एक पीठिका ( स्थान ) आहे. त्या पीठिकेच्या पूर्वेस न्यंकुमुनितीर्थ आहे; पश्चिमेस वज्रिणीतीर्थ आहे; दक्षिणेला माहेश्वरीस्थान आहे व उत्तरेला समुद्र आहे. त्याचप्रमाणें प्रभासक्षेत्रांत गर्भगृह नांवाचें दुसरें एक स्थान आहे. तें मला फारच प्रिय आहे. प्रभासांत राहणारे ब्राह्मण नियमबद्ध असून ते नित्य रुद्रसूक्ताचा जप करीत असतात. ह्या क्षेत्राचे तीन भाग आहेत, त्यांपैकीं वैष्णव भागांत एक कोटि तीर्थें आहेत. दीड कोटि तीर्थें रौद्र भागांस आहेत व ब्राह्म भागांत एक कोटि मिळून एकंदर साडेतीन कोटि तीर्थें प्रभासक्षेत्रांत आहेत. प्रथम रौद्रतीर्थांची यात्रा करावी; नंतर वैष्णव व नंतर ब्राह्मतीर्थांकडे जावें. ब्राह्मभागांत इच्छाशक्ति, वैष्णवभागांत क्रियाशक्ति व रौद्र-भागांत ज्ञानशक्ति; अशातऱ्हेनें ह्या क्षेत्रांत तीन शक्ति आहेत. प्रभासक्षेत्रांत जाणारा पुरुष मुक्त होतो ह्यांत संशय नाहीं. ह्या क्षेत्रांत स्वतः शंकर राहत असतात. शेंकडों जन्म जरी घेतले तरी प्रभासक्षेत्रांत येऊन शंकराचें पूजन केल्याशिवाय कधींहि कोणाला मुक्ति मिळावयाची नाहीं. प्रभासक्षेत्रांत मृत होणारा पुरुष कधींहि नरकाला जात नाहीं. मी स्वतः भैरव ( भयंकर ) रूप धारण करून सर्व भक्तांचीं पातकें नाहिंशीं करितों; व ह्या क्षेत्रांत तशा स्वरूपानें राहतों; म्हणून मला लोक भैरव म्हणतात. ह्या प्रभासक्षेत्रांच्या रक्षणाकरितां पूर्वेस शंभर कोटि शिवगण, दक्षिणेस विघ्नेश, पश्चिमेस महाबल, चण्डीश, शंकु-कर्ण, घंटाकर्ण, गोमुख, विनायक, महानाद, काकवक्र, दुंदुभि, तालजंघ, भूमि-दंड, चंड, तालचण्ड वगैरे गण आहेत; व उत्तरेस दण्डपाणी. ह्याप्रमाणें गणांची योजना केली आहे. सात लोकांत राहणारे सिद्ध पुरुष, तसेंच लाकुलि, भारमूर्ति, आषाढि, दण्ड, पुष्कर, नैमिष, अमरेश, भैरव, काल, केदार वगैरे तीर्थें ह्या सोमेश्वराच्या दर्शनाकरितां नित्य येत असल्यामुळें ह्या प्रवासक्षेत्राचें माहात्म्य अवर्णनीय आहे. प्रभासक्षेत्रांत असणाऱ्या सोमेश्वराचें दर्शन अमावास्येला घेत-ल्यास त्यास कोटियज्ञाचें फल मिळून; तो पापमुक्त होऊन शिवलोक प्राप्त होतो.

---

# अध्याय ५ वा.

## क्षेत्रस्थ ऋषि व देव.

शंकर म्हणतात,–प्रिये! ह्या प्रभासक्षेत्रांत मार्कण्डेयऋषी तपश्चर्या करून तृप्त होता झाला. दूर्वासा ह्या ठिकाणीं सतत वास्तव्य करून, सोमेश्वराची आराधना करितो. त्याचप्रमाणें भारद्वाज, मरीचि, उद्दालक, क्रतु, वसिष्ठ, कश्यप, भृगु, दक्ष, सावर्णि, यम, अंगिरा, शुक, विभांडक, ऋष्यशृंग, गोभिल, गौतम, ऋचीक, अगस्त्य, शौनक, नारद, जमदग्नि, विश्वामित्र, लोमेश, त्याप्रमाणें दुसरेहि अनेक ऋषि ह्या प्रभासक्षेत्रांत राहून सोमेश्वराची आराधना करितात. मीहि ह्या क्षेत्रांत सतत राहतों; ह्या तीर्थांत साठ हजार याज्ञवल्क्यप्रमुख ऋषी रुद्रसूक्ताचा जप करीत राहतात. चाळीस हजार ब्रह्मचारी प्रभासक्षेत्रांत राहून, शतरुद्रियसूक्ताचा जप करितात; असें हें क्षेत्र फारच पुण्यकारक आहे. ह्या तीर्थांत व क्षेत्रांत इंद्रादि देव व गणसमुदाय भक्तिपुरःसर राहून आणि शिवाराधना करून कृतार्थ होता झाला. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य अथवा शूद्र कोणीहि असो; ह्या क्षेत्रांत मृत झाला असतां कैलासलोकाला प्राप्त होतो. मेरुपर्वत, सप्त द्वीपें, समुद्र, वगैरे मोठमोठ्या पुण्यपदार्थांचें गुणवर्णन करणें शक्य होईल; परंतु ह्या क्षेत्राचें वर्णन करणें फारच अशक्य आहे, करितां ह्या क्षेत्रांत एकदां तरी स्नान करून कृतार्थ व्हावें.

---

# अध्याय ६ वा.

## सोमेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; पार्वति! आतां सोमेश्वराचें माहात्म्य व स्वरूप सांगतों. प्रभासक्षेत्रांत जीं अनेक तीर्थें व लिंगें आहेत, त्या सर्वांमध्यें सोमेश्वरलिंग हें श्रेष्ठ आहे. सोमेश्वरलिंग मला अत्यंत प्रिय असल्यामुळें मी त्या ठिकाणीं पूर्णत्वानें वास करितों. ह्या लिंगाचें स्वरूप ॐकाराप्रमाणें असून त्यास पांच मुखें आहेत. हें लिंग सर्वव्यापी, शांत, स्थिर, त्रिगुणस्वरूप, आदिमध्यान्तरहित इत्यादि अनेक श्रेष्ठ गुणांनीं भूषित आहे. ह्या सोमेश्वराचें माहात्म्य वर्णन करणें ब्रम्हादि देवांना, फार तर काय साक्षात् हजार मुखाच्या शेषाला सुद्धां अशक्य आहे. ज्याला सदाशिव, अव्यक्त, हंस, नाद इत्यादि गुणांनीं ओळखतात, तोच

मी ह्या सोमेश्वराचें पूजन करणाराला सद्गति देतों. कोणताहि ब्राम्हण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र ह्या माहात्म्याचें श्रवण किंवा पठण करील तो सर्व दुष्कृतापासून मुक्त होऊन अंतीं शिवलोकाला प्राप्त होईल.

---

# अध्याय ७ वा.

## सोमेश्वरोत्पत्ति.

शंकर म्हणतात; पार्वति ! मी तुला सर्व सांगितलें आहे, त्यांतून तुला कांहीं शंका असल्यास विचार. पार्वति म्हणते भगवन् ! आपण तीर्थांचा व देवांचा प्रभाव वर्णन करतांना सोमेश्वराचें फारच माहात्म्य सांगितलें तरी त्याची केव्हां व कशी उत्पत्ति झाली व हें नांव त्यास कां पडलें हें सांगा. शिव म्हणाले पार्वति ! प्रत्येक मन्वन्तरांत ह्या लिंगाचें नांव बदलतें. ह्या सातव्या शतानन्द-नामक मन्वन्तरांत ह्याचें नांव सोमनाथ आहे. मागील सहाचीं नांवें अनुक्रमें मृत्युंजय, कालाग्नि, अमृतेभ, अनामय, कृत्तिवासा, व भैरवनाथ अशीं होतीं. पुढील मनूंत ह्याचें नांव प्राणनाथ हें होईल. हीं नांवें मी तुला संक्षेपानें सांगितलीं. पार्वती म्हणते देवाधिदेवा ! हीं आपण सांगितलेलीं नांवें मला कां स्मरत नाहींत. शंकर म्हणतात. प्रत्येक कल्पांत तुझा निरनिराळा अवतार होत असल्यानें तुला मागचें स्मरण रहात नाहीं. तुझीं नांवें गेल्या कल्पामध्यें जगन्माता, जगद्योनि, शांभवी, विश्वरूपा, नंदिनी, गणांबिका, विभूति, सुभूति, आनंदा, वामलोचना, वरारोहा, सुमंगला, महामाया, अनंता, भूतमाता, उत्तमा, सती व पार्वती अशीं आहेत. पार्वती म्हणाली प्रत्येक मन्वंतरांत चंद्रसूर्यादिक सर्वही बदलत असतां सोमनाथ हेंच नांव कायम कसें राहिलें. शंकर म्हणतात; समुद्र-मंथनांतून उत्पन्न झालेल्या चंद्रानें माझें आराधन केलें असतां प्रसन्न झालेल्या मजपासून चंद्रानें 'सोमनाथ' हें माझें नांव कायम राहण्याविषयीं वर मागितला, त्या योगानें हें नांव कायमचें राहिलें. पार्वती म्हणाली; हें तेजःपुंज लिंग ज्या क्षेत्रांत आहे, त्याचें आपण वर्णन करा. शंकर म्हणतात; बारा योजन विस्ताराचें प्रभास-नामक क्षेत्र आहे. त्यांत पांच योजनें क्षेत्रपीठ आहे. त्यांत देवमंदिर दोन कोस आहे. त्याच्या दक्षिणेस समुद्र, पश्चिमेस वज्रिणी व पूर्वेस न्यंकुमती नदी आहे. ह्या क्षेत्रांत जे प्राणी मरतात त्यांना मी शिवलोकाला नेतों. अन्य ठिकाणीं केलेल्या पापाचा ह्या क्षेत्रांत वास केल्यानें नाश होतो; परंतु येथें राहून मात्र पापाचरण करूं नये; कारण त्या पापाचें कोठेंही क्षालन होत नाहीं. हें

मी तुला सोमेश्वराचें माहात्म्य संक्षेपानें सांगितलें. तें सोमेश्वरमाहात्म्य अनंतकाल वर्णन केलें तरी ह्याचें सविस्तर वर्णन होणार नाहीं.

## अध्याय ८ वा.

### सोमेश्वराचें ऐश्वर्य.

ब्रह्मा, विष्णु, महेश्वर, ह्या ज्यांच्या देवता आहेत; अशा सोमेश्वराचें माहात्म्य मला सांगा? असा पार्वतीचा प्रश्न ऐकून शंकर म्हणाले, साठ हजार कोटी महातपस्वी ऋषी ह्या लिंगांत स्थित आहेत. सिद्धि, वृद्धि, तुष्टि, ऋद्धि, पुष्टि, कीर्ति, शांति व लक्ष्मी ह्या त्या लिंगांतूनच उत्पन्न झाल्या. सात कोटी मंत्र व सिद्धि, दिव्य अशा औषधी, रस,रसायनें, गारुड, भूतमंत्र, खेचरी व व्यंतर हे सर्व त्याच लिंगांतून उत्पन्न झाले. पुराक्रम, ग्रह, मुंड, गुडक, सहेतुक, विमल व दंडक हे सात कुत्सक; तसेच रुद्र, विप्र, दान, चंद्र, मंथ, अवलोकक; आणि सूर्यावलोकक हे सात गार्गेय; मूक शिव, प्रकाश, कपिल, खत्कुल, कर्णिकार, हे पौरुषेय हे सर्व ह्याच प्रभासक्षेत्रांत योगसिद्धि पावले. जे कांहीं ह्या क्षेत्रांत उपासक ब्राह्मण झाले, त्या सर्वांना सिद्धि लाभलेली आहे; व जे तपस्वी होतील त्या सर्वांना सिद्धि प्राप्त होईल. सर्वही रोगोपद्रव व पिशाच, राक्षस, बालग्रह ह्यांचे उपद्रव; आणि सर्पवृश्चिकादिक प्राण्यांची विषबाधा सोमनाथाच्या दर्शनानें शांत होते.

## अध्याय ९ वा.

### श्रीहरिस्थितिवर्णन.

प्रभासक्षेत्रमाहात्म्य ऐकून; भक्तिप्रवणचित्तानें शंकराला नमस्कार करून पार्वतीनें प्रश्न केला कीं, आपलें नांव महादेव असतां आपण ओंगळ मुंडमाळा कां धारण केली? शंकर म्हणाले, पार्वती! प्रत्येक कल्पामध्यें जो ब्रह्मा व विष्णु होऊन कल्पांतीं देह ठेवितो, त्या हजारों कल्पांतल्या ब्रह्माविष्णूंच्या मस्तकांची ही माळ मी धारण केली आहे. द्वारकेसारखें मनोहर स्थळ सोडून विष्णु प्रभासांत कां रहातो? असा पार्वतीचा प्रश्न ऐकून शंकर म्हणाले; हे पार्वती! प्रभासक्षेत्रांत असंख्य तीर्थें व क्षेत्रें असल्यानें ह्यासारखें वास करण्यास अन्य क्षेत्रच नाहीं, असें समजून

चोवीस तत्त्वांसह बालरूप ब्रह्मा, पंचवीस तत्त्वांचा स्वामी विष्णु व छत्तीस तत्त्वयुक्त मी तुझ्यासह प्रभासक्षेत्रांत रहातों. जे कोणी मुंग्या, माशा, पशु, पक्षी, स्त्रिया, म्लेच्छ, शूद्र ह्या प्रभासक्षेत्रांत मृत्यु पावतात, ते सर्व शिवलोकाला जातात. फार काय परंतु जे काम, क्रोध, लोभ, मोहांनीं बद्ध होऊन अधर्माचरण करणारे महापापी, ब्रह्महत्त्या करणारे, कृतघ्न, गुरुस्त्रीगमन करणारे, आईबापांचीहि हत्या करणारे, ते सर्वहि ह्या तीर्थाच्या पुण्यप्रभावानें मोक्ष पावतात.

---

## अध्याय १० वा.

### तीर्थक्षेत्रमाहात्म्य.

शंकर म्हणतात; हे पार्वति! आणखी एक तुला रहस्य सांगतों; एक. पृथ्वी भागावर ब्रह्मदेव, जलभागावर विष्णूच्या, तेजोभागावर रुद्र अशा देवता आहेत. वायु व आकाश ह्याहि भागावर ईश्वर आहे. ज्या स्थानावर जी देवता आहे, त्या स्थानावर असणारीं जीं तीर्थें तीं त्या त्या देवतेचीं होत. छागलंड, दुर्गंड, माकोट, मंडलेश्वर, कालिंजरवन, शंकुकर्ण, स्थलेश्वर, शूलेश्वर हीं तीर्थें पृथ्वीभागावर आहेत. हरिश्चंद्र, श्रीशैल, जल्पेश, उन्नांतिकेश्वर, महाकाल, मध्यम, केदार व भैरव हीं पवित्र अशीं आठ तीर्थें जलभागावर आहेत. अमरेश्वर, प्रभास, नैमिष, पुष्कर, आषाढी, दंडी, भारभूति, लांगल हीं आठ तीर्थें वायुभागावर आहेत. वस्त्रापथ, रुद्रकोटि, ज्येष्ठेश्वर, महालय, गोकर्ण, रुद्रकर्ण, वर्ण, स्थापक हीं पवित्र आठ तीर्थें आकाशभागावर आहेत. ज्याची जी देवता, त्याचें त्या तीर्थावर माहात्म्य आहे, असें समजावें. विष्णु पाण्यांत निजणारा ( जलशायी ) असल्यामुळें जलभागावरील तीर्थें त्यास प्रिय आहेत. ह्या वरील सर्व तीर्थांमध्यें प्रभासतीर्थ श्रेष्ठ आहे. ह्या प्रभासक्षेत्रामध्यें प्रत्येक माघी पौर्णिमेला पृथ्वीवर असणारीं साठ कोटी साठ लक्ष तीर्थें येऊन राहतात; ह्मणून ह्या क्षेत्राचें माहात्म्य अवर्णनीय आहे. आनर्तसार, सौम्य, भुवनभूषण, पांचनद, आदिगुह्य, महोदय, सिद्धरत्नाकर, समुद्रावरण, धर्माकार, कलाधार, शिवगर्भगृह, सर्वदेवनिवेश अशीं नांवें ह्या प्रभासक्षेत्राला प्रत्येक कल्पांत अनुक्रमानें प्राप्त झालीं होतीं. ह्या प्रभासक्षेत्रामध्यें कित्येक उपक्षेत्रें आहेत. त्यांपैकीं कांहीं पद्माकार, कांहीं यवाच्या आकाराचीं, कांहीं साहा कोपऱ्यांचीं, कांहीं त्रिकोणी, कांहीं दंडाकार, कांहीं अर्धचंद्राप्रमाणें, कांहीं चौकोनी अशीं असून त्यांत ब्रह्मादि देवता राहतात. सर्व तीर्थें प्रलयकाळीं प्रभासक्षेत्रीं येऊन

राहतात. ह्या प्रभासक्षेत्राच्या उत्तरेस रविपुत्री नांवाची नदी आहे; व दक्षिणेस समुद्र आहे; अशी ह्या क्षेत्राची दक्षिणोत्तर सीमा आहे. ह्या क्षेत्राच्या पूर्वेस रुक्मिणी नदी व पश्चिमेस तप्ततोया नदी आहे; अशी ह्याची पूर्वपश्चिम सीमा आहे; अशा तऱ्हेनें ह्या प्रभासक्षेत्राच्या चतुःसीमा आहेत. विष्णूनें ह्या प्रभासक्षेत्राचें माहात्म्य जाणून तेथेंच आपलें शरीर सोडिलें.

## अध्याय ११ वा.

### अश्विनीकुमारोत्पत्ति.

पार्वतीनें शंकराला प्रभासक्षेत्राचा विस्तार किती आहे, असा प्रश्न विचारिला असतां शंकर पार्वतीला म्हणतात; हे पार्वति ! सर्व भूतलावर अग्रगण्य असें मध्यभागीं जंबुद्वीप आहे, त्या जंबुद्वीपाचे नऊ भाग पाडले आहेत त्या नऊ भागांपैकीं भरतखंड हा भाग मुख्य आहे.त्या भरतखंडाचेहि नऊ भाग केले आहेत. ह्या भरतखंडाचा विस्तार लांबरुंद म्हणजे हिमालयपर्वतापासून तों रामेश्वरापर्यंत असा आहे. हा भाग पूर्वपश्चिम ऐंशी हजार योजनें रुंद व दक्षिणोत्तर नव्वद हजार योजनें लांब असा आहे. ह्या भरतखंडांत कृत, त्रेत, द्वापार व कलि अशीं चार युगें असून अनुक्रमें त्या त्या युगांत चारशें, तीनशें, दोनशें व शंभर अशीं पूर्णायुषें आहेत. भरतखंड ही पुण्यभूमि आहे. भरतखंड हें कासवाच्या आकाराचें असून त्याचें मुख पूर्व दिशेस आहे. कृत्तिका, रोहिणी व मृग हीं नक्षत्रें त्या भरतखंडरूपी कासवाच्या पाठीवर आहेत. आर्द्रा, पुनर्वसु व पुष्य हीं तीन नक्षत्रें कासवाच्या तोंडावर आहेत. आश्लेषा, मघा व पूर्वा हीं तीन नक्षत्रें कासवाच्या पायावर आहेत. उत्तरा, हस्त व चित्रा हीं तीन नक्षत्रें कासवाच्या डाव्या कुशींत आहेत. स्वाती, विशाखा व अनुराधा हीं तीन नक्षत्रें कासवाच्या उजव्या कुशींत आहेत. अनुराधा, ज्येष्ठा व मूळ हीं कासवाच्या नैर्ऋत्य दिशेस आहेत. आषाढा ( पूर्वाषाढा व उत्तराषाढा ) श्रवण व धनिष्ठा हीं तीन नक्षत्रें वायव्य दिशेस आहेत. शततारका, पूर्वाभाद्रपदा व उत्तराभाद्रपदा हीं तीन नक्षत्रें ईशान्येस आहेत; व रेवती, अश्विनी व भरणी हीं तीन नक्षत्रें आग्नेय दिशेस आहेत. ह्याप्रमाणें भगवदवताररूपी कूर्म ( कासव ) स्वरूपानें असणाऱ्या भरतखंडाचें नक्षत्रयुक्त स्वरूप आहे. कूर्मरूपी भरतखंडाच्या मध्यभागीं मेष व वृषभ ह्या राशी राहिल्या आहेत. मुखावर मिथुन राशी आहे. उजव्या पायावर कर्क व डाव्यावर सिंह. कन्या व तूळ ह्या दोन कुशींवर. वृश्चिक राशी शेंपटीवर,

धनराशी वायव्यदिशेस. मकरराशी डाव्यापायावर; व कुंभ आणि मीन ह्या राशी कासवाच्या उदरावर आहेत. ह्याप्रमाणें भरतखंडाच्या कूर्म ( कासव ) स्वरूपा- वरील अवयवावर असणाऱ्या राशींची व नक्षत्रांचीं स्थानें सांगितलीं. ह्याच भरतखंडरूपी कासवाच्या नैर्ऋत्य दिशेस सौराष्ट्रदेश आहे. त्या सौराष्ट्रदेशाचेहि नऊ भाग केले आहेत. त्या नऊ भागांपैकीं समुद्राला लागून असणारा जो नववा भाग त्यालाच प्रभासक्षेत्र असें म्हणतात. हें क्षेत्र बारा योजनें म्हणजे अठ्ठेचाळीस कोस लांबीरुंदीचें आहे. ह्या संपूर्ण क्षेत्राच्या मध्यें वीस कोस प्रमाणाची जी भूमि आहे, तिला पीठिका असें नांव आहे; व त्या पीठिकेच्या मध्यभागीं समुद्राचे जवळ माझें स्थान आहे; व त्या स्थानामध्यें लिंगरूपानें मी राहतों. कैलासापेक्षांहि ह्या स्थानाचें माहात्म्य विशेष आहे; व हें स्थान मला फार प्रिय आहे. हें स्थान मी आपल्या प्रभेनें म्हणजे कांतीनें प्रकाशित केलें असल्यामुळें ह्याला प्रभास हें नांव प्राप्त झालें आहे.

पूर्वीं स्वायंभुव मन्वंतरामध्यें सृष्टि उत्पन्न करणाऱ्या ब्रह्मदेवाच्या उजव्या डोळ्यापासून सूर्य उत्पन्न झाला. त्या सूर्याला द्यौ व राज्ञी आणि निक्षुभा व पृथ्वी अशा बायका होत्या. मार्गशीर्ष शुद्ध सप्तमीला सूर्य द्यौ नांवाच्या बायकोशीं संलग्न होतो; व माघ शुद्ध सप्तमीला सूर्य पृथ्वीशीं संलग्न होतो. ज्या वेळीं सूर्याचा पृथ्वीशीं संबंध घडतो त्या वेळीं ती ऋतुस्नान होते; व पाऊस पडतो. त्या वेळीं ती धान्यादि उत्पन्न करते. धान्यादि उत्पन्न झालीं असतां होमहवनादि कृत्यें चालतात; व त्यायोगें देवता तृप्त होतात. अशातऱ्हेनें देवता तृप्त झाल्या असतां सर्व सृष्टि उत्पन्न होते. ह्याप्रमाणें पृथ्वीपासून मरीचि नामक ऋषि उत्पन्न झाला. त्याला कश्यप नांवाचा मुलगा झाला. कश्यपाला हिरण्यकशिपु व हिरण्यकशिपूला प्रल्हाद अशी संतति झाली. प्रल्हादाला सुरेणु नांवाची मुलगी झाली; व तिचा त्वष्ट्याबरोबर विवाह झाला. त्या सुरेणूला त्वष्ट्यापासून राज्ञी, संज्ञा, द्यौ, त्वष्ट्री, प्रभा, छाया, निक्षुभा अशा कन्या झाल्या. ती जी निक्षुभा, तिलाच पृथ्वी म्हणतात. त्यांपैकीं संज्ञा नांवाची भार्या सूर्यतेजानें दिपून जात असल्यामुळें, ती सूर्याला पाहून नेत्र मिटीत असे. भार्येनें नेत्र मिटलेले पाहतांच, सूर्याला राग येऊन त्यानें तिला शाप दिला कीं, तुला यम नांवाचा पुत्र होईल. त्या सूर्यशापामुळें संज्ञेला यम हा मुलगा व यमुना ह्या नांवाची मुलगी झाली; आणि तिसरा श्राद्धदेव नांवाचा मुलगा झाला; जो श्राद्धदेव पुढें मनु नांवानें प्रसिद्ध झाला. नंतर ती आपल्या दोन पुत्रांना व एका कन्येला छायेच्या स्वाधीन करून म्हणाली, तूं ह्यांचें रक्षण कर; मी बापाच्या घरीं जात आहे, तूं—मी अमुक ठिकाणीं गेल्यें आहे वगैरे सूर्याला सांगूं नको, वगैरे छायेला बजावून; संज्ञा बापाच्या घरीं निघून गेली. संज्ञेचा

बाप जो त्वष्टा, त्यानें कांहीं दिवस संज्ञेला आपल्या घरीं ठेवून घेऊन नंतर, तिची पतिगृहीं रवानगी केली. नंतर ती संज्ञा तेथून निघाली ती सूर्याकडे न जातां घोडीचें रूप घेऊन कुरुक्षेत्रांत आली; व तप करूं लागली. इकडे सूर्यापासून छायेला सावर्णिमनु व शनैश्वर असे दोन मुलगे झाले; आणि एक तापी नांवाची कन्या झाली. कालान्तरानें सूर्य संज्ञेचा शोध करीत करीत त्वष्ट्याकडे आला. तेथें संज्ञेचा पत्ता न लागल्यामुळें, जेथें संज्ञा तप करीत होती तेथें गेला; व तिनें घोडीचें रूप घेतलें आहे; असें पाहून सूर्यानें घोड्याचें रूप घेतलें. हा परपुरुष असें समजून मैथुनयोग टाळण्याकरितां तिनें त्याकडे तोंड केलें. तोंड आपल्याकडे केलेलें पाहतांच घोडारूप घेतलेल्या सूर्यानें आपलें लिंग तिच्या नाकांत घातलें. तत्काळ नाकांतून अश्विनीकुमार नांवाचे दोन पुत्र झाले; त्यांची देवांचे वैद्याच्या जागीं नेमणूक करून, सूर्य संज्ञेसह स्वस्थानीं गेला.

---

# अध्याय १२ वा.

## यमेश्वरोत्पत्ति.

शंकर म्हणतात; हे पार्वती! पूर्वी सूर्याची पत्नी संज्ञा म्हणून जी सांगितली तिलाच राज्ञी असे म्हणतात; व जी छाया नांवाची सूर्यपत्नी तिला निक्षुभा असें म्हणतात. ‘ राज ’ धातु दीप्ति ( प्रकाश ) ह्या अर्थामध्यें आहे, व जो सतत ‘ राजते ’ म्हणजे प्रकाशतो त्यास राजा म्हणतात. ह्या नियमाप्रमाणें सूर्य हा सर्व जगाला प्रकाश देणारा असल्यामुळें त्यास राजा म्हणतात; अर्थात् राजाप्रमाणें प्रकाशणारा जो सूर्य त्याची जी छाया नांवाची पत्नी तिला राज्ञी म्हणजे राजपत्नी म्हणणें हें यथार्थच होय. छाया नांवाच्या सूर्यपत्नीला निक्षुभा म्हणण्याचें कारण असें आहे कीं, निक्षुभा ह्यांत असणारा जो ‘ क्षुभ् ’ धातु त्याचा अर्थ चलन होणें, हलनें असा आहे; व ‘ नि ’ हा उपसर्ग निषेधार्थक आहे; अर्थात् चलनरहित जी ती निक्षुभा. जिला स्वतः होऊन चालण्याची शक्ति नाहीं ती निक्षुभा होय. त्या निक्षुभेपासून यमाची उत्पत्ति झाली. तो यम जन्मतःच पादहीन असल्यामुळें तप करण्याकरितां प्रभासक्षेत्राला प्राप्त झाला; व त्यानें घोर तपश्चर्या केली. यमानें प्रभासक्षेत्रीं एक शिवलिंग स्थापून त्याचें नित्य पूजन सुरू केलें. त्याची ती तपश्चर्या व भक्ति पाहून मी संतुष्ट झालों; व त्यास शंभर वर दिले. अजून सुद्धां तें यमस्थापित लिंग यमेश्वर नांवानें प्रसिद्ध आहे. जे कोणी त्या यमेश्वराचें दर्शन यमद्वितीयेला घेतील त्यास यमलोकाची प्राप्ति न होतां ते शिवलोकाला प्राप्त होतील.

---

# अध्याय १३ वा.

## अर्कस्थलोत्पत्ति.

शंकर म्हणतात; हे पार्वती! आतां तुला सूर्यमाहात्म्य सांगतों. ज्या सूर्यानें प्रभासक्षेत्रांत अर्कस्थल नांवानें अवतार धारण केला. एकदां त्वष्ट्यानें शाकद्वीपामध्यें कुंभाराच्या घटनिर्माण करणाऱ्या चाकाप्रमाणें असणाऱ्या एका चाकावर सूर्याला बसवून चाकूला धार लाविल्याप्रमाणें त्याला सुरीनें शंभर वर्षेपर्यंत चक्र फिरवून तासण्याला सुरवात केली. त्या वेळीं तेजोरूप सूर्याच्या गोलकापासून जें तेज निघालें तें प्रभासक्षेत्रांत पडलें. त्या ठिकाणीं पडलेलें सूर्यतेजाचें चूर्ण स्थलाच्या आकारानें दिसूं लागलें.तें तेज त्या ठिकाणीं पूर्वी सुवर्णाप्रमाणें चमकत होतें. तेंच सांप्रत कलियुगाच्या प्रभावानें पर्वतरूपानें राहिलें आहे.तेथें सूर्य स्वतःचें अर्कतेज धारण करून पृथ्वीवर लोकहिताकरितां राहिला आहे. त्या तेजाला कृतयुगांत हिरण्यगर्भ, त्रेतायुगांत सविता, द्वापारांत भास्कर व कलियुगांत अर्कस्थल अशीं नांवें प्राप्त झालीं आहेत. स्वारोचिष नांवाच्या दुसऱ्या मनूच्या कारकीर्दींत ह्या तेजाची प्रभासक्षेत्रीं स्थापना झाली. त्याच्या त्या तेजापासून निघालेल्या धुळीनें वीस कोस जमीन व्यापून गेली आहे. ह्या तेजानें अठ्ठेचाळीस कोस जमीन पवित्र झाल्यामुळें तितक्या पवित्र स्थानाला अर्कस्थल अशी संज्ञा आहे. त्या अर्कस्थलाच्या मधोमध माझें स्थान आहे. ज्या कारणास्तव मध्यवर्ती माझ्या स्थानाला सूर्यतेजानें भासित म्हणजे प्रकाशित केलें आहे, त्या कारणास्तव ह्या मदंकित अर्कस्थलालाच प्रभासक्षेत्र असें नांव प्राप्त झालें आहे. ज्या प्रभासामध्यें जे कोणी कर्करूपधारी सूर्याचें तेज पाहतील, ते सर्व पापापासून मुक्त होऊन सूर्यलोकीं जाऊन राहतील. जे कोणी प्रभासक्षेत्रांत स्नानदानादि करितील, त्यांनीं सर्व तीर्थांत स्नान करून सर्व दानें दिल्यासारखीं होतील. अर्कस्थलाचें दर्शन घेऊन अर्क म्हणजे रुईचे पानांवर भोजन करूं नये; कारण त्यायोगें गोत्रांच्या भक्षणाचा दोष प्राप्त होतो. त्या प्रभासक्षेत्राजवळच एक सिद्धेश्वर नांवाचें स्थान आहे; त्यालाच पूर्वी कृतयुगांत जैगीषव्येश्वर म्हणत असत. त्या सिद्धेश्वराच्या दर्शनानें सर्वसिद्धि प्राप्त होतात. त्या सिद्धेश्वराजवळच एक पातालविवर म्हणून स्थान आहे. तेथें पूर्वी मंदेह नांवाचे राक्षस राहत असत. ते राक्षस सूर्यतेजानें दग्ध होऊन पाताळांत पळून गेलें; म्हणून त्या स्थानाला कलियुगांत पातालद्वार किंवा पातालविवर असें ह्मणतात. त्या पाताळविवराचे ठिकाणीं योगिनी व ब्राह्मी वगैरे राहत असतात. त्या ठिकाणीं मात्र

कृष्ण चतुर्दशीला यज्ञादि करून मातृगणांची व योगिनींची पूष्प, नैवेद्य वगरच्या योगें पूजा केल्यास सर्वप्रकारची सिद्धि प्राप्त होईल.

## अध्याय १४ वा.

### सिद्धेश्वरोत्पत्ति.

आतां तुला सिद्धेश्वराची उत्पत्ति सांगतों.ज्याला कृतयुगांत जैगीषव्येश्वर ह्मणत असत. कृतयुगामध्यें शतकलाक नांवाच्या ऋषीला जैगीषव्य नांवाचा पुत्र होता. त्यानें प्रभासक्षेत्रांत येऊन घोर तपश्चर्या केली; व पूर्वकल्पांत महोदय नांवानें प्रसिद्ध असणाऱ्या लिंगाची स्थापना करून पूजा केली. त्याच्या तपानें व भक्तीनें मी संतुष्ट होऊन त्यास वर देण्यास सिद्ध झालों; त्या वेळीं जैगीषव्य मला म्हणतो कीं, जर मला आपण वर देणार असाल तर ज्ञानयोग मला द्या; ह्याहून दुसऱ्या कोणत्याहि वस्तूची मी इच्छा करीत नाहीं; आणि मला तुझ्या ठिकाणीं तशीच पार्वतीचे ठिकाणीं व कार्तिकस्वामी व गणपति ह्यांचे ठिकाणीं कायम राहणारी भक्ति दे. नंतर मी त्याला सर्व वर देऊन, त्या महोदयलिंगाला जैगी-षव्येश्वर असें नांव ठेविलें; व तेंच हल्लीं सिद्धेश्वर नांवानें प्रसिद्ध आहे. सोमवारीं माघशिवरात्र आली असतां त्या दिवशीं सिद्धेश्वराचें दर्शन घ्यावें.

## अध्याय १५ वा.

—:o:—

### पापनाशनोत्पत्ति.

सिद्धेश्वराच्या आग्नेयदिशेला एक पापनाशन नांवाचें तीर्थ आहे; त्या तीर्थाचें कांठीं अरुणानें पापनाशन नांवाचें लिंग स्थापिलें आहे; तें स्थान तीन धनुष्य म्हणजे बारा हात लांब-रुंद आहे. हें लिंग सूर्याचा सारथी जो अरुण त्यानें स्थापिलें असल्यामुळें, हें कलियुगांत सर्व पातकांचें क्षालन करण्याचें कामांत प्रावीण्य मिळविलेलें आहे; ह्यामुळें ह्यास पापनाशन हें नांव प्राप्त झालें आहे. चैत्रशुक्ल त्रयोदशीचे दिवशीं ह्या लिंगाचें पूजन केलें असतां, शिवलोकप्राप्ति होते.

# अध्याय १६ वा.

## मातृगणोत्पत्ति.

शंकर म्हणतात,–हे पार्वती ! पूर्वी पातालविवराचें ठिकाणीं राहणारे मंदेह नांवाचे राक्षस सूर्याला त्रास देऊं लागले असतां, सूर्यानें त्यांना पळवून पाताळांत पाठवून लाविले. जरी ते पाताळांत निघून गेले, तरी सुद्धां ते प्रत्येक पर्वणीला सूर्याला त्रास देत असत. त्या वेळीं ब्राह्मीप्रमुख मातृगणांनीं व सुनंदादि देवतांनीं सिद्धेश्वरीं वास करून, मंदेहादि राक्षसांना पाताळांतून वर येऊं दिलें नाहीं. पातालविवराचें रक्षण करणाऱ्या ज्या माता आहेत; त्यांचें पूजन करणाऱ्यांना केव्हांहि कोणापासूनहि पीडा होत नाहीं. प्रत्येक चतुर्दशीला ह्याप्रमाणें वर्षभर ह्या मातांची म्हणजे मातृगणाची जे पूजा करितात; त्यांना तत्काळ सिद्धि प्राप्त होऊन सर्व सुखें व अंतीं मोक्षहि प्राप्त होतो. ज्याला सिद्धीची इच्छा असेल त्यानें अर्कस्थलाजवळ असणाऱ्या मातृगणांची पूजा करावी.

# अध्याय १७ वा.

## अर्कस्थलपूजाविधि

शंकर म्हणतात; पार्वती ! आतां तुम्हाला अर्कस्थलाच्या पूजेचा विधि सांगतों; ऐका. सर्व देवांमध्यें सूर्य हा श्रेष्ठ आहे. त्यासच अर्क म्हणतात. सूर्याच्याच साहाय्यानें दिवस, रात्र, धर्म, अधर्म; व कालचक्र वगैरे सृष्टिक्रम प्रचलित होतो. जगाची उत्पत्ति, स्थिति व नाश हेहि सूर्याच्या योगेंच होतात. अशा-तऱ्हेनें स्वयंज्योति जो सूर्य त्यासच अर्क म्हणत असल्यामुळें त्याच्या स्थलालाच अर्कस्थल म्हणतात; व अशा अर्कस्थलाचें पूजन करण्यापूर्वी प्रथम मुखशुद्धि करून स्नान करावें. नंतर शुद्ध वस्त्र परिधान करून अर्केश्वराला स्पर्श करावा; व " ॐ ह्रीं हैं सः " ह्या सूर्यमंत्राचा जप करावा. ह्या एकोणीस मात्रात्मक सूर्यमंत्राला अक्षर अशी संज्ञा आहे. मंत्राचा जप करीत हातांत कण्हेरीच्या तांबड्या फुलांनीं व चंदनादि पूजासाहित्य घेऊन अर्कस्थलाजवळ येऊन त्यास साष्टांग नमस्कार घालावा; व सूर्याला अर्घ्यनिवेदन करावें. नंतर उभे राहून " उदुत्यं जातवेदसं " ह्या मंत्रानें सूर्याची प्रार्थना करावी, व " अग्निं दूतं वृणीमहे " ह्या मंत्रानें सूर्याचें आवाहन करावें. नंतर " आकृष्णेत रजसा "

किंवा " हंसः शुचिषद्वसु " ह्या मंत्रानें सूर्यपूजन करावें. " अपत्येतायवो " ह्या मंत्रानें व " अदृश्रमस्य केतवो " ह्या मंत्रानें सूर्याला पुष्पादि अर्पण करावींत. " तरणिर्विश्वदर्शतो ज्योतिष्पश्यान्ति सूर्यः " ह्या मंत्राचा नेहमीं जप करावा. " चित्रं देवानामुदगादनीकं " ह्या मंत्रानें भद्रा नामक देवीचें व " येना पावक चक्षुषा " ह्या मंत्रानें विभूति नामक देवीचें पूजन करावें. नंतर तेथें असणाऱ्या विमलादेवीचें " विद्यामेषि रजस्पृथ्व " ह्या मंत्रानें पूजन करावें " सप्त त्वा हरितो रथे वहन्ति " ह्या मंत्रानें अमोघा व सिद्धिदा ह्या देवींचें पूजन करावें. नंतर " उद्वयं तमसस्परि " ह्या मन्त्रानें विद्युता देवीचें पूजन करावें. सूर्यमंत्राच्या सात बीजांची अनुक्रमें " उद्यन्नद्यमित्र महः, शुकेषु मे हरिमाणं, उदगादयमादित्यः, तत्सवितुर्वरेण्यं, महाहि वो महायं, हिरण्यगर्भः समवर्तताग्रे, सवितापश्चातात्, " ह्या मंत्रांनीं पूजा करावी. प्रथम सूर्यस्थापना करून नंतर त्याच्या अंगभूत असणाऱ्या देवतांची स्थापना करावी. नंतर " अमोसि प्राणितेन " ह्या मंत्रानें सूर्याच्या हृदयाची पूजा करावी. तसेंच " आयुष्यं वर्चसा, तत्सवितुर्वरेण्यं, धन्वन्नागाधन्वन, अश्विना तेजसा " ह्या मंत्रांनीं सूर्याचें मस्तक, शेंडी, कवच, नेत्र ह्यांचें पूजन करावें. नंतर नवग्रहांच्या आठ ग्रहांची पूजा करावी. " उदीरतामवर उत्परास, तत्त्वायामि ब्रह्मणा, इंद्रासोमापवत, अग्निमीळे, रक्षोहणं वाजिनमा, वायवायाहि वीतये " ह्या मंत्रांनीं यम, वरुण, इंद्र, वायु, अग्नि, विरूपाक्ष व वरुण ह्यांची पूजा करावी. आतां सूर्यमूर्तीची पूजा करण्याचे वेळीं " इषेत्वोर्जेत्वा, अग्निमीळे, अग्न आयाहि, आजिघ्र, योगेयोग, समुद्रागच्छ, इमं मे गंगे, समुद्रज्येष्ठाः, सिनीवाली, यज्ञं यज्ञ, आप्यायस्व, दधिक्राव्णो, द्विपदा, मानस्तोकेतन, विष्णो रराट, इदं विष्णु, वेदाऽसि, बृहस्पते, धूरसि, समिद्धो जन, युंजान, सहस्रशीर्षा, शंभवाय, विश्वतश्चक्षु, श्रीश्चते लक्ष्मीश्च, ' ह्या मंत्रांनीं सूर्याचें मस्तक व उजवा हात ह्यांचें आवाहन, करून सूर्याच्या पायाची पुढील मंत्रांनीं पंचामृतासह षोडशोपचार पूजा करावी. आतां आठ शिखराच्या मेरूचा पूजाविधि सांगतों. प्रथम " महाहि वो महायं " ह्या मंत्रानें एका शिखराचें पूजन करावें; नंतर " त्रातारमिंद्रं, तमुष्टवाम, अग्निमीळे, तत्सावितर्वरेण्यं, यमाय त्वा मखाय त्वा, उदीरतामवरउत्परास, आयंगौः पृश्निरक्रमीत, रक्षोहणं वाजिनमाजिघर्मि, इंद्रासोमा, अभित्वासूरनो, येनेदं भूतं नमो अस्तु सर्पेभ्य, हिरण्यगर्भः समवर्तताग्रे, सविता पश्चातात्, माता रुद्राणां तद्विष्णोः परमं पदं, हंसः शुचिषद्वसुरंतरिक्ष, " ह्या मंत्रांनीं आठ शिखरांचें आवाहन करून त्रिकाळ पूजन करावें. अनेकप्रकारचीं पुष्पें सूर्यपूजेकरितां आणावींत. वर निर्दिष्ट केल्याप्रमाणें अर्कस्थलाचे ठायीं सूर्यपूजन केलें असतां सर्व इच्छा सफल होतात; नंतर " तमुष्टवाम, एतोन्विन्द्रं, इंद्रःशुद्धो न, इंद्रशुद्धो

हि नो, अस्य वामस्य, त्रिभिष्टुं देव, " ह्या सहा मंत्रांनीं व दहा सामवेदांतील गायनयुक्त मंत्रांनीं सूर्याला प्रदक्षिणा घालावी. हुंकार, प्रणव, उद्गीथ, प्रहर, प्रस्ताव, आरण्यक, निधन, न्हींकार, साध्य, नामदेवक, " ह्या सामगायनानींहि सूर्याला प्रदक्षिणा घालावी. " उक्षाणं पृश्निं, चत्वारि वाक्परिमिता, इंद्रं मित्रं वरुण, कृष्णं नियानं, द्वादश प्रथम, " ह्या पांच मंत्रांनीं सूर्याची स्तुति करावी. ह्याप्रमाणें फलेच्छेनें पूजन करणारांस त्या त्या फलांची प्राप्ति होईल; व फलेच्छा न ठेवतां पूजा करणारास मोक्षप्राप्ति होईल. राहु हा केव्हांहि सूर्याला ग्रासूं शकत नाहीं, तर सूर्याचे अधोभागीं सूर्यापासून निघणाऱ्या अमृताच्या लाभाकरितां राहु राहिलेला आहे; व राहूच्या बिंबानें सूर्यबिंब आच्छादित होत असल्यामुळें सूर्यबिंब ग्रस्त झाल्यासारखें वाटतें; परंतु तें शक्य नाहीं. सूर्यतेजानें राहू जवळ येतांच त्याचें भस्म होईल.

---

# अध्याय १८ वा.

## चन्द्रोत्पत्ति.

शंकर म्हणतात,-हे पार्वती! ज्या वेळीं भगवंतांनीं वराह अवतार धारण करून पृथ्वीचा उद्धार केला, त्या वेळेपासूनच्या ह्या काळाला वाराहकल्प म्हणतात. माझ्या मस्तकावर विराजमान होणारा जो चंद्र, तो ह्याच कल्पांत उत्पन्न झाला आहे. हा वराह अवतार ब्रह्मदेवाच्या दुसऱ्या परार्धामधल्या, दुसऱ्या महिन्याच्या आरंभाला झाला आहे. ह्या वराहकल्पाच्या आरंभीं स्वायंभुव मनूच्या कारकीर्दींत देवदैत्यांनीं मिळून; क्षीरसमुद्र मंथन करण्यास सुरवात केली असतां त्यापासून चौदा रत्नें निर्माण झालीं. त्या चौदा रत्नांमध्यें चंद्रमा नांवाचेंहि हें एक रत्नच उत्पन्न झालें; त्या चंद्राला मी आजपर्यंत एकसारखा भालस्थानीं धारण करीत आहे. ज्या वेळीं मी कालकूट विष प्राशन केलें, त्या वेळीं माझ्या सर्वांगाचा दाह होऊं लागला. तो दाह शान्त व्हावा एतदर्थ, मी चंद्राचें धारण केलें आहे. माझ्या भालस्थानीं चंद्र असल्यामुळें भालचंद्र, शशिभूषण अशीं नांवें मला प्राप्त झालीं आहेत.

# अध्याय १९ वा.

## विष्णूचे अवतार.

तुम्ही संपूर्ण चंद्र धारण न करितां, त्याची एकच कला कां धारण करितां? असा पार्वतीचा प्रश्न ऐकून, शंकर म्हणतात,-हे पार्वती! एकंदर चंद्राच्या कला सोळा आहेत. त्यांमध्यें अमा नांवाची जी कला आहे, ती सर्वश्रेष्ठ असल्यामुळें मी त्या अमासंज्ञक कलेला धारण करितों. ज्या चन्द्राच्या सोळा कला, त्या प्रतिपदादि सोळा तिथी होत. त्याप्रमाणें चंद्राच्या सोळा कला हेंच त्रुटि, लव, निमेष, कला, काष्ठा, मुहूर्त, रात्रि, दिवस, पक्ष, महिना, अयन, वर्ष, युग, मन्वन्तर, कल्प व महाकल्प ह्या सोळाभेदानें उत्पन्न झालेलें कालस्वरूप होय. विसर्जनी नांवाची जी चंद्रकला आहे, ती जगाला उत्पन्न करिते; व संवरणी नांवाची जी कला आहे, ती जगाचा संहार करिते. डोळ्याचें पातें लवण्याला जो काल लागतो, त्याच्या चतुर्थांशा इतका जो काल त्यास त्रुटि म्हणतात. दोन त्रुटि म्हणजे एक निमेष. तीस निमेष म्हणजे एक काष्ठा. तीस काष्ठा म्हणजे एक कला. तीस कला म्हणजे एक मुहूर्त. पंधरा मुहूर्त म्हणजे दिवस. दिवसा इतकीच रात्रहि पंधरा मुहूर्तांनीं युक्त असते. दिवस व रात्र मिळून झाला अहोरात्र म्हणतात. पंधरा अहोरात्र म्हणजे एक पक्ष. दोन पक्ष म्हणजे एक महिना. साहा महिने म्हणजे अयन. दोन अयनें म्हणजे एक वर्ष. सौरमानाप्रमाणें त्रेचाळीस लक्ष वीस हजार वर्षें झालीं म्हणजे एक युग होतें. चार युगें एकाहत्तर वेळां गेलीं म्हणजे मन्वन्तर होतें. इंद्राचें आयुःप्रमाण एक मन्वन्तरपर्यंत आहे. चौदा इंद्र झाले म्हणजे एक कल्प होतो. एक कल्प म्हणजे ब्रह्मदेवाचा एक दिवस. जितका दिवस तितकीच ब्रह्मदेवाची रात्र होय. ह्या दिनमानाप्रमाणें ब्रह्मदेवाचें शंभर वर्षें आयुष्य होय. माझ्या अर्ध्या निमिषामध्यें चौदा हजार विष्णु व अगणित ब्रह्मदेव होतात. ज्याप्रमाणें सृष्टीची उत्पत्ति होते त्याच्या व्युत्क्रमानें उत्तर उत्तर वस्तु पूर्व पूर्व वस्तूंत लीन होतात; व शेवटीं प्रलयकाळीं सर्व जग नाश पावतें. नंतर तुम्हांला अत्यंत प्रिय असणाऱ्या चंद्राला लांछन ( कलंक ) प्राप्त होण्याचें कारण काय, असा पार्वतीनें प्रश्न केला असतां शंकर म्हणतात; हे पार्वति! आजपर्यंत चारशें सव्वीस चंद्र झाले; व हा सत्ताविसावा चंद्र आहे. पूर्वी एक चंद्र अत्रिऋषिपासून उत्पन्न झाला. त्यानंतर दुसरा पंचदशी नामक स्त्रीचे ठिकाणीं उत्पन्न झाला. दक्षाच्या सत्तावीस कन्या समुद्रापासून उत्पन्न झालेल्या ह्या चंद्राला दिल्या

होत्या. पैकीं चंद्र रोहिणीवरच प्रीति करितो, इतरांवर करीत नाहीं, असें दक्षाला समजतांच दक्षानें चंद्राला उपदेश केला; परंतु चंद्रानें तें न ऐकिल्यामुळें दक्षानें चंद्राला शाप दिला कीं, तूं क्षयी व कलंकयुक्त होशील; म्हणून हा चंद्र कलंकयुक्त झाला आहे. आतां तुला विष्णूचे दाहा अवतार सांगतों, ऐका. एक त्रेतायुगामध्यें पंचदशी नामक कन्येचे ठिकाणीं एक मांधाता नांवाचा अवतार झाला. त्या नंतर परशुराम नांवानें साहावा अवतार जमदग्नीपासून झाला. ज्या परशुरामानें एकोणीस वेळां निक्षत्रिय पृथ्वी केली. नंतर सातवा रामनांवानें विष्णूचा अवतार झाला, ज्या रामानें रावणाचा वध केला. आठवा विष्णूचा अवतार व्यास नांवानें झाला. नववा अवतार कश्यपापासून विष्णु नांवानें प्रसिद्ध झाला. पूर्वीं हाच विष्णु प्रमति नांवानें प्रसिद्ध होता. दहावा कल्कि नांवाचा अवतार झाला. कलियुग समाप्त होतांच जेव्हां चंद्र, सूर्य व गुरु हे तीन ग्रह तिष्य राशीचे ठिकाणीं येतील तेव्हां कृतयुगाला प्रारंभ होईल. त्या वेळीं अभिजित् नांवाचें नक्षत्र असून जयंती नांवाची रात्र व विजय नांवाचा मुहूर्त असेल; व कृतयुगांत जनार्दन नांवानें विष्णूचा अवतार होईल. जेव्हां जेव्हां पृथ्वी भारभूत होईल, व देव दैत्यपीडित होतील त्या त्या वेळीं भगवान् विष्णु अनेक अवतार धारण करितो, ह्या नियमाप्रमाणें मत्स्य, कूर्म, वराह व नारसिंह हे चार अवतार कृतयुगामध्यें दैत्यनाशनार्थ उत्पन्न झाले. त्रेतायुगांत वामनावतार व दत्तात्रेयाचा अवतार झाला.

## अध्याय २० वा.

### सोमप्रादुर्भाव.

पूर्वीं त्रेतायुगाचे आरंभीं हिरण्यकशिपूच्या कुलांत दहावा वंशज तृणबिंदु नांवाचा राजा असता झाला. त्याला इडविडा नांवाची एक कन्या झाली. त्यानें ती कन्या पुलस्त्य ऋषीला दिली. त्या पुलस्त्यापासून इडविडेचे ठिकाणीं विश्रव नांवाचा मुलगा झाला. त्या विश्रव्याला वेदवर्णिनी, पुष्पोत्कटा, यीका व केकसी अशा चार बायका होत्या. त्याला वेदवर्णिनीचे ठिकाणीं वैश्रवण म्हणजे कुबेर नांवाचा मुलगा झाला; केकसीचे ठायीं रावण नांवाचा मुलगा झाला. त्या रावणाला आठ पाय, वीस हात व दाहा मुखें होतीं. त्या रावणाचा नाशहि रामाच्या हातून झाला. हाच रावण द्वापारयुगांत शिशुपाल नांवानें उत्पन्न झाला होता. अत्रीला दाहा बायका होत्या. त्याचे ठिकाणीं भद्रा, शूद्रा, मद्रा, नलदा, जलदा, ऊर्णा, पूर्णा, गोपुच्छला, तामरसा, रक्तकोटिका

ह्या दहा मुली झाल्या; व त्या दाहाही मुली अत्रीनें सूर्याला अर्पण केल्या. नंतर भद्रेचे ठिकाणीं सूर्यापासून चंद्र (सोम) उत्पन्न झाला. त्या चंद्रानें पुष्कळ तप केलें; त्या वेळीं चंद्राच्या नेत्रांतून सोमरस निघूं लागला; व त्या सोमरसाच्या योगें सर्वत्र औषधींची उत्पत्ति झाली. नंतर ह्या चंद्राला दक्षानें आपल्या सत्तावीस रोहिण्यादि कन्या अर्पण केल्या. चंद्रानें सत्तावीस कन्यांसह राजसूययज्ञ केला. राजसूययज्ञांतीं तो चंद्र सर्वांना आल्हाद देता झाला.

---

# अध्याय २१ वा.

## चंद्राला क्षयरोगप्राप्ति.

पूर्वीं ब्रह्मदेवाच्या अंगठ्यापासून दक्षाची उत्पत्ति झाली. ब्रह्मदेवानें दक्षाला प्रजा उत्पन्न करण्याची आज्ञा दिली असतां दक्षानें साठ कन्या उत्पन्न केल्या. त्यांपैकीं दहा कन्या यमधर्माला दिल्या. तेरा कन्या कश्यपाला दिल्या. सत्तावीस कन्या चंद्राला दिल्या. चार कन्या अरिष्टनेमीला दिल्या. दोन कन्या कृशाश्वाला दिल्या. दोन अंगिरसाला दिल्या. आतां त्या दक्षकन्यांचीं नांवें सांगतों. मरुत्वती, वसु, जामी, लंबा, भानु, अरुंधती, संकल्पा, मुहूर्ता, साध्या व विश्वा ह्या दक्षाच्या दहा कन्या धर्माला म्हणजे यमधर्माला दिल्या होत्या. अदिति, दिति, दनु, अरिष्टा, सुरसा, सुरभि, विनता, क्रोधवशा, इला, कद्रू, त्विषा, वसु व काष्ठा ह्या तेरा कन्या दक्षानें कश्यपाला दिल्या. दक्षानें चंद्राला ज्या सत्तावीस कन्या अर्पण केल्या. त्यांपैकीं चंद्राचें खरें प्रेम रोहिणी-वर होतें. त्या वेळीं इतर चंद्राच्या सव्वीस बायका पिता जो दक्ष त्याकडे येऊन चंद्राबद्दल गाऱ्हाणीं सांगूं लागल्या कीं, चंद्र रोहिणीवरच प्रेम करितो; व आम्हांकडे ढुंकून सुद्धां पाहत नाहीं. हें ऐकतांच दक्ष मुलींना बरोबर घेऊन चंद्राकडे गेला; व त्यानें चंद्राला सर्वांवर सारखें प्रेम करण्यास सांगितलें; परंतु तें दक्षवाक्य चंद्रानें न मानिल्यामुळें दक्षाला राग आला; व त्यानें चंद्राला शाप दिला कीं, तूं क्षयरोगी होशील. असा शाप मिळतांच चंद्राला फार वाईट वाटलें; व तो दक्षाला शापमुक्त करण्याबद्दल विनवूं लागला. त्या वेळीं दक्षाला चंद्राची दया आली, व तो चंद्राला म्हणाला कीं, शंकराची जर तूं आराधना करिशील तर शापमुक्त होशील; हे चंद्रा! तूं आतां पश्चिमदिशेला जा; व समुद्राच्या काठीं कृतस्मरपर्वतावर तीनशे धनुष्य लांब एक प्रभास नांवाचें क्षेत्र आहे; व

त्याठिकाणीं शंकराचें राहण्याचें मुख्य स्थान आहे. त्या ठिकाणीं तूं जाऊन एकाग्र अंत:करणानें शिवाराधना कर; व घोर तप कर आणि शंकराला प्रसन्न करून घे; म्हणजे तुला उत्तम स्वरूप प्राप्त होऊन तूं शापमुक्त होशील.

## अध्याय २२ वा.

### चंद्रवरप्रदान.

दक्षानें सांगितल्याप्रमाणें चंद्र कृतस्मरपर्वतावर जाऊन प्रभासक्षेत्राला प्राप्त झाला; व घोर तप करूं लागला. चार हजार वर्षें तप करितांच मी प्रसन्न होऊन चंद्राला वर देण्यास तयार झालों; नंतर चंद्रानें पुष्कळ प्रकारें स्तुति करून मला ह्मटलें कीं, हे शंकर! मला दक्षानें शाप दिला आहे, करितां आपण माझा शाप नष्ट करून मला पूर्ववत् करा; नंतर मी त्याला ह्मणालों कीं, तुला पूर्ववत् कान्ती प्राप्त होईल; व तुझा क्षयरोग न्यूनाधिकप्रमाणांत क्षयवृद्धिरूपानें कायम राहील; अर्थात् तुला पूर्वींप्रमाणें कांती प्राप्त होऊन तूं आनंदांत राहशील. त्याठिकाणीं प्रभा ( कांति ) रहित चंद्राला प्रभा प्राप्त झाली; ह्मणून त्या क्षेत्राला प्रभासक्षेत्र ह्मणतात. हें प्रभाख्यान व चंद्रवरप्रदाख्यान जे श्रवण करितील ते सर्व पापापासून मुक्त होऊन शिवलोकीं प्राप्त होतील.

## अध्याय २३ वा.

### सोमेश्वरमहात्म्य

शंकर ह्मणतात; हे पार्वती! नंतर चंद्र शांतचित्त होऊन मोठ्या आनंदानें प्रभासक्षेत्राला प्राप्त झाला. मी पूर्वीं चंद्राला ज्याप्रमाणें सांगितलें होतें त्याप्रमाणें सर्व कांहीं करून व उत्तम शिवलिंग घेऊन, समुद्राच्या मध्यभागीं जाऊन आणि सेवकांसह विश्वकर्म्याला बोलावून त्यानें त्याला आज्ञा केली कीं, हे विश्वकर्मन्! हें लिंग मला शंकरानें दिलें आहे, तें तूं घे व त्याची योग्यस्थानीं स्थापना कर. मी आतां घरीं जाऊन सर्व यज्ञसामुग्री यज्ञ करण्याकरितां घेऊन येतों. असें चंद्र विश्वकर्म्याला सांगून तो चंद्रलोकाला निघून गेला. आपल्या उपाध्यायाला सर्व साहित्य घेऊन उत्तम अशा प्रभासक्षेत्राचे ठिकाणीं

जाण्याविषयीं व तेथें तेथें दानधर्मादि पुण्य कृत्यें करण्याविषयीं सांगितलें व तो चंद्र त्वरेनें ब्रह्मलोकाला गेला. चंद्राचा उपाध्यायहि चंद्राच्या आज्ञेप्रमाणें जय्यत तयारी करून चंद्राची वाट पहात बसला; नंतर चंद्रहि ब्रह्मदेवासह तेथें येऊन विश्वकर्म्याच्या साहाय्यानें यज्ञादि करूं लागला. उत्तम मंडप घालून व त्यांत आठ कुंडें मांडून ब्रह्मदेव व विश्वकर्मा ह्यांच्या आज्ञेप्रमाणें यज्ञ समाप्त करून नंतर त्यानें सोमेश्वराची स्थापना केली व कित्येक दिवस-पर्यंत चंद्र त्या लिंगाची आराधना करूं लागला. त्या सोमेश्वराच्या आराधना-रूपी पुण्यानें व सोमेश्वराच्या स्तवनानें चंद्र पापमुक्त होऊन तेजःपुंज झाला.

---

# अध्याय २४ वा.

## सोमवारव्रतमाहात्म्य.

चंद्रानें प्रभासक्षेत्रीं लिंगस्थापना केव्हां केली, कशी केली व कां केली असा पार्वतीनें शंकराला प्रश्न केला असतां शंकर म्हणतात; हे पार्वती ! वैवस्वत मन्वन्तरामध्यें दहाव्या महायुगांतील त्रेतायुगांत दुर्वासाच्या शापानें चंद्र क्षयी असा झाला असतां हजारों वर्षें निघून गेल्यावर माझ्या दर्शनाकरितां चंद्र एकदां कैलासपर्वतावर प्राप्त झाला व तो माझी स्तुति करूं लागला; नंतर मी संतुष्ट होऊन त्यास आत्मलिंग दिलें; व त्या लिंगाच्या पूजनानें चंद्र क्षयरोगापासून मुक्त झाला; नंतर चंद्रानें विश्वकर्म्याच्या साहाय्यानें तेथें मोठें देवालय बांधिलें. शंकर म्हणतात; पार्वती ! आतां तुला सोमवारव्रताचें माहात्म्य सांगतों; ऐक. कैलासपर्वताच्या उत्तर दिशेला एक स्वयंप्रभा नांवाची नगरी आहे. त्याठिकाणीं घनवाहन नांवाचा एक गंधर्व राहत असे. त्याला सुस्वरूप अशी बायको होती. तिच्यासह तो गंधर्व अनेकप्रकारच्या तेथें क्रीडा करीत असे. कांहीं कालानें त्या गंधर्वाला एक मुलगी झाली. तिचें गंधर्वसेना असें नांव होतें. गंधर्वसेना हजारों कन्यांमध्यें अत्यंत रूपवती होती. एकदां गंधर्वपत्नीनें कन्येचा विवाह करण्याबद्दल घनवाहन गंधर्वाला सुचविलें असतां तो योग्य वराचा शोध करूं लागला. पुष्कळ दिवस वराचा शोध करीत असतांहि कन्येला योग्य वर मिळेना. एके दिवशीं वसंतऋतूमध्यें गंधर्वसेना झोंपाळ्यावर बसून झोंपा घेत असतां विमानांत बसून आकाशमार्गानें गमन करणाऱ्या शिखंडी नांवाच्या गंधर्वानें तिला अवलोकन केलें; व तिच्या मुखांतून निघालेलें "माझ्या सारखें सौंदर्य त्रैलोक्यांत कोणाचेंहि नाहीं." असें वाक्यहि श्रवण केलें. हा त्या कन्येचा रूप-

गर्व श्रवण करून शिखंडीनें तिला शाप दिला कीं, तुझें सर्व शरीर कुष्ठरोगी होईल. हा शाप ऐकतांच गंधर्वकन्या त्याला शरण गेली. नंतर शिखंडीनें उच्छाप दिला कीं, हिमालय व विंध्य ह्या दोन पर्वतांच्यामध्यें गोशृंग नांवाचा ऋषि राहतो; तो तुझे सर्व दोष नाहींसे करील; असें म्हणून शिखंडी निघून गेला; व ती खिन्न होऊन आईबापला सर्व सांगती झाली. नंतर ती कन्या मातापितरांसह गोशृंगऋषीजवळ जाऊन सर्व कथा त्यास सांगती झाली. नंतर त्या ऋषीनें तिला सोमवारव्रताचा विधि सांगून सोमेश्वर पूजन करण्यास सांगितलें.

# अध्याय २५ वा.

## सोमेश्वरमाहात्म्य.

गंधर्वसेनेचा पिता जो घनवाहन गंधर्व तो आपल्या कन्येला शिखंडीच्या सांगण्यावरून हिमालय पर्वतावर बसलेल्या गोशृंगनामक ऋषीकडे गेला; व त्यास त्यानें सोमवारव्रताचें माहात्म्य विचारिलें. त्या वेळीं गोशृंगऋषी गंधर्वाला म्हणतो कीं, सोमवारव्रत सर्व रोगाचें नाशन करणारें असून सर्वप्रकारच्या सिद्धि देणारें आहे; व सर्व इच्छा पूर्ण करणारें आहे. ब्रह्मदेवानें व विष्णुप्रमुख देवांनींहि सोमवारव्रताच्या आचरणानेंच अनेकप्रकारच्या सिद्धि मिळविल्या; तसेंच दक्षाच्या शापानें क्षयी बनलेल्या चंद्रानेंहि क्षयनाशार्थ ह्याच व्रताचें आचरण केलें होतें. ज्या वेळीं शंकराचें प्रभासक्षेत्रीं शिवलिंग स्थापून व त्याचें पूजन करून चंद्रानें शंकराला संतुष्ट केलें, त्या वेळीं शंकर प्रसन्न होऊन त्यानें चंद्राला इष्ट वर मागण्यास सांगितलें. नंतर शंकर प्रसन्न होऊन वर देण्यास सिद्ध झाला आहे, असें जाणून चंद्र शंकरास म्हणाला कीं, जें हें मी शिवलिंग स्थापित केलें आहे, तें माझ्या नांवानें प्रसिद्ध होऊन त्याच्या पूजनानें सर्व इच्छा पूर्ण व्हाव्या, असा वर द्या. नंतर शंकरानें तें लिंग सोमेश्वर या नांवानें प्रसिद्ध करून त्यास अनेकप्रकारचें सामर्थ्य दिलें; व शंकर स्वस्थानाला निघून गेले. तेव्हां मी तुम्हाला आतां ह्या सोमेश्वराचें व सोमवारव्रताचें माहात्म्य सांगतों. जे कोणी ह्या सोमेश्वरलिंगाचें पूजन करितील ते सर्व रोगापासून मुक्त होऊन व ऐहिक सुख भोगून अंतीं शिवलोकाला जातील. कोणत्याहि महिन्याच्या शुक्लपक्षांतील सोमवारीं प्रातःकाळीं उठून शुचिर्भूतपणानें स्नानसंध्यादि नित्यकर्म समाप्त करावें. नंतर सपाट जागेवर एका कुंभाची स्थापना करून तो कुंभ आंब्याच्या पानांनीं अच्छादित

करावा. नंतर त्या कुंभावर पूर्णपात्र ठेवून, त्या पात्रांत शिवलिंगाची स्थापना करावी. त्या लिंगाचे सभोंवार आठ दिशेला शंकराच्या आठ मूर्तींची स्थापना करावी. ह्याप्रमाणें स्थापना झाल्यावर पांढऱ्या रंगाच्या फुलांनीं, शिवलिंगाची व अष्टमूर्तींची पूजा करावी. अनेकप्रकारचे भक्षभोज्य पदार्थ व फळफळावळहि शंकराला अर्पण करावी. "**ॐ नमः पंचवक्राय दशबाहुत्रिनेत्रिणे ॥ श्वेतवृषभमारूढ श्वेताभरणभूषित ॥ उमादेहार्धसंयुक्त नमस्ते सर्व मूर्तये ॥**" ह्या मंत्रानें प्रत्येक उपचार शंकराला अर्पण करावा. नंतर अहोरात्र शिवध्यान व शिवनामस्मरण करावें; असें केलें असतां अठराप्रकारचीं कुष्ठें शिवकृपेनें नष्ट होतात. दुसऱ्या सोमवारीं करंजवृक्षाच्या काष्ठानें दांत घासावे; स्नानादि नित्यविधि उरकून ज्येष्ठाशक्तिसह शिवलिंगाची आराधना करावी; व कमळांनीं शिवाची पूजा करावी. तिसऱ्या सोमवारीं आघाड्याच्या काष्ठानें दंतधावन करावें व शंकराला डाळिंबाचें फळ अर्पण करून, जाईच्या फुलांनीं शिवपूजा करावी; आणि रात्रीं द्राक्षें खाऊन सिद्धियुक्त शिवाचें पूजन व नामस्मरण करावें चवथ्या सोमवारीं उंबराच्या काष्ठानें दांत घासून, सूक्ष्मानामक देवीसह शिवपूजा करावी; व रात्रीं शर्करा भक्षण करावी. पांचव्या सोमवारीं गणपतीसह व विभूतीसह कुंदाच्या फुलांनीं शिवपूजा करावी. त्या दिवशीं पिंपळाच्या काष्ठानें दंतधावन, व द्राक्षारसानें अर्घ्यप्रदान करून रात्रीं फक्त केळीं खावी व शिवनामस्मरण करावें; ह्मणजे अश्वमेधाचें फल मिळतें. साहाव्या सोमवारीं सुरूप नामक शंकराचें पूजन करून रात्रीं कर्पूर प्राशन करावा. सातव्या सोमवारीं मोगऱ्याच्या काष्ठानें दंतधावन करावें व शंकराची आराधना करावी. शंकराला लिंबाचें फळ अर्पण करावें; व जाईच्या फुलांनीं शिवपूजा करावी; व रात्रीं लवंग खावी; त्यायोगें अनंत फलें प्राप्त होतात. आठव्या सोमवारीं अमोघा नांवाच्या शक्तीनें युक्त अशा शंकराची कोरंटीच्या फुलांनीं पूजा करावी व रात्रीं दूध प्यावें. ह्यायोगें कोट्यावधि गंगास्नाचें फल प्राप्त होतें; व नवव्या सोमवारीं सोमवारव्रताचें उद्यापन करावें. उद्यापनाचे वेळीं पताकाध्वज ह्यांनीं भूषित असा मोठा मंडप तयार करून त्यांत चार यज्ञकुंडें तयार करावींत. मध्यभागीं मोठी वेदी व त्यामध्यें एक मोठें पद्माकार स्वस्तिक तयार करावें. त्या वेदीच्या आठ दिशेला आठ कलश मांडून त्यांवर आठ शिवमूर्तींची सशक्तिक स्थापना करावी; व मध्यभागीं पद्माकार स्वस्तिकांवर सोमेश्वराची स्थापना करावी; नंतर जो आपला गुरु असेल त्याला सत्कारपूर्वक वस्त्रालंकार द्यावेत; व स्वतः पंचगव्यादि प्राशन करून सोमेश्वराचें चिंतन करावें; नंतर दूध, खडिसाखर यांचा नैवेद्य दाखवावा. याप्रमाणें हें

सोमवारव्रत उद्यापनासह आचरण करावें. शंकर ह्मणतात; पार्वती! ह्याप्रमाणें गोशृंगानें गंधर्वाला सोमवारव्रतविधि सांगितला असतां तो गंधर्व आपल्या मुलीला बरोबर घेऊन प्रभासक्षेत्राला प्राप्त झाला; व तेथें सोमेश्वराचें पूजन करून व सोमवारव्रताचें अनुष्ठान करून मला संतुष्ट करता झाला. ह्या व्रताच्या प्रभावानें गंधर्वसेना कुष्ठरोगापासून मुक्त झाली.

## अध्याय २६ वा.

### गन्धर्वेश्वरमाहात्म्य.

ह्याप्रमाणें गंधर्वाला वर मिळाला असता तो गंधर्व आनंदित होऊन तेथें एक शिवलिंग त्यानें स्थापित केलें. तें लिंग सोमेश्वराच्या उत्तरेस व दंडपाणीजवळ आहे. त्या शिवलिंगाचें गंधर्वेश्वर हें नाम आहे. ह्या गंधर्वेश्वर लिंगाचें जो पंचमीला पूजन करितो तो सर्व दुःखापासून मुक्त होतो.

## अध्याय २७ वा.

### गंन्धर्वसेनेश्वरमाहात्म्य.

पूर्वोक्त घनवाह गंधर्वाच्या गंधर्वसेना नामक कन्येनें तेथें गंधर्वसेनेश्वर नांवाचें लिंग स्थापित केलें आहे. त्या गंधर्वसेनेश्वरालाच विमलेश्वर असें दुसरें नांव आहे. जी कोणी स्त्री तृतीयेच्या दिवशीं ह्या गंधर्वसेनेश्वराचें पूजन करिते ती सर्व दुःखापासून, दारिद्र्यापासून व दुर्दैवापासून मुक्त होते; व तिच्या सर्व इच्छा पूर्ण होतात. शंकर म्हणतात; पार्वती! ह्याप्रमाणें हें कथानक तुला सांगितलें आहे. हें श्रवण केलें असतां सर्व प्राणी पापापासून मुक्त होतात.

## अध्याय २८ वा.

### तीर्थयात्राविधान.

शंकर म्हणतात; पार्वती! हेमंतऋतूंमध्यें, शिशिरऋतूंमध्यें किंवा वसन्तऋतूंमध्यें अथवा ज्या वेळीं आपणाजवळ पुष्कळ द्रव्यादि वस्तूंची अनुकूलता

असेल त्या वेळीं यात्रा करण्यास प्रारंभ करावा. यात्रेमध्यें भक्ति व श्रद्धा हीं प्रमाणभूत कारणें होत. मनानेंच मांझें चिंतन करून पितरांच्या नांवानें श्राद्ध करावें; व नंतर यात्रा करण्याकरितां बाहेर पडावें. कामक्रोधादि षड्रिपूंचा त्याग करावा. गंगादितीर्थांचेठिकाणीं जाऊन यात्रा करणें यज्ञादिकाहून अधिक फल देणारें आहे. कलियुगांत मोठमोठीं भयंकर पातकें नष्ट करण्यास तीर्थयात्रेसारखें दुसरें कोणतेंहि उच्चतम साधन नाहीं. जे कोणी तीर्थयात्रा करितात तेच कृतार्थ होऊन जन्माला आल्याचें साफल्य करितात; व इतर लोक व्यर्थ जन्मास येऊन पृथ्वीला भारभूत होतात. सर्व जलाशया ( विहीरी, सरोवरा ) मध्यें जसा समुद्र श्रेष्ठ आहे, तसेंच सर्व क्षेत्रामध्यें प्रभासक्षेत्र श्रेष्ठ आहे. जो कोणी प्रभासक्षेत्रांत असणाऱ्या पुण्यतीर्थांत स्नानादि न करितां व तीन दिवस उपोषणादि न करितां गोप्रदानादि सत्कर्म करीत नाहीं तो दरिद्री होतो. ज्याचे हात व पाय बळकट असून ज्याचें मन सुसंस्कृत आहे, व ज्यानें वेदशास्त्राध्यायन व तपश्चर्या केली आहे, त्यासच तीर्थयात्रांचा लाभ होतो. जो मिताहार, स्नान व जपजाप्य करणारा त्यालाच तीर्थयात्रेचें फल प्राप्त होतें. तीर्थयात्रा गाडींत बसून केली तरी कांहीं हरकत नाहीं; परंतु पायानें तीर्थ-यात्रा करणारास अधिक फल प्राप्त आहे; व तें सर्वश्रेष्ठ तप होय. जो कोणी ब्राह्मण पादत्राण ( जोडे, वाहाणा, बूट वगैरे ) पायांत न घालतां व मस्तकावर छत्रीहि न घेतां भिक्षा मागत मागत जितेन्द्रिय होऊन यात्रा करितो, तो पंचमहापात-कांतून मुक्त होतो. जो कोणी शूद्र ब्राह्मणाचा वेष घेऊन भिक्षा मागून तीर्थ-यात्रा करितो, तो दुर्गतीला प्राप्त होतो. स्वतःच्या द्रव्यादिकांवर अवलंबून तीर्थयात्रा केली असतां त्यास तीर्थयात्रेचें षोडशांश फल मिळतें. आई, बाप, भाऊ, मित्र व गुरु ह्यांच्या उद्देशानें तीर्थांत स्नान केलें असतां त्याचें स्नान करणारासहि षोडशांश फल मिळतें. जे कोणी ब्राह्मण ह्या तीर्थांचें काठीं महादा-नांचें ग्रहण करितात ते ब्राह्मणरूपधारी वृक्षच होत; व ते मरणोत्तर ब्रह्मराक्षस होतात. अन्य ठिकाणीं केलेलें पाप तीर्थांत स्नान केल्यानें नष्ट होतें; परंतु तीर्थाचे ठिकाणीं केलेलें पाप कोठेंहि नष्ट होत नाहीं. कृतयुगांत पुष्करक्षेत्र श्रेष्ठ, त्रेतायुगांत नैमिषक्षेत्र श्रेष्ठ, द्वापरयुगांत कुरुक्षेत्र श्रेष्ठ व कलियुगांत प्रभासक्षेत्र श्रेष्ठ होय. प्रभासयात्रा करणाऱ्या पुरुषास हजार युगें एका पाया-वर उभें राहून तप केल्याचें फल मिळतें. प्रथमतः प्रभासयात्रा करणाऱ्यानें कपर्दीश्वराचें दर्शन घेऊन नंतर सोमेश्वराजवळ यावें. तेथें क्षौरविधि करून उपवासादि कृत्यें करावींत; व दानधर्म आचारावा. कृतयुगांत तपश्चर्या, त्रेता-युगांत ज्ञानप्राप्ति, द्वापारयुगांत सेवा व कलियुगांत दानधर्म हीं श्रेष्ठ आहेत. प्रभासक्षेत्रांत प्रतिपदेला सुवर्णदान द्यावें. द्वितीयेला वस्त्र, तृतीयेला

पृथ्वी, चतुर्थीच्या दिवशीं धान्य, पंचमी तिथीला कपिला गाय, षष्ठीला घोडा, सप्तमीला म्हैस, अष्टमीला बैल, नवमीला गृहदान, दशमीला सुगंधि पदार्थ, एकादशीला मोती, द्वादशीला पोंवळी, त्रयोदशीला स्त्रिया, व अमावास्येला सर्वप्रकारचीं दानें द्यावींत. जे कोणी प्रभासक्षेत्रांत मृत होतात, ते शिवलोकीं जातात. कोणी स्नानप्रभावानें तर कोणीं दानाच्या योगें; कोणीं शिवलिंगाच्या पूजनानें तर कोणीं जपजाप्याच्या योगें माझ्या लोकाला प्राप्त होतात. "**ॐ नमो देवदेवाय क्षितिकण्ठाय दण्डिने ॥ रुद्राय वामहस्ताय चक्रिणे वेधसे नमः ॥ सरस्वती च सावित्री वेद-माता विभावरी ॥ संनिधानं कुरुष्वात्र तीर्थे पापप्रणाशिनि ॥**" हा मंत्र म्हणून प्रभासतीर्थांत स्नान करावें. आतां तुला कसकशा यात्रा कराव्या, प्रथम कोणत्या तीर्थांत नंतर कोणत्या तीर्थांत स्नान करावें तो क्रम सांगतों.

---

## अध्याय २९ वा.

### तीर्थस्नानक्रम.

शंकर म्हणतात, पार्वती ! प्रथम अग्नितीर्थांत स्नान करावें, ज्याठिकाणीं सरस्वतीनें वडवाग्नीची स्थापना केली आहे. त्यानंतर सोमेश्वराच्या दक्षिणेस पद्मतीर्थ आहे, तेथें स्नान करावें. स्नान करण्यापूर्वी सोमेश्वराजवळ क्षौरविधि करावा. सर्व पातकें केशामध्यें वास्तव्य करीत असल्यामुळें, तीर्थाचे काठीं क्षौर करून पापमय केशांचा त्याग करावा; असा शास्त्रनियम आहे. स्नान केल्यानंतर तर्पण करावें. गंगेचे काठीं, सूर्यक्षेत्रामध्यें, आईबाप मृत झालें असतां, सोमपान केलें असतां अगर गर्भाधानादिविधीमध्यें क्षौरकर्म अवश्य करावें. मंत्रोच्चार न करितां, पर्वणी नसतां, क्षौरकर्म केलें नसतां समुद्रादितीर्थांना दर्भा-ग्रांनींसद्धां स्पर्श करूं नये. तीर्थस्नान केल्यावर स्वर्णादिकांचें दान करावें. दान देते वेळीं "**ॐ नमो विष्णुगुप्ताय विष्णुरूपाय ते नमः॥सांनिध्ये भव देवेश सागरे लवणाम्भसि ॥**" हा मंत्र ह्मणावा; नंतर "**अग्निश्च रेतो मृडया च देहो रेतोधा विष्णुरमृतस्य नाभिः ॥**" हा मंत्र ह्मणून स्नान करावें व देव, पितर व मनुष्यें ह्यांस तृप्त करावें. क्षौर केल्यानंतर तेथें वृषभदान करावें. ह्या प्रभासक्षेत्रांत पांच कोटी लिंगें व तीर्थें आहेत.

---

# अध्याय ३० वा.

## सोमेश्वरपूजन.

ह्याप्रमाणें अग्निकुंडांत स्नान करून तर्पणादि करावें; व गंधपुष्पांनीं तीर्थ-राजाची पूजा करावी; नंतर कपर्दीश्वराचें दर्शन घ्यावें. कपर्दीश्वराचें पूजन करून " गणानां त्वा " ह्या मंत्रानें देवाला अर्घ्य द्यावें. नंतर सोमेश्वराचें दर्शन घ्यावें. तेथें स्नान करून शतरुद्रीय मंत्राचा जप करावा. रुद्रसूक्तानें त्या देवाला स्नान घालावें; व त्या शिवलिंगाची पूजा करावी. मध, साखर, कुंकुम, कापूस, कस्तुरी, चंदन, धूप, दीप, दहिं, तूप, दूध, वस्त्रें, नैवेद्य वगैरे उपचारांनीं व पदार्थांनीं सोमेश्वरपूजन करावें. तेथें नृत्यगायनहि करावें; नंतर ब्राह्मण; तपस्वी, दीन, अंधळे, दरिद्री ह्यांना दान द्यावें. ह्याप्रमाणें केलें असतां सर्व तीर्थांत स्नान केल्याचें फळ मिळतें; व सर्व पितरांचा उद्धार होऊन तो पाप-मुक्त होतो. सोमेश्वरपूजन करणाराला जरी जन्म प्राप्त झाला तरी श्रीमान् व सज्जन कुलांत त्याचा जन्म होतो. ह्या कलियुगांत सोमेश्वराचें पूजन दुर्गतींतून मुक्त करण्यास व सद्गति देण्यास समर्थ आहे.

# अध्याय ३१ ते ३४ वा.

## सरस्वत्यवतारवर्णन.

शंकर म्हणतात; पार्वती ! ज्या वेळीं देवदैत्यांचें युद्ध होऊन त्या युद्धांत देवांचा जय झाला व दैत्यांचा पराजय झाला; त्या वेळीं सर्व देव दधीची मुनी जवळ आले; व त्यांनीं आपआपलीं शस्त्रास्त्रें दधीचीच्या स्वाधीन करून ठेविलीं, व सांगितलें कीं, हीं अस्त्रें सांप्रत दैत्यविनाश झाल्यामुळें तुमच्या जवळ ठेव म्हणून ठेवीत आहे; तरी आपण ह्यांचें उत्तमतऱ्हेनें जतन करावें; व ज्या वेळीं पुनः आम्हांला अस्त्रांची जरूरी लागेल त्या वेळीं आम्ही आपणाजवळ अस्त्रें मागण्यास येऊं; व तीं अस्त्रें नंतर आम्हांस द्यावींत; असें नम्रपूर्वक देवांनीं दधीचीस सांगून व त्याचे हवाली तीं सर्व अस्त्रें करून सर्व देव स्वस्थानीं निघून गेले. मध्यंतरीं कांहीं दिवस निघून गेल्यावर दधीचीच्या मनांत उत्तर दिशेला तप करण्याचें आलें असतां दधीचि सुभद्रानामक आपल्या दासीला म्हणतो कीं, मी तप करण्याकरितां उत्तरदिशेला जाणार आहे, करितां इन्द्रादि देवांनीं मज-

जवळ ठेव म्हणून ठेविलेलीं शस्त्रास्त्रें घेऊन माझ्याबरोबर चल. नंतर दधीचीला सुभद्रेनें म्हटलें कीं, मी हीं सर्व शस्त्रास्त्रें वाहून नेण्यास असमर्थ आहे. असें दासीचें भाषण ऐकतांच दधीचीनें तीं सर्व शस्त्रास्त्रें निर्वीर्य करून तेथेंच टाकिलीं, व त्यांचें वीर्य स्वतः पाण्याबरोबर प्राशन केलें, व तो दधीचि दासीसह उत्तर दिशेला तप करण्याकरितां गेला. एकदां ती सुभद्रानामक दासी रजस्वला असतां चवथे दिवशीं शुक्रमिश्रित दधीचीनें नेसून टाकलेलें वस्त्र परिधान करून नदीवर स्नानाला गेली. स्नान करीत असतां दधीचीचें वस्त्रलग्नवीर्य सुभद्रेच्या गुह्येंद्रियांत प्रविष्ट झाल्यामुळें ती गरोदर राहिली, व तिला पिप्पलाद-नांवाचा मुलगा झाला. नंतर कांहीं दिवसांनीं इंद्रादिदेव दधीचीजवळ ठेविलेलीं शस्त्रास्त्रें मागण्याकरितां आले असतां दधीचि देवांना म्हणतो कीं, मी सर्व शस्त्रास्त्रांचें वीर्य प्राशन केलें आहे, व तुम्हीं दिलेलीं शस्त्रास्त्रें निर्वीर्य करून ज्या जागीं तुम्ही मला शस्त्रास्त्रें दिलींत त्याच जागीं टाकिलीं आहेत. आतां जर तुम्हांला शस्त्रास्त्रें पाहिजे असतील तर मी हा देह तुम्हाला अर्पण करितों; व तुम्ही माझ्या अस्थींचीं अस्त्रें तयार करून घेऊन जा. नंतर दधीचीनें स्वतःच्या अस्थि देवांना अर्पण केल्या. देवांनींहि विश्वकर्म्याच्या साहाय्यानें दधीचीच्या अस्थींचीं शस्त्रास्त्रें तयार केलीं; व शस्त्रास्त्रें घेऊन सर्व देव स्वस्थानाला निघून गेले. देवांच्यामुळें आपला पिता दधीचि मृत झाला, असें जाणून पिप्पलादानें वडवा नामक कृत्या देवांच्या नाशार्थ निर्माण केली; व देवांच्या नाशार्थ पाठविली. नंतर देवांनीं विष्णूला सांगून वडवेला विष्णूकडून पाण्यांत वास्तव्य करण्याची आज्ञा केली; व तेव्हांपासून वडवेचें सतत पाण्यामध्यें वास्तव्य असतें. ज्या वेळीं वडवेचें समुद्रामध्यें गमन व्हावयाचें त्या वेळीं ब्रह्मदेवानें सरस्वतीला सर्व ऋषी व देवता ह्यांसह प्रभासतीर्थामध्यें प्रगट होण्यास सांगितलें. नंतर सरस्वती तेथें प्रगट होऊन सर्वांना पावन करिती झाली. ह्या सरस्वतीचे काठीं पुष्कळ तीर्थें व शिवलिंगें स्थापित झालीं आहेत. त्या सरस्वतीला हरिणी, वज्रिणी, न्यंकु, कपिला व सरस्वती अशीं पांच नांवें पंचमहापातकांचा नाश करण्याकरितांच कीं काय प्राप्त झालीं. ज्या ठिकाणीं सरस्वतीचा व समुद्राचा संगम झाला आहे, तेथेंच हें वाडवतीर्थ म्हणजे अग्नितीर्थ निर्माण झालें आहे. ह्या अग्नितीर्थांत स्नान करून कपर्दीश्वराचें पूजन केलें असतां सर्व पापांची निवृत्ति होऊन मोक्षप्राप्ति होते. हें आख्यान श्रवण केलें असतां ऐहिक सुख-प्राप्ति होऊन अंतीं शिवलोकप्राप्ति होते.

# अध्याय ३५ वा.

## अग्नितीर्थमाहात्म्य.

शंकर म्हणतात; पार्वती! एकदां सर्व क्षत्रियांनीं द्रव्यप्राप्तीच्या इच्छेनें निर्ब्राह्मण पृथ्वी करण्याकरितांच कीं काय सर्व ब्राह्मणांचा गर्भासुद्धां नाश करण्याचा सपाटा चालविला. त्या गरोदर ब्राह्मण स्त्रीपैकीं एका स्त्रीनें आपला गर्भ क्षत्रियांच्या भीतीनें ऊरू ( मांडीं ) मध्यें गुप्तरीतीनें रक्षण करून ठेविला होता. कांहीं काळानें तो गर्भ मांडींतून म्हणजे ऊरूंमधून बाहेर पडला म्हणून त्या गर्भाचें नांव और्व असें ठेविलें. त्या और्वाला क्षत्रियांचें ब्रह्मवधरूपी दुष्ट कृत्य समजतांच त्यानें सर्व क्षत्रियांचा विनाश करण्याचा उद्योग सुरू केला. हें वर्तमान ब्रह्मदेवाला समजतांच, और्वाचा बंदोबस्त करण्याकरितां सरस्वतीची योजना केली. ब्रह्मदेवाच्या आज्ञेनें सरस्वती और्वाला बरोबर घेऊन, प्रथम हिमालयपर्वतावर प्राप्त झाली. नंतर ती सरस्वती पश्चिम दिशेनें वाहत वाहत गुप्तरीतीनें पृथ्वींत शिरून, पुढें वाहूं लागली. ज्याठिकाणीं सरस्वती पृथ्वींत शिरली, त्या स्थानाला गंधर्वकूप असें म्हणतात. नंतर सरस्वती भूतीश्वर, श्रीकंठ, कुरुक्षेत्र, विराटनगर, गोपायनपर्वत, मार्कण्डेयाश्रम, गोलांगूलक्षेत्र, काकतीर्थ, धारेश्वर, गंगोद्भेद, संगमेश्वर, कोटीश्वरतीर्थ, शंभुकुंडेश्वर-सिद्धेश्वर, सिद्धवट, पिंडतारक, नरतीर्थ, पुंडरीकतीर्थ, वालखिल्येश्वर, महोदयतीर्थ, गंगासमागमतीर्थ, एकद्वारतीर्थ, गुहेश्वर, वटेश्वर, मुंडीश्वर, मांडव्येश्वर, पीलुकर्णिकतीर्थ, द्वारवतीतीर्थ, गोवत्सतीर्थ, लोहयष्टिकातीर्थ, बालक्रीडनकीतीर्थ, रुद्रतीर्थ, नखतीर्थ, कूष्माण्डेश्वरतीर्थ, खादिरामोदतीर्थ, ह्याप्रमाणें अनेक तीर्थें व क्षेत्रें हिंडत हिंडत सरस्वतीनदी और्वाला घेऊन, प्रभासक्षेत्रीं येऊन समुद्राला मिळाली; त्या और्वाला समुद्रांत नेऊन सरस्वतीनें सोडिलें. ज्या ठिकाणीं सरस्वतीनें और्वाला समुद्राचें स्वाधीन केलें, त्या तीर्थाला अग्नितीर्थ म्हणतात. जो कोणी अग्नितीर्थांत स्नान करतो तो अग्निलोकाला प्राप्त होतो. अग्नितीर्थांत स्नान केल्यानंतर सरस्वतीचें पूजन करून कपर्दीश्वराचें पूजन करावें. नंतर भीमेश्वर, भैरवेश्वर, चण्डीश्वर, सोमेश्वर, नवग्रहेश्वर, एकादश रुद्र, बालब्रह्मेश्वर, ह्यांचें पूजन करावें; आणि पुनः सरस्वतीमध्यें स्नान करून तेथेंच राहावें.

# अध्याय ३६ वा.

## प्राचीसरस्वतीमाहात्म्य.

शंकर म्हणतात; पार्वती ! प्रभासक्षेत्रांत असणाऱ्या प्राचीसरस्वतीचें माहात्म्य फारच अवर्णनीच आहे. जे ऋषि प्राचीसरस्वतीचें उदक प्राशन करितात ते खरोखरच धन्य होत. चंद्रभागानदी, गंगानदी व सरस्वतीनदी ह्या तीन नद्यांचें उदक प्राशन करणारे मनुष्य मनुष्यत्वाला योग्य नसून ते देवत्वालाच योग्य आहेत. पशु सुद्धां जरी प्राचीसरस्वतीचें उदक पितील तर तेहि स्वर्गाला जातील. ज्या प्राचीसरस्वतीचे काठीं अठरा हजार पुण्यवान् मुनींनीं संन्यास-दीक्षा धारण करून मुक्ति मिळविली, त्या प्राची सरस्वतीचें माहात्म्य किती वर्णन करावें ? ह्या ठिकाणीं मंकणक नामक ऋषीला सिद्धि प्राप्त झाली. जेथें मी स्वतः ब्रह्महत्याविनाशार्थ पुष्कळ वर्षे व्रताचरण केलें. ज्या ठिकाणीं अर्जुनानें ज्ञातिवधदोषाच्या नाशार्थ प्रायश्चित्तविधान केलें, असें हें प्राचीसरस्वतीचें पुण्यस्थान फारच महत्त्वाचें आहे. नंतर अर्जुनानें तेथें कसें प्रायश्चित्त विधान केलें ? असा पार्वतीनें प्रश्न केला असतां शंकर पुनः म्हणतात, हे प्रिये ? ज्या वेळीं श्रीकृष्णसाहाय्यानें अर्जुनानें सर्व कौरवांचा विध्वंस केला त्या वेळीं त्यास ज्ञातिवधरूपी स्वकृत्याचा पश्चात्ताप झाल्यामुळें तद्दोषपरिहारार्थ अर्जुन सरस्वतीचे काठीं प्राप्त झाला. त्या ठिकाणीं अर्जुनानें तीन दिवस उपोषण करून, रोज तीन वेळां स्नान करून ब्राह्मणांना अनेक दानें दिलीं. ह्यायोगें अर्जुन पापमुक्त झाला. ह्याप्रमाणें तें प्राचीसरस्वतीतीर्थ मोठें फल देणारें आहे. ह्या तीर्थांत स्नान केलें असतां, ब्रह्महत्त्यादि अनेक पापें नष्ट होतात. प्रभासक्षेत्रांत असणाऱ्या प्राचीसरस्वतीमध्यें मी तुझ्यासह नित्य वास करितों. जो प्राचीन सरस्वतीचे काठीं देहत्याग करितो, तो जन्ममरणरूपी संसारापासून मुक्त होतो; तसेंच येथें स्नान करणारास, अश्वमेधयज्ञाचें फल प्राप्त होतें. प्राचीसरस्वतीचे काठीं जो मंकणकाश्रम आहे, तेथें राहून जे उदक प्राशन करून व वायुभक्षण करून अथवा पर्णभक्षण करून किंवा तेथें असणाऱ्या वेदीवर शयन करितात त्यांस जर तेथें मृत्यु प्राप्त झाला, तर ते देवलोकाला जातात. जो कोणी येथें किंचित् अल्पमात्रहि सुवर्णदान करील, तर त्यास मेरुपर्वताचें दान दिल्याचें पुण्य प्राप्त होतें. ह्या प्राचीसरस्वतीचें काठीं जे श्राद्धादि करितात ते आपल्या एकवीस कुळांचा उद्धार करून स्वतःहि अंतकाळीं मोक्षाला जातात. ह्याठिकाणीं कृष्णपक्षांतील चतुर्दशीला अल्प पिंडांचेंहि जरी

दान करितील; तरी ते पितरांची अक्षय्य तृप्ती करून मुक्त होतील. येथें अनेक-प्रकारचीं दानें देणारांस सर्व इष्ट सुखें व मोक्षहि प्राप्त होतो. ह्या माहात्म्याच्या श्रवणानेंहि, मनुष्याला सर्व सुखें प्राप्त होतात.

# अध्याय ३७ वा.

## कंकणमाहात्म्य.

शंकर म्हणतात; पार्वती ! पूर्वी बृहद्रथ नांवाचा एक राजा होता. त्याची इंदुमती नांवाची एक भार्या होती ती. रूपवती असून पतिव्रताधर्मानें वागणारी होती. एकदां ती इंदुमती पतीसह राज्यासनांवर बसली असतां तेथें कण्व नांवाचा एक ऋषि आला. तो ऋषी आलेला पाहून राजानें त्याचें आदरातिथ्य केलें; व त्याला कुशलप्रश्न विचारूं लागला. राजा व ऋषी यांचा संवाद चालू आहे, इतक्यांत इंदुमतीनें ऋषीला प्रश्न केला कीं, हे मुने ! आपण त्रिकाल-ज्ञानी आहां, करितां माझें पूर्वजन्मींचें सर्व सदसत्कर्म कथन करा. असें मी कोणतें सत्कर्म केलें होतें कीं, ज्या सत्कर्मानें मला रूप, सौभाग्य व ऐश्वर्य प्राप्त झालें आहे. असें महाराज्ञीचें भाषण ऐकून कण्व तिला म्हणतो; हे राज्ञि ! तूं पूर्वजन्मीं शूद्रकन्या होतीस. तुला पांच पति होते. ते पांचहि तुझे पति नष्ट झाले असतां, तूं देहत्याग करण्याकरितां जेथें सरस्वती व समुद्र यांचा संगम झाला आहे, अशा प्रभासक्षेत्रांत प्राप्त झालीस. तेथें स्नान करीत असतां तुझ्या हातांतील सुवर्णकंकण समुद्रांत पडून वाहत गेलें व नष्ट झालें. सुवर्णकंकण नष्ट झाल्यामुळें तूं फार शोक केलास. शेवटीं पतिविरहानें दुःखी होऊन तेथेंच मृत झालीस. तुझ्या हातांतील सुवर्णकंकण प्रभासक्षेत्रांत समुद्रसरस्वतीसंगमा-वर पडलें, त्या पुण्यकर्मानें तुला हें रूप, सौभाग्य, ऐश्वर्य वगैरे सौख्य प्राप्त झालें आहे. ह्याप्रमाणें सांगून कण्व निघून गेल्यावर इंदुमती पतीसह प्रतिवर्षी प्रभासक्षेत्रीं सोमेश्वराजवळ येऊन स्वर्णकंकण टाकूं लागली असतां, त्या इंदुमतीला पतीसह अंतकाळीं देवत्व प्राप्त झालें.

## अध्याय ३८ वा.

### कपर्दीविनायकमाहात्म्य.

शंकर म्हणतात, पार्वती! आतां तुला कपर्दीविनायकाचें माहात्म्य सांगतों. कपर्दीविनायकाच्या डाव्या बाजूला विष्णु व उजव्या बाजूला ब्रह्मदेव राहिले आहेत. कपर्दीविनायकाला कृतयुगांत हेरंब, त्रेतायुगांत विघ्नमर्दन, द्वापारयुगांत लंबोदर अशीं भिन्न भिन्न नांवें होतीं. ज्या वेळीं द्वापार युग संपून कलियुगाला प्रारंभ होणार त्या वेळीं स्त्रिया, म्लेच्छ, शूद्र व दुसरेहि पापी लोक सोमेश्वरदर्शनानें स्वर्गाला जाऊं लागले. यज्ञ, तप, दान, वेदाध्ययन, व्रतवैकल्यें वगैरे स्वर्गप्राप्त्यर्थ अवश्य लागणारीं पुण्यकर्में करण्याची जरूरी न पडल्यामुळें सर्वत्र कर्मलोप होऊं लागला. त्या वेळीं कर्मलोपामुळें भ्यालेले देव मला शरण गेले; व त्यांनीं सर्व वर्तमान निवेदन केलें; नंतर माझ्या सांगण्यावरून तूं आपला देह मंथन करून त्यापासून विनायकाची मूर्ति निर्माण केलीस; व देवांना ह्मणालीस कीं, ही विनायकमूर्ति सर्व प्राण्यांच्या कार्यांत विघ्न उत्पन्न करील; व त्यामुळें सर्व जन अकृतकार्य झाल्यामुळें स्वर्गाला येणार नाहींत, असें म्हणून तूं त्या विनायकाची कपर्दीसंनिध स्थापना केलीस. त्या दिवसापासून पापी लोक सोमेश्वराचें दर्शन घेऊं शकलें नाहींत; व सोमेश्वरदर्शन न झाल्यामुळें पापी लोक स्वर्गाला जात नाहींसे झाले. जे कोणी पापी पुरुष सोमेश्वराचें दर्शन घेण्याकरितां जातात त्यास गलगंडादि अनेक व्याधि उत्पन्न होतात. कपर्दीविनायकाचें दर्शन घेतलें असतां सर्व तीर्थें हिंडून यात्रा केल्याचें त्यांस फल प्राप्त होतें.

---

## अध्याय ३९ वा.

### केदारेश्वरलिंगमाहात्म्य.

शंकर ह्मणतात; पार्वती! ह्याप्रमाणें कपर्दीविनायकाचें पूजन केल्यानंतर केदारलिंगाचें दर्शन घ्यावें. ह्याच केदारेश्वराला कृतयुगांत रुद्रेश्वर हें नांव होतें. जे कोणी माघाच्या महिन्यांत पद्मककुंडांत स्नान करून रुद्रेश्वराचें पूजन करितात त्यांस केदारयात्रेचें फल प्राप्त होतें. आतां ह्या केदारेश्वराबद्दल एक कथा सांगतों पूर्वी शशबिंदु नांवाचा एक राजा होता. एकदां तो राजा फिरत फिरत प्रभासक्षेत्रीं फाल्गुन शुक्ल चतुर्दशीला प्राप्त झाला. त्या वेळीं सर्व

ऋषी सोमेश्वरासन्निध बसले आहेत, असें जाणून तो राजाहि तेथें त्यांच्यासह उपवास जागरणादि करिता झाला. नंतर राजा तेथून उठून केदारेश्वराजवळ येऊन त्याचें पूजन व ध्यान करूं लागला असतां सर्व ऋषि राजाला प्रश्न करितात कीं, हे राजन् ! तूं सोमेश्वराला सोडून केदारेश्वराच्या समोर बसून ध्यान व पूजन कां करितोस? तें सांग. नंतर राजा ऋषींना म्हणतो; ऋषिवर्यहो ! माझा पूर्वजन्मीचा वृत्तांत ऐका, म्हणजे तुमची शंकानिवृत्ति होईल. पूर्वजन्मीं माझा शूद्रयोनींत जन्म झाला होता; तथापि मी ब्राह्मणांची सेवा करण्यामध्यें तत्पर असे. एकदां दुष्काळ पडल्यामुळें मी क्षुधेनें पीडित होऊन प्रभासक्षेत्रामध्यें आलों असतां येथें रामसर नांवाचें एक सरोवर मी पाहिलें. त्या सरोवरांत पत्नीसह स्नान करून व तेथील कांहीं प्रफुल्लित कमळें तोडून एका देवालयामध्यें गेलों. तेथें सायंकाळीं निजलों असतां गायनाचा शब्द माझें कानीं आला. नंतर मी तीं कमळें घेऊन ज्या बाजूनें गायनध्वनि ऐकूं येत होता त्या बाजूनें शोध करीत चाललों. कांहीं दूर गेल्यावर तेथें रुद्रेश्वर नांवाचें एक लिंग माझ्या दृष्टीस पडलें. त्या रुद्रेश्वरासंनिध एक स्त्री गीत्यनृत्यादि करीत आहे; व इतरहि कित्येक मंडळी जागरण करीत आहेत, असा देखावा माझे दृष्टीस पडला. चौकशी करितां मला असें समजलें कीं, आज शिवरात्रि असल्यामुळें तन्निमित्त हा उत्सव चालू आहे. असें मला समजतांच मींहि शिवरात्रीचें व्रत करण्याचा निश्चय केला. त्या दिवशीं मला कांहीं एक खावयास न मिळाल्यामुळें अनायासेंच उपोषण घडलें होतें. नंतर मी बरोबर आणिलेल्या कमळांनीं शंकराची पूजा केली. त्या केदारेश्वराच्या पूजनानें मला मरणांतीं राजकुलांत जन्म प्राप्त झाला आहे, व ही माझी पत्नी पूर्वजन्मींचीच स्त्री होय. त्यामुळें ह्या केदारेश्वरावर माझी फार श्रद्धा आहे. पूर्वजन्मीं मी कोणतेंहि पुण्यकर्म केलें नव्हतें तरी सुद्धां केवळ केदारेश्वराच्या पूजनानें मला एवढें मोठें फल प्राप्त झालें आहे. सांप्रत मी केदारेश्वराचें दर्शन घेऊन पूजन करीत आहे, तेव्हां ह्याहून अधीक मला कोणतें फल मिळणार आहे, तें कांहीं समजत नाहीं. ह्याप्रमाणें राजाचें भाषण ऐकून ऋषींना केदारेश्वराच्या माहात्म्यश्रवणानें मोठें आश्चर्य वाटलें. व त्यांनीं राजाची स्तुति केली. त्या दिवसापासून तो राजा पत्नीसह नित्य केदारेश्वराचें पूजन करीत असे. त्या पूजनाच्या पुण्यप्रभावानें त्या राजाला ऐहिक सुख प्राप्त होऊन अंतीं मोक्षहि मिळता झाला. ती जी पूर्वीं केदारेश्वराचें संनिध गीतनृत्यादि करणारी वेश्या स्त्री तिलाहि जन्मांतीं रंभा नावानें देवलोकीं राहावयास मिळालें. अशा रीतीनें केदारेश्वर लिंग सर्व प्रकारच्या सिद्धि देणारें आहे.

---

## अध्याय ४० वा.

### भीमेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; पार्वती ! आतां भीमेश्वराचें माहात्म्य सांगतों. पूर्वी त्रेतायुगांत स्वायंभू मन्वंतरामध्यें श्वेतकेतु नांवाचा राजर्षि होता. तो मोठा तपस्वी असून धर्मानें वागणारा होता. एकदां श्वेतकेतु प्रभासक्षेत्रामध्यें येऊन तप करूं लागला असतां मी त्याच्या तपश्चर्येनें संतुष्ट होऊन त्यास बोललों कीं, तुला जो कांहीं इष्ट वर मागून घ्यावयाचा असेल तो खुशाल मागून घे. मी तुझी इच्छा पूर्ण करण्यास तयार झालों आहे. अशा तऱ्हेनें माझें भाषण ऐकून श्वेतकेतु मला म्हणतो कीं, तुझें ठिकाणीं मला अखंड भक्ति दे; व जें हें स्थान आहे, त्या ठिकाणीं तुझें वास्तव्य असावें. नंतर तुझ्या इच्छेप्रमाणें सर्व कांहीं सिद्ध होईल, असें त्यास सांगून मी स्वस्थानीं निघून गेलों. नंतर कांहीं काळांनीं श्वेतकेतु राजानें तेथें एक शिवलिंग स्थापून त्याची नित्य तो आराधना करीत असे. त्या लिंगाला श्वेतकेत्वीश्वर लिंग असें नांव प्राप्त झालें. नंतर कलियुग प्राप्त झालें असतां पांडवांपैकीं भीमसेन नांवाचा वायूचा मुलगा त्या श्वेतकेत्वीश्वर लिंगाचे ठिकाणीं येऊन व त्याचें पूजन करून तेथें जागरण व उपोषणहि करिता झाला. त्या दिवसापासून त्याला भीमेश्वर असें नांव प्राप्त झालें आहे. ह्या भीमेश्वराच्या पूजनानें दुसऱ्या जन्मीं केलेलीं सर्व पातकें नाश होऊन व ह्या लोकीं सर्व प्रकारचें सुख भोगून अंतकाळीं माझ्या लोकाला तो प्राप्त होतो.

---

## अध्याय ४१ वा.

### भैरवेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात, पार्वती ! सोमेश्वराच्या आग्नेय दिशेला भैरवेश्वर नांवाचें एक लिंग आहे. भैरवानजीक देवमाताकुंड आहे; त्या कुंडांत स्नान करून, भैरवेश्वराचें पूजन करावें. विशेषेंकरून महानवमीच्या दिवशीं ह्या भैरवेश्वराचें पूजन केलें असतां, सर्व पापापासून निवृत्ति होऊन ऐहिक सुख प्राप्त होतें.

---

## अध्याय ४२ वा.

—:०:—

### चण्डीशमाहात्म्य.

भैरवेश्वराचें पूजन केल्यानंतर, चंडीशाचें पूजन करावें. हें चंडीशलिंग सोमेश्वराच्या ईशान्येस आहे; हें लिंग चण्डीनामक देवीनें स्थापिलें असल्यामुळें, ह्याला चण्डीश असें नांव प्राप्त झालें आहे. त्यानंतर चंड नांवाच्या माझ्या गणानेंहि ह्या चंडीशाचें पूजन केलें होतें; ह्या लिंगाला कोणी चंडेश्वर असेंहि म्हणतात. प्रथम ह्या चंडीशाला दुधानें स्नान घालावें; नंतर दहीं, तूप वगैरे पदार्थांनींहि स्नान घालून, मध व साखर ह्याप्रमाणें पंचामृतानें स्नान घातल्यावर चंदन, पुष्प, धूप, दीप वगैरे पदार्थांनीं चंडीशाचें पूजन करावें; आणि ब्राह्मणांना दक्षिणा द्यावी. जें जें चंडीशासंनिध दान दिलें जातें, तें तें अक्षय्य फल देणारें होतें. जे कोणी चंडीशासंनिध पितरांना उद्देशून श्राद्धादि करितात, त्यांचे पितर कल्पपर्यंत तृप्त होऊन सद्गतीला जातात. जे कोणी उदगयनामध्यें ह्या ठिकाणीं ब्राह्मणाला कंबलदान करितील, ते जन्ममरणरूपी दुःखापासून मुक्त होऊन ऐहिक सुखाचा अनुभव घेतील व अंतीं मुक्त होतील.

---

## अध्याय ४३ वा.

### आदित्येश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; पार्वती ! नंतर सूर्यानें स्थापिलेल्या आदित्येश्वराचें दर्शन घेऊन पूजन करावें. हें आदित्येश्वरलिंग सोमेश्वराच्या पश्चिमेस आहे. त्रेतायुगामध्यें समुद्रानें रत्नांच्या योगानें ह्याच लिंगाचें पूजन केलें होतें; म्हणून ह्याला कोणी रत्नेश्वर असेंहि म्हणतात. जो कोणी ह्या आदित्येश्वराची पंचामृतांनीं व रत्नादि उपचारानीं पूजा करितो त्यास मेरुपर्वताच्या दानाचें पुण्य प्राप्त होतें. आदित्येश्वराचें दर्शन सर्व यज्ञ, सर्व दानें व सर्व तीर्थयात्रा ह्यापेक्षांहि अधिक फल देणारें आहे. ह्या आदित्येश्वरासंनिध जे गोप्रदान करितात त्यांच्या एकवीस कुळांचा उद्धार होतो. ह्याच लिंगासंनिध बसून जो शतरुद्रीय मंत्राचा जप करितो तो जन्ममरणरूपी संसारापासून मुक्त होतो. ह्याप्रमाणें जे आदित्येश्वराचें माहात्म्य श्रवण करितात ते बंधनापासून मुक्त होऊन मोक्षसुखाला प्राप्त होतात.

---

## अध्याय ४४ वा.

### सोमेश्वरमाहात्म्य.

ह्याप्रमाणें आदित्येश्वराचें पूजन केल्यानंतर सोमेश्वराचें पूजन करावें. प्रथमतः सोमेश्वराला साष्टांग नमस्कार घालून प्रदक्षिणादि करून त्याचें यथाशक्ति पूजन केलें असतां सर्व सिद्धि प्राप्त होतात. हें लिंग सूर्य व चंद्र ह्या दोघांनीं स्थापिलें आहे. ह्या सोमेश्वराचें पूजन केलें असतां सर्व यज्ञ व व्रतादिकर्में केल्याचें त्यास फल मिळतें नंतर त्या समीप असणाऱ्या उमादेवीचें दर्शन घेऊन पूजन करावें; म्हणजे मोक्ष मिळतो.

## अध्याय ४५ वा.

### अंगारेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात, पार्वती ! नंतर अंगारेश्वराचें दर्शन घ्यावें; हें लिंग भूमिपुत्र जो अंगार ( मंगळ ) त्यानें स्थापिलें आहे. पूर्वीं जेव्हां मला त्रिपुरासुराला मारण्याची इच्छा झाली; तेव्हां क्रोधानें माझ्या नेत्रांतून अश्रुबिंदु जमिनीवर पडले, त्या वेळीं त्या अश्रुबिंदूपासून पृथ्वीचे ठिकाणीं मंगळ नांवाचा पुत्र झाला; त्यासच अंगार म्हणतात. तो अंगार प्रभासक्षेत्राचे ठिकाणीं जाऊन, तेथें शंकराची तपाच्या योगें आराधना करूं लागला. त्या वेळीं मी त्याच्या इच्छेप्रमाणें त्यास नवग्रहामध्यें स्थान दिलें; त्यांनीं त्या ठिकाणीं जें लिंग स्थापिलें, त्यास अंगारेश्वर असें म्हणतात. जे कोणी मनुष्य त्याठिकाणीं अंगारेश्वराची पूजा करितात ते सर्व पापापासून मुक्त होतात, व त्यांस कोणापासूनही पीडा न होतां, सर्व यज्ञयागादि कृत्यें केल्याचें त्यास फल मिळतें.

## अध्याय ४६ वा.

### बुधेश्वरमाहात्म्य.

अंगारेश्वराचें पूजन केल्यानंतर, बुधेश्वराचें पूजन करावें. हें लिंग सोमपुत्र जो बुध, त्यानें स्थापिलें आहे. एकदां बुधानें प्रभासक्षेत्राचें ठिकाणीं येऊन व

लिंगस्थापना करून, त्याची चार हजार वर्षें सतत आराधना केली. नंतर त्याच्या तपःप्रभावानें मी संतुष्ट होऊन त्यास ग्रहत्व देता झालों; त्या दिवसापासून त्या लिंगाला बुधेश्वर हें नांव प्राप्त झालें आहे. बुधवारीं अष्टमी आली असतां, त्या दिवशीं बुधेश्वराचें पूजन करावें; म्हणजे दारिद्र्य प्राप्त होत नाहीं.

## अध्याय ४७ वा.

### बृहस्पतीश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; पार्वती ! नंतर बृहस्पतीनें स्थापिलेल्या बृहस्पतीश्वराचें पूजन करावें. हें लिंग उमादेवीच्या पूर्वेस व सिद्धेश्वराच्या आग्नेयेस आहे. ह्या ठिकाणीं पूर्वी बृहस्पतीनें हजार वर्षेंपर्यंत लिंगाराधना करून लिंगस्थापना केली होती; व त्यासच बृहस्पतीश्वर लिंग म्हणतात. ह्या लिंगाच्या पूजनानें बृहस्पतीला ज्ञान प्राप्त होऊन देवांमध्यें गुरुत्व प्राप्त झालें होतें. जे कोणी ह्या बृहस्पतीश्वराचें पूजन करितात त्यांस बृहस्पतीपासून केव्हांहि पीडा होणार नाहीं. शुक्ल चतुर्दशीस गुरुवार असतां जे कोणी राजोपचारांनीं बृहस्पतीश्वराचें पूजन करितात ते शिवलोकाला प्राप्त होतात. जे कोणी ह्या लिंगास पंचामृतानें स्नान घालितील ते देवऋण, पितृऋण व ब्रह्मऋण ह्या तीनहि ऋणापासून मुक्त होतील. जे कोणी हें माहात्म्य श्रवण करितात त्यांच्या सर्व पीडा दूर होतात.

## अध्याय ४८ वा.

### शुक्रेश्वरमाहात्म्य.

बृहस्पतीश्वराचें दर्शन घेतल्यानंतर शुक्रेश्वराचें दर्शन घ्यावें. हें लिंग शुक्रानें स्थापिलें आहे. हें लिंग सर्व पातकें दूर करणारें असून ऐश्वर्य देणारें आहे. ह्याच लिंगाच्या आराधनेनें शुक्राला संजीवनी विद्या प्राप्त झाली. शुक्रानें येथें हजार वर्षें तप करून लिंगाराधना केली होती. ह्याच्या योगें त्यानें ग्रहत्व मिळविलें होतें. ह्या लिंगाचें दर्शन घेणारा व पूजन करणारा मनुष्य जन्ममरणरूप संसारापासून मुक्त होतो. जो कोणी शुक्रेश्वराला पंचामृतानें स्नान घालतो तो शुक्रापासून मुक्त होतो, व अंतीं माझ्या लोकाला येतो.

## अध्याय ४९ वा.

### शनैश्चरेश्वरमाहात्म्य.

शंकर ह्मणतात, पार्वती! नंतर शनैश्चरेश्वराचें पूजन करावें.. पूर्वी शनैश्चरानें येथें लिंगाराधना करून ग्रहत्व संपादन केलें. शनैश्चराला न भिणारा असा त्रैलोक्यांत एकहि प्राणी नाहीं. प्रत्येकानें शनिवारीं शनैश्चराचें पूजन करून तेथेंच ब्राह्मणांना शमीच्या पानाइतकें अल्पहि तिलदान, उडीदाचें दान व गुळाचें दान दिलें तरीहि शनैश्चर त्यावर प्रसन्न होऊन त्यास कधींहि पीडा देत नाहीं. ह्याठिकाणीं काळ्या रंगाचा बैल ब्राह्मणाला दान करून शनैश्चरेश्वराचें पूजन व स्तवन करावें, ह्मणजे शनिपीडा दूर होते. दशरथराजानेंहि शनिपीडा नष्ट होण्याकरितां ह्याच शनैश्चरेश्वरलिंगाचें पूजन केलें होतें. ज्यावेळीं दशरथाला समजलें कीं, लवकरच शनि रोहिणीशकटाचा भेद करणार आहे, व त्यायोगें बारा वर्षें दुष्काळ पडणार आहे. असें समजतांच दशरथाला शनीची भीति वाटून तो शस्त्रास्त्रसिद्ध रथामध्यें बसून नक्षत्रमंडळावर शनीबरोबर युद्ध करण्याकरितां प्राप्त झाला. दशरथ आपणाबरोबर युद्ध करण्याकरितां आला आहे, हें जाणून शनीला आश्चर्य वाटलें व तो दशरथाला ह्मणतो कीं; सर्व त्रैलोक्य मला भितें; व मजबरोबर कोणिहि युद्ध करण्यास तयार होत नाहीं, तेव्हां हें मजबरोबर युद्ध करण्याचें तुझें साहस पाहून मी प्रसन्न झालों आहें, वर माग. असें शनीचें भाषण ऐकून दशरथ शनीला ह्मणतो कीं, तूं रोहिणीशकटाचा भेद करून जाऊं नको; कारण जर तूं रोहिणीशकटाचा भेद केलास तर माझे राज्यांत बारा वर्षें दुष्काळ पडेल, व हेंच सांगण्याकरितां मी तुजजवळ आलों आहें. नंतर शनीनें दशरथाच्या सर्व मागण्या कबूल करून त्यास दुसरेहि अनेक वर दिले. नंतर दशरथानें शनीची पुष्कळ प्रकारें स्तुति केली. दशरथानें शनीची केलेली स्तुति शनैश्चरेश्वराजवळ येऊन जे पठन करितात ते शनिपीडेपासून परावृत्त होतात.

---

## अध्याय ५० वा.

### राह्वीश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; पार्वति ! शनैश्चरेश्वराच्या वायव्येस राह्वीश्वर नांवाचें एक स्थान आहे. तें राह्वीश्वरलिंग राहूनें स्थापिलें आहें. राहूनें पूर्वी एक हजार वर्षें

शिवाराधना केली; व त्याठिकाणीं लिंगस्थापना केली. जे कोणी राह्वीश्वराचें दर्शन घेतात ते सर्व पापापासून मुक्त होऊन शिवलोकाला प्राप्त होतात. राह्वीश्वराचें दर्शन घेणारा पुरुष कधींहि अंधळा, बहिरा, मुका, रोगी, दरिद्री वगैरे दोषानें युक्त न होतां सर्व समृद्धीनें व सुखानें युक्त होतो. ह्याप्रमाणें मी तुला सांगितलेलें राह्वीश्वरमाहात्म्य जे श्रवण करितील ते मोक्षमार्गानें शिवलोकीं जातील.

---

## अध्याय ५१ वा.

### केत्वीश्वरमाहात्म्य.

राह्वीश्वराचें दर्शन घेतल्यानंतर त्याच्याच समीप असणाऱ्या केत्वीश्वराचें दर्शन घेऊन पूजन करावें. पूर्वी केतू नांवाच्या ग्रहानें हजार वर्षे पुरीं होईपर्यंत तप केलें; व शंकर प्रसन्न करून घेतला; व शंकररूपेनें तेथें आपल्या नांवानें लिंगस्थापना केली. केतू ग्रहाचा उदय झाला असतां जे कोणी केत्वीश्वराचें मोठ्या मनोभावेंकरून षोडशोपचरांनीं पूजन करितात त्याच्या सर्व पीडा दूर होतात. केत्वीश्वराचें पूजन करणारास रोगराई अगर दौर्भाग्य वगैरे दुःखें प्राप्त होत नाहींत. शंकर म्हणतात; पार्वति ! ह्याप्रमाणें तुला कपर्द्दीविनायकापासून तों केत्वीश्वरापर्यंतच्या सर्व लिंगांचीं माहात्म्यें सांगितलीं आहेत. ह्याच्या श्रवणानें जें पुण्य प्राप्त होतें तें पुण्य दुसऱ्या उपायांनीं प्राप्त होत नाहीं.

---

## अध्याय ५२ वा.

### सिद्धेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात,–पार्वती ! आतां सिद्धलिंगाचीं माहात्म्यें सांगतों. हीं सिद्ध लिंगें पांच आहेत; ह्या सिद्धलिंगाच्या दर्शनानें सर्व यात्रांचें फल सिद्ध होतें; पैकीं पहिलें सिद्धेश्वरलिंग होय. हें लिंग सिद्धांनीं स्थापिलें आहें; ह्या सिद्धेश्वराचें पूजन जे कोणी करितात ते सर्व ब्रह्महत्यादि महापातकापासून मुक्त होऊन, सिद्धलोकाला जातात. सिद्धेश्वराचें पूजन करणाऱ्या पुरुषांच्या कार्यांत केव्हांहि विघ्नें येऊं शकत नाहींत; व ते पुरुष कामादि सहा शत्रूंना जिंकून अक्षय्य गतीला प्राप्त होतात. यात्रा करणारांनीं प्रथम सिद्धेश्वराचें पूजन करावें; ह्मणजे त्याची सर्व यात्रा सफल होते. ह्याप्रमाणें हे पार्वती! तुला सर्व पातकांचा नाश करणाऱ्या सिद्धेश्वराचें माहात्म्य सांगितलें आहें, ह्याच्या श्रवणानें सिद्धी प्राप्त होतात.

---

## अध्याय ५३ वा.

### कपिलेश्वरमाहात्म्य.

नंतर कपिलेश्वराचें दर्शन घ्यावें. हें कपिलेश्वरलिंग सिद्धेश्वराच्या पूर्वेस आहे. कपिल नांवाचा एक ऋषि होता. त्या कपिलानें प्रभास क्षेत्रामध्यें येऊन; सिद्धेश्वरासंनिध एक लिंग स्थापून त्याची आराधना केली, व पुष्कळ वर्षें तप केलें. त्याच कपिलानें स्थापिलेल्या लिंगाला कपिलेश्वर ह्मणतात. ह्या कपिलेश्वराच्या दर्शनानें गोप्रदान केल्याचें फल प्राप्त होतें. जे कोणी कपिलेश्वरासंनिध जितक्या तिळांचें दान करितात तितकीं युगें ते स्वर्गलोकामध्यें राहातात. ह्याप्रमाणें कपिलेश्वराचें माहात्म्य श्रवण करणारे सर्व मोक्षाला प्राप्त होतात.

---

## अध्याय ५४ वा.

### गंधर्वेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; पार्वती ! नंतर गंधर्वेश्वराचें दर्शन घ्यावें. पूर्वी घनवाह नांवाच्या गंधर्वानें शिखंडीच्या शापानें कुरूपत्वाला पावलेल्या आपल्या गंधर्वसेना नामक कन्येला पाहून त्या कुरूपत्वदोषाच्या नाशार्थ प्रभासक्षेत्रांत शिवलिंग स्थापून त्याची आराधना केली; व त्या लिंगाराधनेच्या प्रभावानें त्याची कन्या सुरूप झाली; आणि दिव्य देहानें सर्व सुखाचा अनुभव घेती झाली. असें सांगितलें; त्याच गंधर्वेश्वरलिंगाला घनवाहेश्वर हें दुसरें नांव प्राप्त झालें आहे. जे कोणी गंधर्वेश्वराचें पूजन करितात ते गंधर्वलोकाला प्राप्त होतात. प्रथमतः अग्नितीर्थांत स्नान करून नंतर गंधर्वेश्वराचें पूजन करणारे लोक सर्व सिद्धीला प्राप्त होतात. सिद्ध लिंगांच्या पांच लिंगांपैकीं गंधर्वेश्वर हें तिसरें लिंग होय.

---

## अध्याय ५५ वा.

### विमलेश्वरमाहात्म्य.

नंतर विमलेश्वराचें दर्शन घ्यावें. हें लिंग सर्व पातकांचें नाशन करणारें आहे. हें गौरीच्या पूर्वेस व बृहस्पतीश्वराच्या नैर्ऋत्यदिशेस आहे. कोणताहि पुरुष

अथवा कोणतीहि स्त्री कितीहि पापी अगर संकटांत सांपडलेली असली तरी ह्या विमलेश्वर लिंगाच्या प्रभावानें त्या त्या पापापासून अगर संकटापासून खात्रीनें मुक्त होईल ह्यांत संशय नाहीं. ज्यांचें शरीर क्षयादि रोगानें पीडित असेल; व तो जर ह्या लिंगाचें पूजन करील तर त्याच्या सर्व व्याधी तत्काळ नष्ट होतील; व तो अंतीं निर्मल अशा स्वर्गाला प्राप्त होईल. ज्या विमलेश्वराजवळ गंधर्व-सेनेचेंहि कुरूपत्व नष्ट झालें त्याचें वर्णन किती करावें ! ह्याप्रमाणें सिद्धलिंगांच्या पांच लिंगांपैकीं चवथ्या विमलेश्वराचें माहात्म्य तुला सांगितलें आहे.

## अध्याय ५६ वा.

### धनदेश्वरमाहात्म्य.

आतां सिद्धलिंगांच्या पांच लिंगांपैकीं पांचवें धनदेश्वर नांवाचें जें लिंग त्याचें माहात्म्य सांगतों, ऐक. ब्रह्मलिंगाच्या नैर्ऋत्येस व राह्वीश्वराच्या समीप धनदेश्वर नांवाचें लिंग आहे. ज्याठिकाणीं तप केल्यामुळें कुबेराला धनाधिपत्व मिळालें. कुबेरानें ह्या ठिकाणीं लिंगस्थापना करून हजार वर्षें लिंगाराधना व तपश्चर्या केली. त्या तपाच्या प्रभावानें कुबेर अलका नामक नगरीचा राजा झाला, व सर्व द्रव्यांचा स्वामी झाला, असा धनदेश्वर लिंगाचा प्रभाव आहे. जे कोणीं धनदेश्वराचें पूजन करितील ते कुबेराप्रमाणें धनधान्ययुक्त होऊन शिव-लोकीं राहतील. धनदेश्वराचें पूजन करणारे विजयी होतील. ही कथा श्रवण केल्यानें केव्हांहि दारिद्र्य प्राप्त होत नाहीं; व तो पापमुक्त होतो.

## अध्याय ५७ वा.

### वरारोहामाहात्म्य.

शंकर म्हणतात; पार्वती ! ह्याप्रमाणें तुला पांचहि सिद्धलिंगांचीं माहात्म्यें सांगितलीं आहेत. ह्या माहात्म्यांना जो जाणतो तोच खरा क्षेत्रवासी होय. आतां इच्छाशक्ति, ज्ञानशक्ति व क्रियाशक्ति ह्या ज्या माझ्या तीन शक्ति आहेत त्यांचा पूजनक्रम सांगतों ऐक. पूर्वीं सांगितलेल्या सत्तावीस लिंगांचें पूजन केल्यानंतर ह्या तीन शक्तींचें पूजन करावें. त्यांपैकीं सोमेश्वराच्या ईशान्येस वरारोहा नांवाची जी शक्ति आहे तिलाच इच्छाशक्ति म्हणतात; व तिलाच उमा,

कला, उमा अशीं भिन्न भिन्न नांवें आहेत. ज्या वेळीं चंद्रानें रोहिणीशिवाय करून सव्वीस भार्यांचा त्याग केला त्या वेळीं चंद्राच्या सव्वीस भार्यांनीं प्रभास क्षेत्रांत येऊन वरारोहेचें पूजन केलें. त्या वेळीं वरारोहा प्रसन्न होऊन त्यांस इच्छित वर देती झाली; व त्याच वरारोहेनें चंद्रपत्नींना सांगितलें कीं, ज्या कोणी वरारोहेचें पूजन करितील त्या स्त्रिया सौभाग्यादि मिळवून सुखानें पतीसह आनंदांत राहतील. जी स्त्री ह्या ठिकाणीं ब्राह्मणांना फळें व भक्ष्य भोज्य पदार्थ देईल ती तुझ्याप्रमाणें अखंड सौभाग्य व सुख ह्यास मिळवील. भाद्रपद शुद्ध तृतीया ह्या दिवशीं वरारोहेचें पूजन ज्या स्त्रिया करितील त्या पुत्रपौत्रादिकांनीं युक्त होतील. त्या दिवसापासून चंद्र रोहिणीप्रमाणें इतर सव्वीस स्त्रियांवरहि प्रेम करूं लागला. ह्याप्रमाणें सर्व वरारोहामाहात्म्य तुला सांगितलें आहे.

## अध्याय ५८ वा.

### अजापालेश्वरीमाहात्म्य.

आतां दुसऱ्या अजापालेश्वर देवीचें माहात्म्य सांगतों. ह्या अजापालेश्वरालाच क्रियाशक्ति ह्मणतात. ही अजापालेश्वरी पूर्वीं भैरवी नांवानें प्रसिद्ध होती. पूर्वीं त्रेतायुगामध्यें अजापाल नांवाचा एक राजा होता. त्यानें प्रभासक्षेत्रीं येऊन भैरवीचें पूजन केलें. त्या पूजनानें भैरवी प्रसन्न झाली; व त्याला व्याधिमुक्त करून त्याच भैरवीला अजापालेश्वरी असें नांव ठेविलें. पूर्वीं सूर्यवंशांत उत्पन्न झालेल्या दिलीपाला रघुनांवाचा पुत्र झाला; व त्या रघूलाच अजनांवाचा पुत्र झाला. तो अजा ह्मणजे शेळ्या यांचें पालन करीत असे, ह्मणून त्यास अजपाल असें दुसरें नांव प्राप्त झालें; व त्या अजापालानें भैरवीचें पूजन करून सिद्धि व सुख संपादिलें, ह्मणून त्या भैरवीलाच अजापालेश्वरी असें नांव प्राप्त झालें. ही अजपालेश्वरी सर्व दुःखांचें व रोगांचें निरसन करणारी आहे; व मोठमोठ्या सिद्धी देणारी आहे. हे पार्वती ! ह्याप्रमाणें हें अजपालेश्वरीमाहात्म्य सर्व दुःखांचें व पातकांचें नाशन करणारें आहे, ह्यांत शंका नाहीं.

## अध्याय ५९ वा.

### अजादेवीमाहात्म्य.

शंकर म्हणतात; पार्वती ! आतां अजादेवी नांवानें प्रसिद्ध असणाऱ्या ज्ञानशक्तीचें माहात्म्य सांगतों. ही अजादेवी राज्ञीशाच्या दक्षिणेस आहे.

ज्या वेळीं विष्णूनें माझी पूजा केली त्या वेळीं माझ्या साहाव्या मुखांतून ही ज्ञान-शक्ति अर्थात् अजादेवी निर्माण झाली. नंतर पार्वतीनें शंकराला प्रश्न केला कीं, तुम्हाला पांच मुखें आहेत, असें सर्वत्र प्रसिद्ध असतां तुमच्या साहाव्या मुखांतून ज्ञानशक्ति निघाली, हें कसें ? तें सांगा. असा पार्वतीचा सयुक्तिक प्रश्न ऐकून शंकर म्हणतात; पार्वती ! मला पूर्वी सात मुखें होती. सद्योजात, वामदेव, अघोर, तत्पुरुष, ईशान अशी माझी पांच मुखें, साहावें अजमुख, व सातवें पिचुनांवाचें मुख, अशी ही माझी सात मुखें होत. पैकीं अजनांवाचें एक मुख मी ब्रह्मदेवाला दिलें, व पिचु नांवाचें दुसरें मुख विष्णूला दिलें. अज-नामक मुखापासून अजाशक्ति निर्माण झाली. ज्या वेळीं सर्व दैत्य देवांना पीडा देऊं लागले त्या वेळीं अजाशक्ति सिंहावर बसून सर्व दैत्यांचा पराजय करीत करीत प्रभासक्षेत्राचे ठिकाणीं आली, व तेथें अजादेवी नांवानें सोमेश्वराच्या ईशान्येस कायमची राहिली. जे कोणी ह्या अजादेवीसंनिध येऊन गायनवादन व जागरण करितात त्याच्या वंशात कोणालाहि दारिद्र्य प्राप्त होत नाहीं. जी ह्या अजादेवीचे ठिकाणीं दीप लावील तिला जितके वातीमध्यें दोरे असतील तितके जन्मपर्यंत सौभाग्यादि सुख प्राप्त होईल. जे कोणी हें आख्यान श्रवण अगर पठण करितील त्यांस पुत्रपौत्रादि अनेक प्रकारचें इष्ट ऐश्वर्य व सुख प्राप्त होऊन त्यांस अंतीं मोक्षप्राप्तीहि होईल. ह्याप्रमाणें ह्या तीन शक्तीचें पूजन केल्या-नंतर पुनः सोमेश्वराचें पूजन करावें; म्हणजे यात्रेचें उत्तम प्रकारचें फल मिळतें.

---

## अध्याय ६० वा.

### मंगलामाहात्म्य.

शंकर म्हणतात; पार्वती ! प्रभास क्षेत्रामध्यें तीन क्षेत्रदूती आहेत. त्यांपैकीं पहिली मंगला, दुसरी विशालाक्षी, व तिसरी चत्वरदेवी, ह्या तीन होत. ह्या तीन क्षेत्रदूतीचें अनुक्रमानें पूजन करावें. ह्या तीन दूतीचें पूजन केल्यास यात्रेची सफलता होते, मंगला ही क्षेत्रदूती ब्रह्मदेवाच्या अंशापासून उत्पन्न झाली आहे. व चत्वरदेवी रुद्राच्या अंशापासून उत्पन्न झाली आहे. अजादेवीच्या उत्तरेस असणाऱ्या मंगलानामक क्षेत्रदूतीचें प्रथम पूजन करावें. ज्या वेळी ब्रह्मादि देव यज्ञ करण्याकरितां प्रभासक्षेत्रांत आले त्या वेळी ब्रह्मादिदेवांच्या यज्ञकर्मांत सतत मंगल असावें, म्हणून ह्या मंगला देवीनें मंगल असें पुण्याहवाचनादि कृत्य करून ब्रह्मादि देवांचा सत्कार केला होता. तृतीयेचे दिवशीं जो पुरुष अथवा जी स्त्री ह्या मंगलादेवीचें पूजन करील त्यास किंवा तीस केव्हांहि

अमंगलत्व प्राप्त होणार नाहीं, ह्या मंगलादेवीसन्निध जे दांपत्यभोजन व यज्ञ-यागादि कृत्यें करितात त्याचीं सर्व पातकें नष्ट होतात. हें मंगलामाहात्म्य सर्व पातकांचें नाशन करणारें आहे.

---

## अध्याय ६१ वा.

—०००×०००—

### विशालाक्षीमाहात्म्य.

नंतर विशालाक्षी नांवाच्या क्षेत्रदूतीचें पूजन करावें. विष्णूनें सर्व दैत्यांना जिंकून दक्षिण दिशेला पळवून लाविलें असतां कांहीं दिवसांनीं ते दैत्य पुनः विष्णूबरोबर युद्ध करण्याकरितां आले. तेव्हां विष्णूनें विशालाक्षीनामक स्वतः पासून उत्पन्न केलेल्या शक्तीला सांगून तिच्याकडून सर्व दैत्यांचा पराभव करविला, व ती विशालाक्षी प्रभासक्षेत्रांत येऊन राहिली. माघ शुद्ध तृतीयेला जे कोणी प्रभासक्षेत्रीं येऊन विशालाक्षीचें पूजन करितात ते पुत्रपौत्रादिकांनीं युक्त होऊन व ऐहिक सुखाचा उपभोग घेऊन अंतीं सद्गतीला प्राप्त होतात,

---

## अध्याय ६२ वा.

### चत्वरप्रियामाहात्म्य.

आतां चत्वरप्रिया जी देवी तिचें माहात्म्य सांगतों. ही देवी रुद्रापासून उत्पन्न झाली आहे. प्रभासक्षेत्राचें रक्षण होण्याकरितां मी ह्या देवीची येथें स्थापना केली आहे. ही देवी क्षेत्ररक्षण करण्याकरितां कोट्यावधी भूतांना बरोबर घेऊन रात्रभर हिंडत असते. महानवमीच्या दिवशीं जो पुरुष अथवा जी स्त्री ह्या देवीचें षोडशोपचारांनीं भक्तिपुरःसर पूजन करील त्याच्या अगर तिच्या सर्व इच्छा पूर्ण होतील. आपली यात्रा सफल व्हावी, अशी ज्याला इच्छा असेल त्यानें चत्वरप्रियेसन्निध दांपत्य भोजनघालावें. शंकर म्हणतात; हे पार्वती ! ह्याप्रमाणें मी तुला सर्व पातकांचें नाशन करणारें चत्वरदेवीचें माहात्म्य सांगितलें आहे.

---

# अध्याय ६३ वा.

## भैरवेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; पार्वती ! नंतर भैरवेश्वराचें दर्शन घ्यावें. हें भैरवेश्वरालिंग योगेश्वराच्या दक्षिणेस आहे. हें लिंग सर्व पातकांचें नाशन करणारें व सर्व प्रकारचीं दिव्य ऐश्वर्यें देणारें आहे. ज्या वेळीं मला दैत्यांबरोबर युद्ध करण्याचा प्रसंग आला, त्या वेळीं मी भैरवाला बोलावून त्याची दैत्यनाशन करण्याचे कामीं योजना केली. नंतर भैरवानें माझ्या सांगण्याप्रमाणें सर्व दैत्यांचा नाश केला; व प्रभासक्षेत्रीं येऊन लिंगस्थापना केली. त्याच लिंगाला भैरवेश्वर लिंग म्हणतात. ह्या भैरवेश्वराचें लिंग देवांनीं पूजिल्यामुळें त्यांस जयप्राप्ती झाली. जे कोणी कार्तिकी पौर्णिमेला भैरवेश्वराचें पूजन करितात; त्यांस विजय, ऐश्वर्य व सर्व सुखें प्राप्त होतात; व ते अंतकाळीं माझ्या लोकांला प्राप्त होतात.

# अध्याय ६४ व ६५ वा.

## लक्ष्मीश्वर व वाडवेश्वरमाहात्म्य.

भैरवेश्वराच्या पूर्वेस लक्ष्मीश्वरनांवाचें एक लिंग दारिद्र्याचें नाशन करणारें आहे. ह्या लिंगासंनिध देवीनें दैत्यांना जिंकून त्यांपासून आणलेली लक्ष्मी ह्या ठिकाणीं स्थापित केली; म्हणून ह्या लिंगाला लक्ष्मीश्वर हें नांव प्राप्त झालें. माघ शुद्ध पंचमीच्या दिवशीं जे ह्या लक्ष्मीश्वराचें पूजन करितील ते लक्ष्मीसंपन्न व पुत्रपौत्रसंपन्न होऊन अंतकालीं माझ्या लोकाला प्राप्त होतील.

ह्या लक्ष्मीश्वराच्या उत्तरेस वाडवेश्वर नांवाचें एक लिंग आहे. हें लिंग वाडवानें स्थापिलें, म्हणून ह्यास वाडवेश्वर हें नांव प्राप्त झालें. ज्या वेळीं वाडवाग्नीनें कृतस्मरपर्वताला जाळून टाकिलें त्या वेळीं वाडवानें तेथील सर्व पदार्थ गोळा करून त्याचें एक लिंग तयार केलें; व त्या लिंगाची स्थापना केली. जे कोणी ह्या वाडवेश्वराचें पूजन करितात ते अग्निलोकाला प्राप्त होतात; व त्यांस यात्रा केल्याचें फळ मिळतें. ह्या दोनही लिंगाचीं माहात्म्यें सर्व पापांचें क्षालन करणारीं असून मोक्ष देणारीं आहेत.

## अध्याय ६६ वा.

### अर्घ्येश्वरमाहात्म्य.

नंतर अर्घ्येश्वराचें पूजन करावें. हें लिंग विशालाक्षा देवीच्या उत्तरेस आहे. ह्या लिंगाचें देव व गंधर्व ह्यांनीं पूर्वीं पूजन करून सर्व सिद्धि मिळविल्या होत्या. पूर्वीं वडवानांवाची एक देवी स्नानाकरितां येथें आली असतां तिनें शंकराला उद्देशून एक अर्घ्य दिलें; व तें अर्घ्य देतांच शंकर तेथें प्रगट झाले; म्हणून त्या स्थानाला अर्घ्येश्वर हें नांव प्राप्त झालें. जे पंचामृतांनीं अर्घ्येशाचें पूजन करितात ते सप्तजन्मपर्यंत ज्ञानसंपन्न होऊन शिवलोकाला प्राप्त होतात.

## अध्याय ६७ वा.

### कामेश्वरमाहात्म्य.

शंकर ह्मणतात; पार्वती! नंतर कामेश्वराचें पूजन करावें. ह्या लिंगाची आराधना काम जो मदन त्यानें केली होती. ज्या वेळीं मी कामाला जाळून टाकिलें त्या वेळीं त्यानें प्रभासक्षेत्रीं लिंग स्थापून एक हजार वर्षे त्याचें आराधन केलें; व सिद्धि मिळविली, तेंच हें कामेश्वरलिंग होय. हें लिंग सर्व पातकांचें क्षालन करणारें असून, सर्वप्रकारच्या सिद्धि देणारें आहे. वैशाखशुक्ल चतुर्दशीला जे कोणी कामेश्वराचें पूजन करितात, ते सर्व कामानें युक्त होऊन सद्गति मिळवितात.

## अध्याय ६८ वा.

### गौरीतपोवनमाहात्म्य.

शंकर म्हणतात, पार्वती ! पूर्वीं तूं कृष्णवर्णाची होतीस. मी तुला एकदां सहज "काली" ह्या नांवानें हांक मारिली असतां तूं माझ्यावर रागावलीस, व गोरी होण्याकरितां तूं प्रभासक्षेत्राचें ठिकाणीं प्राप्त झालीस. नंतर तेथें तूं सखीसह येऊन गौरीश्वर नांवाचें लिंग स्थापून त्याचें पूजन केलेंस; एका पायावर उभें राहून तेथें पुष्कळ वर्षे तप केलेंस. नंतर कांहीं दिवस पंचाग्निसाधनानें,

कांहीं दिवस धूम्रपानादिविधीनेंहि तपाचरण केलेंस. पावसाळ्यांत पावसांत उभें राहून, थंडीच्या दिवसांत गळ्याइतक्या खोल पाण्यांत उभें राहून, व उन्हाळ्यांत उन्हांत उभें राहून भयंकर तपश्चर्या केलीस; आणि स्वतःचें शरीर गौरपणाला प्राप्त करून घेतलेंस. ज्या वनांत तूं तप केलेंस त्या वनाला गौरीतपोवन हें नांव प्राप्त झालें. जे कोणी ह्या वनांत येऊन गौरीश्वराचें पूजन करितात, त्यांच्या सर्व इच्छा पूर्ण होऊन ते अंतीं मुक्त होतात.

## अध्याय ६९ वा.

### गौरीश्वरमाहात्म्य.

शंकर ह्मणतात; पार्वती! ह्याप्रमाणें तूं गौरत्व प्राप्त होण्याकरितां गौरीतपोवनांत जाऊन व गौरीश्वराची स्थापना करून त्याची आराधना केलीस; व गौरत्व मिळविलेंस. त्या गौरीश्वराचें माहात्म्य सांगतों. जे कोणी ह्या गौरीश्वराचें कृष्णपक्षांतील अष्टमीला मनोभावानें पूजन करितात ते सर्व पापापासून मुक्त होऊन व तेजस्वी होऊन माझ्या लोकाला प्राप्त होतात. ह्या गौरीश्वरासंनिध जे गोदान अगर स्वर्णदान करितात अथवा अन्नदान करितात ते सर्व किल्बिषापासून मुक्त होता. गोहत्या, ब्रह्महत्या वगैरे महापातकें करणारेहि पुरुष गौरीश्वर पूजनानें मुक्त होऊन मोक्षाला जातात. हें माहात्म्य पुत्रपौत्रादि व मोक्ष देणारें आहे.

## अध्याय ७० वा.

### वरुणेश्वरमाहात्म्य.

नंतर वरुणेश्वराचें पूजन करावें. हें गौरीतपोवनाच्या आग्नेय दिशेस आहे. हें लिंग वरुणानें स्थापिल्यामुळें ह्यास वरुणेश्वर असें नांव आहे. ज्या वेळीं अगस्त्यानें समुद्र प्राशन केला त्या वेळीं वरुणाला राग आला; व त्यानें प्रभासक्षेत्रीं येऊन एक लिंग स्थापून त्याची आराधना केली. नंतर मी प्रसन्न होऊन जटेंतल्या गंगेनें समुद्र भरून टाकिला. त्या दिवसापासून समुद्र पाण्यानें भरलेला आहे. जे कोणी ह्या वरुणेश्वराचें पूजन करितात, त्यांस सर्व तीर्थांत स्नान केल्याचें व सर्व ठिकाणच्या यात्रा केल्याचें फल प्राप्त होतें. ह्या लिंगाचें पूजन करणारें निष्पाप होऊन सद्गतीला प्राप्त होतात.

## अध्याय ७१ व ७२ वा.

### उषेश्वर व जलवासगणपतिमाहात्म्य.

शंकर म्हणतात,-पार्वती! नंतर उषेश्वराचें दर्शन घ्यावें. हें लिंग वरुणाची स्त्री जी उषा तिनें स्थापित केलें आहे. तिनें तेथें मोठी तपश्चर्या करून, सिद्धि मिळविली. जे कोणी ह्या उषेश्वराचें पूजन करितात, ते पंचमहापापासून मुक्त होऊन श्रेष्ठगतीला प्राप्त होतात. हें लिंग स्त्रियांना सौभाग्य देणारें आहे; व दुःखदारिद्र्याचें नाश करणारें आहे. ह्या माहात्म्यश्रवणानेंहि सर्व इच्छा तृप्त होऊन मोक्षप्राप्ति होते.

ज्या ठिकाणीं उषेश्वरलिंग आहे, तेथेंच जलवासगणपतीचें स्थान आहे. वरुणानें जेव्हां तपश्चर्येला प्रारंभ केला; तेव्हां ह्या तपांत कोणतेंहि विघ्न येऊं नये; म्हणून तेथें गणपतीची स्थापना केली होती व त्यासच जलवासगणपति म्हणतात. जे कोणी चतुर्थीला ह्या गणपतीचें पूजन करितात, ते सर्व विघ्नांपासून व पापापासून मुक्त होऊन शिवलोकाला प्राप्त होतात.

## अध्याय ७३ वा.

### कुमारेश्वरमाहात्म्य.

नंतर कुमारेश्वराचें पूजन करावें. हें लिंग वरुणेश्वराच्या नैर्ऋत्यदिशेस आहे. हें लिंग माझा पुत्र जो कार्तिकस्वामी म्हणजे कुमार त्यानें स्थापिलें आहे; म्हणून ह्यास कुमारेश्वर म्हणतात. जे कोणी कुमारेश्वराचें एक महिनाभर पूजन करितात, त्यांस साहा महिनेंपर्यंत माझें पूजन केल्याचें श्रेय मिळतें; व जे कोणी कुमारेश्वराचें एकच दिवस पूजन करितात; त्यांस एक महिनाभर माझें पूजन केल्याचें श्रेय प्राप्त होतें. जे कोणी काम, क्रोध, लोभ, प्रेम, मत्सर वगैरे सर्व दोषांचा त्याग करून ब्रह्मचारिनियमानें अगर संन्यासनियमानें वागून कुमारेश्वराचें पूजन करितास; त्यांना सर्वप्रकारचीं फलें मिळून ते माझ्या लोकाला प्राप्त होतात. ह्याप्रमाणें कुमारेश्वराचें पूजन करणारास, सर्व ठिकाणच्या यात्रा केल्याचें फल मिळेल. हें आख्यान सर्व पातकांचें नाश करणारें व सर्व सुखांचा व मोक्षाचा लाभ करून देणारें आहे.

## अध्याय ७४ वा.

### शाकल्येश्वरमाहात्म्य.

शंकर ह्मणतात; पार्वती! नंतर शाकल्येश्वराचें दर्शन घ्यावें. हें लिंग शाकल्य नांवाच्या एका राजर्षीनें स्थापिलें आहे. ह्यानें ह्या लिंगाची आराधना करून प्रत्यक्ष माझें दर्शन घेतलें. ह्या शाकल्येश्वराचें दर्शन घेतलें असतां सात जन्माचें पाप नष्ट होतें. प्रत्येक अष्टमीला व चतुर्दशीला ह्या लिंगाचें पूजन करावें; व ह्यास दुधानें स्नान घालावें. ज्याला आपली यात्रा सफल व्हावी अशी इच्छा असेल त्यानें तेथें सुवर्णदान करावें. ह्यालाच कृतयुगांत भैरवेश्वर हें नांव होतें नंतर सावर्णिमनूनें ह्याचें त्रेतायुगांत आराधन केलें म्हणून ह्यास सावर्णिकेश्वर असें नांव प्राप्त झालें. नंतर गालवानें ह्याच लिंगाचें पूजन केल्यामुळें ह्यासच द्वापर-युगांत गालवेश्वर हें नांव प्राप्त झालें; व कलियुगांत ह्यासच शाकल्येश्वर हें नांव प्राप्त झालें आहे. हें लिंग कृमि, कीट, पतंग वगैरे प्राण्यांना मोक्ष देणारें आहे.

---

## अध्याय ७५ वा.

### कलकलेश्वरमाहात्म्य.

नंतर कलकलेश्वराचें पूजन करावें. ह्याला कृतयुगांत कामेश्वर, त्रेतायुगांत पुलहेश्वर, द्वापारयुगांत सिद्धिनाथ व कलियुगांत कलकलेश्वर अशीं भिन्न भिन्न नावें आहेत. ज्या वेळीं सरस्वती समुद्राला येऊन मिळाली, त्या वेळीं तो नदीचा कोलाहल शब्द श्रवण करून तेथें असणाऱ्या देवांनीं कलकल असा मोठ्या भीतीनें शब्द केला. त्या वेळीं त्यांना धीर देण्याकरितां मी लिंगरूपानें तेथें प्रगट झालों; व त्यांचें सांत्वन केलें; देवांच्या कलकलशब्दानें लिंग उत्पन्न झालें म्हणून त्याचें नांव कलकलेश्वर असें आहे. हें लिंग सर्व संपत्ति देणारें व सर्व सुखें देणारें असून मोक्ष देणारें आहे.

---

## अध्याय ७६ वा.

### लकुलेश्वरलिंगद्वयमाहात्म्य.

त्या लकुलेश्वराजवळच लकुलीशानें दोन लिंगें स्थापिलीं आहेत. त्या दोन-ही लिंगांचीं लकुलेश्वर अशींच नांवें आहेत. त्या दोनही लिंगांचें दर्शन घेणारे

## अध्याय ८० वा.

### गौतमेश्वरमाहात्म्य.

लकुलीश्वराच्या पूर्वेस गौतमेश्वर नांवाचें एक लिंग आहे. ह्या लिंगाची आराधना मद्रदेशाचा राजा जो शल्य त्यानें केली होती; त्यानें येथें तप करून शिवकृपेनें शस्त्रविद्येंत नैपुण्य मिळवून [illegible] मिळविलें. तुम्हांही जो कोणी मनुष्य ह्या गौतमेश्वराचें आराधन करील, तोहि शल्याप्रमाणें विद्या व सिद्धि मिळवून व कीर्ति संपादून स्वर्गलोकीं जातो. जे कोणी चैत्रशुद्ध चतुर्दशीला गौतमेश्वराला दुधानें स्नान घालतात ते अश्वमेधाचें यज्ञाचें फळ मिळवून उत्तम गतिहि मिळवितात. वाणीनें मनानें किंवा देहानें जे पाप घडलें असेल तें सर्व पाप ह्या गौतमेश्वराच्या दर्शनानें व पूजनानें समूळ नष्ट होतें.

---

## अध्याय ८१ वा.

### श्रीदैत्यसूदनमाहात्म्य.

शंकर म्हणतात; पार्वती! नंतर दैत्यसूदनाचें दर्शन घ्यावें. अक्षय्यवट, कल्पवृक्ष, अंगारतीर्थ, वैडूर्यतीर्थ, दैत्यसूदन व मार्कंडेयक्षेत्र हें सर्व अक्षय्य आहे, ह्यां शिवाय सर्व वस्तु नाश पावणाऱ्या आहेत. दैत्यसूदन ही देवता सर्वश्रेष्ठ आहे. पहिल्या कल्पांत वामन दुसऱ्या कल्पांत विष्णु तिसऱ्या कल्पांत वज्रांग, चवथ्या कल्पांत कमलाप्रिय, पांचव्या कल्पांत दुःखहा, साहाव्या कल्पांत पुरुषोत्तम व सातव्या कल्पांत दैत्यसूदन याप्रमाणें प्रत्येक कल्पांत एक एक देवता उच्चत्वाला प्राप्त झाली आहे. आतां सातव्या कल्पांत दैत्यसूदनाची उत्पत्ति कशी झाली तें सांगतों. पूर्वी दैत्यांनीं जिंकिलेले देव विष्णुला शरण जाऊन म्हणूं लागले कीं, आम्हांला दैत्यांनीं जिंकिल्यामुळें आम्ही स्थानभ्रष्ट होऊन अनाथाप्रमाणें हिंडत आहों, करितां तूं दैत्यांना जिंकून आमचें रक्षण कर अशी देवांची प्रार्थना ऐकून विष्णु देवांना म्हणतात, देवहो! तुम्ही श्रवणद्वादशीचें व्रत करा. ह्या व्रताच्या योगानें तुमच्या सर्व इच्छा पूर्ण होतील. नंतर सर्व देवांनीं विष्णूच्या सांगण्याप्रमाणें श्रवणद्वादशीचें व्रत करून तेथें दैत्यनाशनार्थ एक दैत्यसूदन नांवाची देवता स्थापित केली. ह्या व्रताच्या प्रभावानें देवांना स्वर्गप्राप्ती झाली, व सर्व दैत्यांचा त्यांनीं पराजय केला. दैत्यनाशाकरितां जी देवता स्थापिली तिचें नांव दैत्यसूदन असें ठेविलें. दैत्यसूदनाच्या दर्शनानें ब्रह्मांडदानाचें फळ मिळतें; व शेवटीं तो विष्णुलोकाला आनंदानें प्राप्त होतो.

---

## अध्याय ८२ वा.

### चक्रतीर्थोत्पत्तिमाहात्म्य.

पूर्वी विष्णूनें दैत्यनाशार्थ ह्या ठिकाणीं आपलें सुदर्शनचक्र फेंकले होतें, म्हणून ह्या तीर्थास चक्रतीर्थ म्हणतात. विष्णूनें ह्या चक्रतीर्थाचे ठिकाणीं इतर आठ कोटी तीर्थांची स्थापना करून चक्रतीर्थाचें माहात्म्य वृद्धिंगत केलें. जो कोणी ह्या चक्रतीर्थांत स्नान करितो त्यास इतर सर्व तीर्थांत स्नान केल्याचें फल मिळतें. विशेषेकरून चंद्रग्रहण व सूर्यग्रहण ह्या दिवशीं ह्या तीर्थांत आठ कोटी तीर्थें राहत असतात. ह्या चक्रतीर्थालाच पहिल्या कल्पांत कोटितीर्थ असें नांव होतें, दुसऱ्या कल्पांत श्रीनिधान असें नांव होतें, तिसऱ्या कल्पांत शतधार असें नांव होतें; व ह्यालाच सांप्रत चक्रतीर्थ म्हणतात. ज्याला यात्रा फल मिळावें, अशी इच्छा असेल त्यांनीं चक्रतीर्थांत स्नान करून गोप्रदान करावें. चांडाळ अगर पशुहि जरी ह्या चक्रतीर्थांत स्नान करील तरी तोहि सर्व पातकापासून मुक्त होऊन व ऐहिक सुख मिळवून दुर्लभ अशा मोक्षमार्गाला प्राप्त होईल.

## अध्याय ८३ वा.

### योगीश्वरीमाहात्म्य.

शंकर म्हणतात; पार्वती ! पूर्वी महिषासुर नांवाचा एक दैत्य होता. त्याच्याकडे नारद येऊन म्हणतो कीं, जंबुद्वीपामध्यें एक सुंदर कन्या तप करीत आहे, तशी सुंदर कन्या त्रैलोक्यांत सुद्धां दुर्लभ आहे; तेव्हां ती तुला विवाह करण्यास योग्य आहे; हें वर्तमान सांगण्याकरितां मी तुजकडे आलों आहे. असें नारदाचें भाषण ऐकताच महिषासुर जंबुद्वीपांत येऊन त्या कन्येजवळ प्राप्त झाला, व म्हणाला कीं, तूं हें घोर तप कां करीत आहेस ? तुझ्या वयाला व रूपाला अनुसरून विचार केला असतां हें तप तुला अयोग्य आहे. मी तुझ्याबरोबर विवाह करण्याची इच्छा करीत आहे, व तूं माझ्याबरोबर विवाह लाविलास तर तूं त्रैलोक्याची महाराणी होशील. अशाप्रकारची महिषासुराची विनवणी ऐकून ती कन्या हसली; व तिच्या हास्यापासून हजारों सशस्त्र स्त्रिया बाहेर निघाल्या; व त्या स्त्रियांनीं महिषासुराचें सर्व सैन्य नष्ट केलें. आपलें सर्व सैन्य नष्ट झालेलें पाहून महिषासुराला राग आला; व त्या कन्येबरोबर तो स्वतः युद्ध करूं लागला. शेवटीं युद्धामध्यें त्या कन्येनें आपल्या शूलाचा प्रहार करून

महिषासुराचा नाश केला. त्या वेळीं सर्व देवांनां आनंद होऊन त्यांनीं त्या कन्येची पुष्कळप्रकारांनीं स्तुति केली. नंतर स्तुति केल्यामुळें संतुष्ट झालेली कन्या देवांना वर मागण्याविषयीं सांगूं लागली. त्या वेळीं देव तिला म्हणतात; हे कन्यारूपधारिणी देवी ! तूं ह्या क्षेत्रामध्यें राहून सर्व भक्तांना पावन करून सर्वांचे क्लेश निवारण करावेस, अशी आमची इच्छा आहे, व हाच आम्हाला तूं वर दे. असें देवांचें भाषण ऐकून देवीनें बरें आहे; असें म्हणून तेथें आपला वास करण्याचा निश्चय केला. त्याच कन्यारूपधारिणी देवीला योगीश्वरी म्हणतात. ह्या योगीश्वरीचें षोडशोपचारांनीं पूजन करावें, व "**दुर्गे दुर्गार्तिगे देवि सर्वदुर्गतिनाशिनि ॥ त्राहि मां सर्वदुर्गेषु दुर्गेऽहं शरणं गतः ॥**" ह्या मंत्र म्हणून देवीला अर्घ्यप्रदान करावें. देवीच्या स्तोत्रपठणानें व दर्शनानें सर्वसिद्धि व ऐहिक सुख प्राप्त होऊन अंतीं सायुज्यमुक्ति व सुख प्राप्त होतें.

---

## अध्याय ८४ वा.

### आदिनारायणमाहात्म्य.

शंकर म्हणतात; पार्वती ! नंतर आदिनारायणाचें दर्शन घ्यावें. पूर्वी कृतयुगामध्यें मेघवाहन नांवाचा एक दैत्य होता. त्यानें ब्रह्मदेवाला प्रसन्न करून घेऊन अमरत्व मिळण्याबद्दल वर मागितला, त्या वेळीं ब्रह्मदेवानें त्या दैत्याला सांगितलें कीं, तूं अमर होशील, परंतु जेव्हां तुला विष्णु पादप्रहार करितील त्यावेळीं तुझा नाश होईल. असा वर मिळाल्यामुळें तो दैत्य उन्मत्त होऊन त्रैलोक्याला पीडा देऊं लागला. त्या वेळीं देव व ऋषि विष्णूची स्तुति करूं लागले असतां आदिनारायण विष्णु तेथें प्रगट झाला; व देव ऋषि ह्यांच्या दुःखनाशार्थ आदिनारायणानें त्या दैत्याला युद्धाकरितां बोलावून त्यास एक लत्ताप्रहार केला. दैत्याला लाथ लागतांच ब्रह्मदेवाच्या वराप्रमाणें त्या मेघवाहन दैत्याचा नाश झाला. ज्या ठिकाणीं आदिनारायण प्रगट झाला तेथें देवांनीं व ऋषींनीं मिळून आदिनारायणाची स्थापना केली. ह्या आदिनारायणाची जे कोणी पूजन करितात अगर एकादशीच्या दिवशीं दर्शन घेतात त्यांचीं सर्व दुःखें नष्ट होऊन त्यांस अश्वमेध यज्ञाचें फल मिळतें; व ते अंतीं स्वर्गाला जाऊन आनंदानें राहतात. ह्या आदिनारायणाच्या दर्शनानें एक लाख गायी ब्राह्मणांना दान दिल्याचें पुण्य लागतें. एकादशी रविवारीं असतां जे कोणी आदिनारायणाचें दर्शन घेतात ते संसारबंधनापासून मुक्त होतात हें आख्यानही पुत्रपौत्र व ऐहिक सौख्य देणारें असून मोक्ष देणारें आहे.

---

## अध्याय ८५ वा.

### संनिहितामाहात्म्य.

शंकर म्हणतात; पार्वती ! आतां संनिहितादेवीचें माहात्म्य सांगतों. जी देवी प्रभासक्षेत्रामध्यें नदीरूपानें प्रगट झाली आहे. ही संनिहितानदी आदिनारायणाच्या पश्चिमेस आहे. ज्या वेळीं श्रीकृष्णाला जरासंधाची भीति वाटली त्या वेळीं तो यादवांसह प्रभासक्षेत्रीं आला; व त्यानें समुद्राजवळ राहण्याकरितां जागा मागितली. त्या वेळी सूर्यग्रहण होतें. जरासंधाच्या भीतीनें यादवांसह श्रीकृष्णानें विष्णूचें ध्यान केलें; व तेथें संनिहितादेवीची यादवरक्षणार्थ नदीरूपानें स्थापना केली. त्या संनिहितानदींत सर्वांनीं स्नान केलें; व त्यामुळें त्यांस कुरुक्षेत्राच्या यात्रेचें फल मिळालें. जे कोणी तेथें एका ब्राह्मणाला यथाशक्ति भोजन देतील त्यास कोटी ब्राह्मणांना भोजन घातल्याचें पुण्य मिळेल. जे कोणी तेथें सूर्यग्रहण असतां संनिहितानदींत स्नान करितात त्यांस अग्निष्टोमयज्ञाचें फल मिळतें. जे कोणी आदिनारायणाचें पूजन व संनिहितानदींत स्नान करितात त्यांना कलियुगांतही कृतयुगाप्रमाणें सुखसंपत्ति प्राप्त होते. रविवारीं एकादशी असतां जर संनिहितानदींत स्नान करून आदिनारायणाचें पूजन केलें, तर त्यास संसारबंधनाची बाधा न होता तो कर्मबंधापासून मुक्त होऊन व ऐहिक सुख भोगून अंतीं मुक्त होतो.

## अध्याय ८६ वा.

### पांडवेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; पार्वती ! संनिहितानदीच्या दक्षिणतीरावर पांडवेश्वर नांवाचें एक लिंग आहे. ज्या वेळीं पांडव गुप्तरीतीनें हिंडत असत त्या वेळीं ते प्रभासक्षेत्राला येऊन तेथें त्यांनीं चंद्रग्रहण असतां मार्कंडेयादि ऋषींना बोलावून पांडवेश्वर नांवानें लिंग स्थापिलें. त्या वेळीं मार्कंडेयादि ऋषि पांडवांस म्हणतात कीं, हें लिंग फारच अधिक महत्त्वाचें आहे. जे कोणी ह्या लिंगाचें पूजन करितील ते देवदैत्यांमध्यें पूज्यत्वाला प्राप्त होतील व त्यांस अश्वमेधयज्ञाचें पुण्य लागून व शेवटीं विष्णुरूप होऊन विष्णुलोकाला प्राप्त होतील.

## अध्याय ८७ वा.

### भूतेशमाहात्म्य.

नंतर एकादश रुद्रांचें दर्शन घ्यावें. कृतयुगांत ह्या एकादश रुद्रांचीं नांवें अजैकपाद्, अहिर्बुध्न्य, विरूपाक्ष, रैवत, हर, बहुरूप, त्र्यंबक, सुरेश्वर, वृषाकपि, शंभु, कपर्दी ह्याप्रमाणें होतीं; परंतु सांप्रत कलियुगांत त्याच एकादश रुद्रांचीं नांवें भूतेश, नीलरुद्र, कपाली, वृषवाहन, त्र्यंबक, घोर, महाकाल, भैरव, मृत्युंजय, कामेश, योगेश अशीं आहेत. त्यांपैकीं पहिला रुद्र जो भूतेश त्याचें पूजन केलें असतां सर्व इच्छा पूर्ण होतात. ह्या भूतांमध्यें प्राण ही वायुदेवता वास्तव्य करिते. प्राण अपान, व्यान, उदान, समान, नाग, कूर्म, कृकल, देवदत्त, धनंजय हे दाहा वायु व अकरावा आत्मा मिळून एकादश रुद्र होत.

## अध्याय ८८ वा.

### नीलरुद्रमाहात्म्य.

शंकर म्हणतात; पार्वती ! एकादशरुद्रांपैकीं दुसऱ्या नीलरुद्राचें माहात्म्य सांगतों. हें नीलरुद्रस्थान भूतेश्वराच्या उत्तरेस आहे. जे कोणी कमळांनीं नीलरुद्राचें पूजन करून त्यास प्रदक्षिणा करितात त्यांस राजसूययज्ञाचें फळ मिळतें. पूर्वीं ह्याठिकाणीं रुद्रानें नीलवर्णाच्या एका दैत्याचा नाश केला होता; व त्यामुळें येथें दैत्यस्त्रिया पतिनाशामुळें रुदन करूं लागल्या त्यामुळें ह्या स्थानाला नीलरुद्र असें नांव प्राप्त झालें. ह्या नीलरुद्राचें माहात्म्य सर्व पातकांचा नाश करणारें आहे.

## अध्याय ८९ वा.

### कपालीश्वरमाहात्म्य.

नंतर तिसऱ्या कपालीश्वराचें दर्शन घेऊन पूजन करावें. हें लिंग बुधेश्वराच्या पश्चिमेस आहे. पूर्वीं मी ब्रह्मदेवाचें पांचवें मस्तक तोडिलें असतां तें पांचवें मस्तक माझ्या हाताला चिकटून राहिलें. जव्हां मी प्रभासक्षेत्रीं आलों तेव्हां तें कपाल ह्या ठिकाणीं खालीं पडलें; व तेथें लिंगस्थापना झाली; म्हणून त्या लिंगास कपालीश्वर म्हणतात. त्या कपालीश्वराचें पूजन करून तेथें सुवर्णादि दानें करावीं; म्हणजे सर्व पापांची निवृत्ति होते.

# अध्याय ९० वा.

—०००×०००—

## वृषभेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; पार्वती ! नंतर चौथ्या वृषभेश्वराचें दर्शन घ्यावें. ह्या वृषभेश्वराला पूर्वकल्पामध्यें ब्रह्मेश्वर असें नांव होतें; कारण त्या काळीं ब्रह्मदेवानें ह्याची आराधना केल्यामुळें ह्यास हें नांव प्राप्त झालें. दुसऱ्या कल्पामध्यें ह्यास रैवतेश्वर हें नांव प्राप्त झालें होतें. पूर्वी रैवत नांवाच्या राजानें ह्याचें पूजन केलें म्हणून ह्यास रैवतेश्वर हें नांव प्राप्त झालें. नंतर तिसऱ्या कल्पामध्यें ह्यास वृषभेश्वर हें नांव प्राप्त झालें आहे. माझें वाहन जो वृषभ त्यानें त्याचें पूजन केलें; म्हणून ह्यास वृषभेश्वर म्हणतात. चवथ्या वाराहकल्पामध्यें इक्ष्वाकुराजानें ह्याच वृषभेश्वराचें पूजन केलें म्हणून ह्यास कोणी इक्ष्वाकीश्वर असेंहि म्हणतात. जे कोणी ह्या वृषभेश्वराचें पूजन करतात ते सात जन्मांत केलेल्या पातकापासून मुक्त होतात. जो कोणी ह्या तीर्थामध्यें स्नानादि करितो त्याचें तें कर्म अक्षय्य फल देणारें होतें. ह्या ठिकाणीं एका ब्राह्मणाला भोजन दिलें असतां कोटि ब्राह्मणाला भोजन दिल्याचें पुण्य त्यास मिळतें. जो कोणी माघ कृष्ण चतुर्दशीला येथें जागरण करितो त्याला आठ तीर्थांत स्नान केल्याचें पुण्य प्राप्त होतें. अष्टमीला अगर चतुर्दशीला जे कोणी दह्यानें वृषभाला स्नान घालितात त्यांना चार वेदांच्या अध्ययनाचें फल मिळतें. जे कोणी ह्याला दुधानें स्नान घालितात त्यांना सात हजार गायी दान दिल्याचें पुण्य लागतें.

---

# अध्याय ९१ वा.



## त्र्यंबकेश्वरमाहात्म्य.

हे पार्वति ! नंतर अकरा रुद्रांपैकीं पांचवा रुद्र जो त्र्यंबकेश्वर त्याचें पूजन करावें. ह्यालाच पूर्वी शिखंडीश्वर हें नांव प्राप्त झालें होतें. ह्या ठिकाणीं बृहस्पतीनें शिवाराधना करून तीन कोटी त्र्यंबकमंत्राचा जप केला होता. त्र्यंबकमंत्राच्या जपानें सिद्धि प्राप्त करून देणारें हें लिंग असल्यामुळें ह्यास त्र्यंबकेश्वर हें नांव प्राप्त झालें आहे. ह्या त्र्यंबकेश्वराच्या दर्शनानें सर्व पातकें समूळ नष्ट होतात. त्या ठिकाणीं गोप्रदान करणाराला यात्राफल मिळतें. चैत्रशुक्ल चतुर्दशीला जे कोणी येथें पूजन व जागरण करितील त्यांच्या सर्व इच्छा पूर्ण होतील.

---

# अध्याय ९२ वा.

## अघोरेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; पार्वति! आतां साहाव्या अघोरेश्वराचें माहात्म्य सांगतों. हें त्र्यंबकेश्वराच्या वायव्येस आहे. हें लिंग इच्छित फल देणारें असून पातकांचें शमन करणारें आहे. जे कोणी येथें स्नानपूजनादि करितात त्यांस मेरुदानाचें पुण्य प्राप्त होतें. जे कोणी येथें श्राद्धविधि करितात ते कल्पपर्यंत पितरांसह शिवलोकीं आनंदानें जाऊन राहतात. ज्यानें अघोरेश्वरासंनिध श्राद्ध केलें त्यास गयाश्राद्ध अगर अश्वमेध यज्ञ करण्याची जरूरी नाहीं. थोडेंहि सुवर्ण यात्रेंत खर्च केलें तरी त्याचें फल पुष्कळ मिळतें.

# अध्याय ९३ वा.

## महाकालेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; पार्वति! नंतर महाकालेश्वरतीर्थांत जाऊन स्नान करावें. हें तीर्थ अघोरेश्वरतीर्थाच्या उत्तरेस आहे. ह्या तीर्थाचा व्यास तीस धनुष्यें आहे. ह्यालाच कृतयुगांत चित्रांगदेश्वर असें नांव होतें; त्याला आज कलियुगांत महाकालेश्वर म्हणतात. ह्या लिंगांत शंकराचें स्वतः वास्तव्य आहे. जे कोणी ह्या महाकालेश्वरलिंगाचें पूजन सकाळीं उठून "**ॐ नमः शिवाय**" ह्या षडक्षर मंत्रानें करितात ते मृत्यूलाहि जिंकतात. कृष्णपक्षांतील अष्टमीला प्रदोषकाळीं जे कोणी महाकालेश्वरापुढें गुग्गुलु व तुपाचा दिवा लावितील त्याचे हजार अपराध परमेश्वर सहन करितो. त्याठिकाणीं गोप्रदानाचें फल विशेष आहे, असें ऋषी म्हणतात. येथें गोप्रदान करणारा पुरुष एकवीस कुळांचा उद्धार करितो. देवाच्या दक्षिणभागीं जो '**शतरुद्रीय**' मंत्राचा जप करितो तो पितृमातृकुळांचा उद्धार करितो. बाल्यावस्थेंत, तारुण्यावस्थेंत किंवा वृद्धावस्थेत जें कांहीं पाप घडलें असेल तें सर्व महाकालेश्वरदर्शनानें नाश पावेल. उत्तरायण प्राप्त झालें असतां अर्थात् मकरसंक्रांत आली असतां जे घृत (तूप) व कंबल (घोंगडें) ह्यांचें दान करितात ते जन्ममरणरूप संसारापासून परावृत्त होतात. महाकालेश्वराच्या दर्शनानें जो दुःखी असेल तो दुःखमुक्त होईल, जो दरिद्री असेल तो श्रीमान् होईल; व जो दुर्भग असेल तो सुभग होईल, ह्याप्रमाणें हे पार्वती! तुला महाकालेश्वराचें माहात्म्य थोडक्यांत सांगि-

तलें आहे. ह्याचें पूर्वीं चित्रांगद राजानें पूजन केल्यामुळें ह्याचें नांव चित्रांगदेश्वर असेंहि प्राप्त झालें आहे. ह्याप्रमाणें हें आख्यान श्रवण करणारे मुक्त होतात.

## अध्याय ९४ वा.

### भैरवेश्वरमाहात्म्य.

शंकर ह्मणतात, पार्वति! नंतर भैरवेश्वराचें दर्शन घ्यावें. हें स्थान महाकालेश्वराच्या आग्नेयदिशेस आहे. हें सर्व इच्छा पूर्ण करणारें आहे; व दारिद्र्यादिकांचा नाश करणारें आहे; ह्याचेंच ह्या कृतयुगांत चंडेश्वर असें नांव होतें. हें लिंग चंड नांवाच्या माझ्या गणानें पूजिलें होतें; ह्मणून ह्याला चंडेश्वर ह्मणतात. त्या शिवलिंगाच्या दर्शनानें सर्वपापापासून मुक्ति होते. त्याठिकाणीं भाद्रपद कृष्ण चतुर्दशीला उपवास करून जो जागरण करितो तो मोक्षाला जातो. ह्या लिंगाच्या दर्शनानें कायिक, वाचिक व मानसिक असें त्रिविध पाप नाश पावतें. ह्याठिकाणीं तिळ, सुवर्ण व वस्त्र ह्यांचीं दानें करावीत, ह्मणजे पुण्यप्राप्ति होते. हा प्रलयकाळीं भैरव ( भयंकर ) रूप घेऊन सर्वांचें हरण करतो; ह्मणून त्यासच भैरवेश्वर असें ह्मणतात. प्रलयकाळाच्या शेवटीं हाच भैरव प्रभासक्षेत्रामध्यें स्वस्वरूपानें राहिला आहे; व ह्याचें पूजन सर्व मनोरथ सफल करणारें आहे, ह्याप्रमाणें हे पार्वति! तुला हें भैरवमाहात्म्य संक्षेपेकरून सांगितलें आहे, ह्याच्या श्रवणानें अतिभैरव ह्मणजे अत्यंत भयकर अशीं पातकें नाश पावतात.

## अध्याय ९५ वा.

### मृत्युञ्जयेश्वरमाहात्म्य.

शंकर ह्मणतात; पार्वति! नंतर मृत्युञ्जयेश्वराचें दर्शन घ्यावें. हें स्थान भैरवेश्वराच्या आग्नेयेस दहा धनुष्याच्या अंतरावर आहे सागरादित्याच्या पश्चिमेस हें चार धनुष्य अंतरावर आहे. ह्याच्या दर्शनानें व स्पर्शानें सर्व पातकें नाश पावतात. ह्याला पूर्वीं कृतयुगांत नंदीश्वर नांव होतें, ज्याठिकाणीं पूर्वीं नंदि नांवाच्या माझ्या गणानें ह्याची आराधना केली होती; म्हणून त्यास नंदीश्वर म्हणत असत. ह्याठिकाणीं मृत्युञ्जय मंत्राचा आराधनानें ईश्वर संतुष्ट होतो, म्हणून ह्यास मृत्युञ्जयेश्वर म्हणतात. जे कोणी ह्याचें पूजन

करितात, त्याची सात जन्माचीं पातकें नाश पावतात. ह्या लिंगाची पंचामृतानें पूजा करावी; व तसेंच कापूर, वाळा, चंदन, कस्तुरी व पुष्पें ह्यांनींहि ईश्वराचें पूजन करावें. नंतर धूप, दीप, वस्त्रें वगैरे पदार्थांनीं यथाशक्ति पूजन करावें; व नैवेद्य अर्पण करावा. नंतर ईश्वरास नमस्कार करून विद्वान् ब्राह्मणाला सुवर्णादिकांचें दान करावें. ह्याप्रमाणें जे कोणी मृत्युंजयेश्वराचें पूजन करितात त्यांस तीर्थयात्रांचें संपूर्ण फल मिळतें; व त्याच्या जन्माचें सार्थक होतें. ह्याप्रमाणें हे पार्वति ! तुला संक्षेपेंकरून मृत्युञ्जयेश्वराचें माहात्म्य सांगितलें आहे; हें सर्व पापांचें क्षालन करणारें व सर्व इच्छा पूर्ण करणारें असें आहे.

---

# अध्याय ९६ वा.

## कामेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; हे पार्वती ! नंतर कामेश्वराचें दर्शन घ्यावें. हें मृत्युञ्जयेश्वरतीर्थाच्या उत्तरेस तीन धनुष्य लांब आहे. त्रेतायुगांत ह्यालाच रतीश्वर म्हणत असत. जे कोणी ह्या कामेश्वराचें दर्शन घेऊन पूजन करितात ते सात जन्मांतील पातकापासून मुक्त होऊन त्यांचे सर्व मनोरथ सफल होतात. पूर्वी रति नांवाची एक कामाची ( मदनाची ) पत्नी होती. ज्या वेळी शंकरानें कामाला जाळिलें; त्यावेळीं रतीनें पतीच्या प्राप्तीकरितां येथें तप केलें. रतीनें येथें चार युगेंपर्यंत अंगठ्यावर उभें राहून ईश्वराची आराधना केली. अशाप्रमाणें पुष्कळ काळ निघून गेल्यावर तेथें एकाएकीं एक शिवलिंग जमीन फोडून बाहेर आलें; व आकाशवाणी झाली कीं, तूं जर ह्या लिंगाचें पूजन करिशील तर तुला तुझ्या पतीची प्राप्ति होईल. अशी आकाशवाणी ऐकून रतीला आनंद झाला; व तिनें तेथें शिवलिंगाचें पूजन केलें. शिवपूजनानें एकाएकीं तेथें काम उत्पन्न झाला. जसा एकादा मनुष्य झोपेंतून उठतो त्याप्रमाणें त्या उत्पन्न झालेल्या कामाला पाहून रतीला आनंद झाला; ती नित्य त्या लिंगाचें पूजन करूं लागली. जे कोणी ह्या लिंगाचें पूजन करितात त्यांस पतिप्राप्ति होते. ह्याकरितां ह्या लिंगाचें नांव रतीश्वर किंवा कामेश्वर असें प्राप्त झालें आहे. ह्या लिंगाच्या कृपेनें सर्व काम परिपूर्ण होतात. जे कोणी चैत्र शुक्ल त्रयोदशीला ह्या लिंगाचें पूजन करितात ते कामाप्रमाणें सुस्वरूप होऊन सौभाग्याला मिळवितात.

---

## अध्याय ९७ वा.

### योगेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; पार्वती ! नंतर योगेश्वराचें पूजन करावें. हें कामेश्वराच्या दक्षिणदिशेला सात धनुष्याच्या अंतरावर आहे. ह्याच्या दर्शनानें सर्व पातकें नाश पावतात. ह्यालाच गणेश्वर असें कृतयुगांत नांव होतें. पूर्वी माझे असंख्य गण प्रभासक्षेत्राचा अतुल महिमा ऐकून त्याठिकाणीं गेले होते. तेथें त्या गणांनीं योगधारणेनें हजारो वर्षें माझी आराधना केली. नंतर मी प्रसन्न होऊन त्या सर्वांस मुक्ति देऊन त्यांच्या सर्व इच्छा तृप्त केल्या. त्या योगानें शंकर जो मी तो प्रसन्न झाल्यामुळें त्यांस योगेश्वर असें नांव प्राप्त झालें आहे. जो ह्या योगेश्वराचें पूजन करितो त्यास मेरुपर्वतदानाचें पुण्य लागतें. त्या ठिकाणीं वृषभ ( बैल ) याचें दान करावें. ह्याप्रमाणें प्रभासक्षेत्रांतील अकरा रुद्रांचीं माहात्म्यें तुम्हांस सांगितलीं; त्यां सर्वांत सोमेश्वर हें स्थान श्रेष्ठ आहे.

## अध्याय ९८ वा.

### चन्द्रेश्वरमाहात्म्य.

नंतर चन्द्रेश्वराचें दर्शन घ्यावें. हें सोमेश्वराच्या वायव्य दिशेस साठ धनुष्यें अंतरावर आहे. हे लिंग सर्व पातकांचें नाशन करणारें आहे. त्रेतायुगांत ह्यालाच पृथ्वीश्वर नांव प्राप्त झालें होतें; ह्याचीच चंद्रानें आराधना केल्यामुळें ह्यालाच चंद्रेश्वर हें नांव प्राप्त झालें. नंतर ह्या लिंगाला पृथ्वीश्वर व चंद्रेश्वर अशीं नांवें कशीं प्राप्त झालीं, असा पार्वतीचा प्रश्न ऐकून शंकर म्हणतात, पार्वति ! पूर्वीं ही सर्व पृथ्वी दैत्यांच्या भारानें अत्यंत पीडित झाली होती. ज्या वेळीं तो दैत्यभार पृथ्वीला सहन होईना त्या वेळीं पृथ्वीनें गाईचें रूप घेतलें; व ती त्रैलोक्यांत भ्रमण करूं लागली. अशातऱ्हेनें गोरूपधारी पृथ्वी शंभर वर्षें फिरत असतां सहज ह्या प्रभासक्षेत्रांत प्राप्त झाली. ह्या पृथ्वीनें स्वतःची पीडा दूर व्हावी ह्या उद्देशानें प्रभासक्षेत्रांत एक शिवलिंग स्थापित केलें; व त्याचें पृथ्वीनें भक्तिपूर्वक पूजन केलें; व शंभर वर्षेंपर्यंत ईश्वराराधना केली; त्या वेळीं मी प्रसन्न होऊन पृथ्वीला बोललों कीं, हे पृथ्वि ! तुझें तपाचरण पाहून मी तुष्ट झालों आहे; तुझ्या सर्व इच्छा पूर्ण होतील. तुला पीडा देणाऱ्या दैत्यांचा विष्णु नाश करून टाकील, व तुझा भार दूर करील.

हें तूं स्थापिलेलें लिंग पृथ्वीश्वर नांवानें प्रसिद्ध होईल; व या लिंगाचेठिकाणीं मी स्वतः येऊन राहीन. जे कोणी भाद्रपद कृष्ण तृतीयेच्या दिवशीं ह्या लिंगाचें पूजन करितील त्यांस हजार अश्वमेध यज्ञ केल्याचें पुण्य प्राप्त होईल. ह्या लिंगाचे समीप कृमिकीटकादि प्राणीसुद्धा जरी मृत होतील तरी ते मोक्षाला जातील. पृथ्वीशाच्या पूजनाचें फल मेरुदानाहून अधिक आहे. ह्याप्रमाणें पृथ्वीला वर देऊन मी गुप्त झालों. नंतर वाराहकल्पामध्यें एके काळीं दक्षाच्या शापानें चंद्र क्षयी बनला असतां तो चंद्र प्रभासक्षेत्रामध्यें येऊन ह्याच पृथ्वीश्वराचें पूजन करिता झाला; व चंद्रानें तेथें पिकून गळलेलीं झाडाचीं पानें खाऊन ईश्वराराधना केली. त्यायोगें मी प्रसन्न होऊन चंद्राला पापमुक्त केलें; व ह्याच पृथ्वीश्वराला चंद्रेश्वर असें दुसरें नामाभिधान दिलें. हें माहात्म्य श्रवण करणारा पापरहित व रोगमुक्त होऊन तो सर्व सिद्धि मिळवितो.

---

## अध्याय ९९ वा.

### दंडपाणिचक्रधरमाहात्म्य.

शंकर ह्मणतात; पार्वती! नंतर दंडपाणीचक्रधर जेथें राहिला आहे, तेथें जावें. हें स्थान चंद्रेश्वराच्या पूर्वेस व सोमेश्वराच्या उत्तरेस व गंधर्वेश्वराजवळ पांच धनुष्याच्या अंतरावर आहे. आतां ह्याची उत्पत्ति सांगतों. पूर्वी काशीनगरींत पौंड्रक नांवाचा राजा राहत असे. तो नित्य ब्राह्मणाच्या मुखानें पुराणश्रवण करीत असे. त्या पुराणांत त्या राजानें असें ऐकिलें होतें कीं, कल्पाच्या आरंभी द्वापारयुगाच्या शेवटीं वासुदेव नांवाचा विष्णूचा एक अवतार होणार आहे. तो मूर्खबुद्धि पौण्ड्रक राजा स्वतःलाच विष्णु असें म्हणवूं लागला; व तो स्वतःच्या अंगावर पुराणांत सांगितल्याप्रमाणें विष्णूच्यासारखीं शंखचक्रादि चिन्हें धारण करूं लागला, त्यानें कांहीं काळानंतर जेव्हां विष्णूनें वासुदेवावतार घेतला त्या वेळीं द्वारकेंत आपल्या दूताला पाठवून वासुदेवाला निरोप सांगितला कीं, तूं शंखचक्रादि चिन्हें टाकून दे; जर असें तूं करणार नाहींस तर हा पौण्ड्रक राजा तुला ठार मारील. असें दूतोक्त भाषण ऐकून वासुदेवानें त्याच दूताच्या तर्फे पौंड्रकाकडे निरोप पाठविला कीं, हे राजा ! मी शंखचक्र धारण करून जेव्हां तुझ्या काशीनगरींत येईन तेव्हां तुझ्या सांगण्याप्रमाणें त्या चिन्हांचा त्याग करीन. ह्याप्रमाणें दूताबरोबर पौंड्रकाकडे परत निरोप पाठविल्यानंतर वासुदेव स्वतः गरुडावर बसून पौंड्रकाकडे काशीनगरींत आले. वासुदेव आलेला पाहून पौंड्रकहि सैन्यासह वासुदेवाजवळ प्राप्त झाला. वासुदेवानें आपल्याप्रमाणेंच शंखचक्रादि

चिन्हें धारण केलेल्या पौंड्रकाला पाहून किंचित् हास्य केलें; व वासुदेव पौंड्रकास म्हणतात कीं, तूं म्हटल्याप्रमाणें मी येथें सर्व चिन्हें टाकितों; व हा गरुड तुझ्या ध्वजावर येऊन बसो. असें म्हणून वासुदेवानें गदा व चक्र हीं दोन चिन्हें पौंड्रकाच्या अंगावर फेकिलीं; व त्या योगें पौंड्रकाचा नाश झाला. पौंड्रकनाशामुळें पौंड्रकाच्या पुत्रानें वासुदेवाच्या नाशार्थ शंकराची आराधना करून एक कृत्या उत्पन्न केली; व ती द्वारकेकडे सोडिली. कृत्या आलेली पाहून द्वारकेंतील सर्व लोक वासुदेवाला शरण गेले. नंतर वासुदेवानें सुदर्शन चक्रानें कृत्येचा नाश केला. आपण उत्पन्न केलेल्या कृत्येचा सुदर्शनानें नाश केला असें जाणून ईश्वरानें चक्रावर एक बाण सोडिला. शिवबाणानें आपल्या चक्राचा पराभव केला, असें जाणून वासुदेव स्वतः आपलें चक्र घेऊन काशीनगरींत कालभैरवाजवळ आले. त्या भैरवाजवळ जे दंडपाणि नांवाचे गण होते त्यांनीं चक्रधारी विष्णूला पाहून त्यांचें सांत्वन केलें; व ह्मटलें कीं; तुम्ही आमच्यासह चक्रधारण करून [illegible] स्थिरी राहा. ह्या आपल्या स्थानाला दंडपाणिचक्रधर असें नांव प्राप्त होईल. ह्या दंडपाणिचक्रधराचें जे पूजन करितील ते सर्वप्रकारच्या पीडांपासून मुक्त होतील. माघ कृष्ण चतुर्दशी किंवा अष्टमी ह्या दिवशीं गंधादिकांनीं जे कोणी ह्या दंडपाणिचक्रधराचें पूजन करितील, त्यांचीं सर्व कार्यें निर्विघ्नपणें पार पडून ते सर्वैश्वर्यांनीं युक्त होतील. जे कोणी एकादशीला उपवास करून दंडपाणिचक्रधराचें पूजन करितील ते सर्व पापापासून मुक्त होऊन शिवलोकाला प्राप्त होतील. ह्याप्रमाणें हें संक्षेपानें दंडपाणिचक्रधराचें माहात्म्य मी तुला सांगितलें आहे.

---

## अध्याय १०० वा.

### दूर्वासाचा सांबाला शाप.

शंकर ह्मणतात; पार्वती ! नंतर दंडपाणिचक्रधराच्या उत्तरेस व बालब्रह्माच्या वायव्येस सांबादित्य नांवाचें एक लिंग आहे; तें श्रीकृष्ण पुत्र जो सांब त्यांनीं स्थापिलें आहे. भास्करद्वीपामध्यें हीं तीन स्थानें आहेत. तीं अनुक्रमें मित्रवन, मुंडीर व सांबादित्य ह्या नांवानें प्रसिद्ध आहेत. नंतर पार्वतीनें शंकरास प्रश्न केला कीं, हा सांब कोण? कोणाचा मुलगा? कशाकरितां सूर्य ह्याला वर देण्याकरितां प्राप्त झाला, तें सर्व आह्माला सांगा. असा पार्वतीचा प्रश्न ऐकून शंकर ह्मणतात; हे पार्वति! जे एकंदर बारा सूर्य आहेत; त्यांपैकीं विष्णु नांवाचा जो एक सूर्य आहे, त्यानें भूभार दूर करण्याकरितां यादव कुलामध्यें श्रीकृष्ण नांवानें अवतार घेतला

होता. त्या श्रीकृष्णाची जांबवती नांवाची जी स्त्री त्या स्त्रीचे ठिकाणी श्रीकृष्णापासून सांब नांवाचा एक मुलगा झाला. तो सांब श्रीकृष्णानें कांहीं कारणांनीं शाप दिल्यामुळें कुष्ठरोगी झाला होता. त्या सांबानें श्रीसूर्यनारायणाची आराधना केली; व सूर्यपुर नांवाचें एक नगर वसविलें. श्रीकृष्णानें आपला पुत्र जो सांब त्याला कां शाप दिला? असा पार्वतीचा प्रश्न ऐकून शंकर म्हणतात; हे पार्वति! श्रीकृष्णानें सांबाला कां शाप दिला? तें एकाग्र अंतःकरणानें श्रवण कर. दुर्वासा या नांवाचा एक ऋषि [illegible] उत्पन्न झाला आहे. तो त्रैलोक्यांत स्वच्छंदानें भ्रमण करीत असतां एकदां द्वारकेंत श्रीकृष्णाकडे प्राप्त झाला. दुर्वासाला पाहून सांबानें त्याचा उपहास केला; व त्याची अवहेलना केली. हें पाहून दुर्वासानें तूं कुष्ठरोगी होशील, असा सांबाला शाप दिला.

---

## अध्याय १०१ वा.

### सांबादित्यमाहात्म्य.

नंतर थोड्याच दिवसांत नारद ऋषि श्रीकृष्णाकडे आले. नारदाला पाहतांच सर्वांनीं त्याला नमस्कार केला; परंतु सांबानें मात्र नारदाला नमस्कार केला नाहीं. हें पाहून नारदाला वाईट वाटलें; व तो सांबाविषयींची कहाणी श्रीकृष्णाजवळ सांगूं लागला. नारद म्हणतो; श्रीकृष्णा! ज्या तुझ्या सोळा हजार बायका आहेत, त्यांचें सांबावर फारच प्रेम आहे; व ह्या सांबानें त्या सर्वांना भ्रष्ट करून सोडिलें आहे. असें नारदाचें भाषण ऐकून प्रथम श्रीकृष्णाचा त्याच्या भाषणावर विश्वास बसेना. नंतर नारद पुनः म्हणतो कीं, जर तुझा माझ्या सांगण्यावर विश्वास नसेल; तर ह्याचा तुला प्रत्यक्ष अनुभव दाखवितों कीं, ज्यायोगें तुझी पूर्ण खात्री होईल. शास्त्रनियम असा आहे कीं, स्त्रिया पुरुषाचें सौंदर्य अगर वय ह्याचा बिलकूल विचार करीत नाहींत, तर पुरुष असला कीं, त्याचें सेवन करितात. असें भाषण करून नारदऋषि निघून गेला. एके दिवशीं पुनः नारदऋषि द्वारकेंत आला, त्या वेळां श्रीकृष्ण स्त्रियांसह जलक्रीडा करीत आहेत असें पाहिलें. त्या वेळीं नारदानें सांबाला "तुला श्रीकृष्ण बोलावीत आहेत," असा खोटा निरोप सांगून त्यास श्रीकृष्ण जेथें जलक्रीडा करीत होता, तेथें आणिलें. सांबाला पाहून सर्व स्त्रियांचीं मनें क्षुब्ध झालीं; व त्याचें देहभान नाहींसें झालें. त्या स्त्रियांनीं जलक्रीडा करण्यापूर्वी मद्यप्राशन केलें असल्यामुळें त्या मत्त झाल्या होत्या; व त्यामुळें श्रीकृष्ण जवळ असतां आपण सांबाला पाहून कसें मोहित झालों? श्रीकृष्ण आपणावर रागावेल, हा विचार त्या

स्त्रियांच्या मनांत आला नाहीं; व म्हणूनच शास्त्रकारांनीं "स्त्रियांना मद्यादि मादक पदार्थ देऊं नयेत" असा नियम केला आहे. सांबाच्या दर्शनानें आपल्या स्त्रिया कामवश होऊन अस्वस्थ झाल्या आहेत, असें पाहून व नारदांनीं पूर्वीं सांबासंबंधींचें सांगितलेले गाऱ्हाणें खरें असलें पाहिजे, असा मनाशीं विचार करून श्रीकृष्णाला सांबाचा फारच राग आला; व त्यानें सांबाला "तूं कुष्ठरोगी हो" असा शाप दिला, व "तुम्ही चोरांच्या हवालीं व्हाल" अशा त्या सोळा हजार स्त्रियांना शाप दिला. ज्या वेळीं श्रीकृष्ण निजधामाला गेले त्या वेळीं अर्जुन जवळ असतांही रुक्मिणी, सत्यभामा व जांबवती ह्या तीन श्रीकृष्णाच्या प्रिय स्त्रियांशिवाय बाकी राहिलेल्या इतर सर्व स्त्रिया श्रीकृष्णाच्या शापाप्रमाणें चोरांनीं पळवून नेल्या. सांबहि श्रीकृष्णाच्या शापाप्रमाणें कुष्ठी होऊन लज्जित होता झाला. नंतर सांब प्रभासक्षेत्रीं येऊन तेथें तप करूं लागला; व त्याठिकाणीं एका सूर्याची स्थापना सांबानें केली. सांब त्या सूर्याची दिवसांतून तीन वेळां पूजा करीत असे; व पुढें दिलेल्या स्तोत्रानें तो सूर्याची स्तुति करीत असे. तें स्तोत्र पुढील अर्थाचें आहे. हे सूर्य! आपण त्रैलोक्याला प्रकाश देणारे आहां; व सर्व अंधकाराचा नाश करणारे आहां. आपल्या आगमनानें सूर्यविकासिनीं कमलें प्रफुल्लित होऊन चंद्रविकासिनीं कमलें म्लान होतात; अशा तुम्हाला नमस्कार असो. आपलाच सर्व जगाला आधार आहे, जगताची उत्पत्ति, स्थिति व नाशहि आपणच करितां, त्या तुम्हाला माझा नमस्कार असो. ह्याप्रमाणें सांबाची स्तुति ऐकून सूर्य प्रसन्न होऊन सांबाला अत्यंत आनंद झाला; व तो सूर्याला म्हणतो कीं, सूर्य! श्रीकृष्णाच्या शापानें हें जें मला कुष्ठ प्राप्त झालें आहे, तें सर्व नष्ट होवो, एवढीच माझी इच्छा आहे. ह्याप्रमाणें सांबाचें भाषण श्रवण करून सूर्य साबाला म्हणतो, हे सांबा! तूं माझ्या वराच्या सामर्थ्यानें कुष्ठरोगरहित होशील; व तुला पूर्वींप्रमाणें सौंदर्य प्राप्त होईल; परंतु तूं श्रीकृष्णाच्या सोळाहजार स्त्रियांकडे बिलकूल पाहतां कामां नये. जो कोणी हें स्तोत्र पठण करील तो कुष्ठरहित होईल. आतां तुला माझीं बारा नांवें सांगतों. १ आदित्य, २ सविता, ३ सूर्य, ४ मिहिर, ५ अर्क, ६ प्रतापन, ७ मार्तण्ड, ८ भास्कर, ९ भानु, १० चित्रभानु, ११ दिवाकर, १२ रवि हीं माझी बारा नांवें आहेत. १ विष्णु, २ धाता, ३ भग, पूषा, ५ मित्र, ६ अंशु, ७ वरुण, ८ अर्यमा, ९ इंद्र, १० विवस्वान्, ११ त्वष्टा, १२ पर्जन्य हींहि माझीं दुसरीं बारा नांवें आहेत. आतां ह्याचा मासक्रम चैत्रापासून समजावा; म्हणजे १ चैत्रांतील सूर्याचें नांव विष्णु, २ वैशाखांतील सूर्याचें नांव अर्यमा, ३ ज्येष्ठांतील सूर्याचें नांव विवस्वान्, ४ आषाढांतील सूर्याचें नांव अंशुमान्,

५ श्रावणांतील सूर्याचें नांव पर्जन्य ६ भाद्रपदांतील सूर्याचें नांव वरुण, ७ आश्विनांतील सूर्याचें नांव इंद्र, ८ कार्तिकांतील सूर्याचें नांव धाता, ९ मार्गशीर्षांतील सूर्याचें नांव मित्र, १० पौषांतील सूर्याचें नांव दिवाकर, ११ माघांतील सूर्याचें नांव भग; व १२ फाल्गुनांतील सूर्याचें नांव त्वष्टा, ह्याप्रमाणें बारा महिन्यांत बारा सूर्य आपआपलीं कामें वेळच्या वेळीं करीत असतात. बारा हजार किरणांनीं विष्णु प्रकाश देतो. तीन हजार किरणांनीं अर्यमा, चवदा हजार किरणांनीं विवस्वान्, पंधरा हजार किरणांनीं अंशुमान्. पर्जन्य चवदा हजार किरणांनीं व वरुण तीन हजार किरणांनीं, तेरा हजार एकशे किरणांनीं इंद्र, मित्र, भग; व त्वष्टा एक लक्ष किरणांनीं जगाला प्रकाश देतो. उत्तरायणांत सूर्याचा प्रकाश तीक्ष्ण होतो; व दिवसही मोठे होतात; व दक्षिणायनांत सूर्यप्रकाश मंद होतो; व दिवस लहान होतात. ह्या बारा आदित्यामध्येंहि सांबानें प्रभासक्षेत्रांत स्थापिलेलें जें सांबादित्यस्थान तें सर्वश्रेष्ठ आहे. माघ शुक्ल पंचमीला एकभोजी होऊन षष्ठीला नक्त करावें; व सप्तमीला उपोषण करून सांबादित्याचें पूजन करावें; आणि त्याठिकाणीं ब्राह्मणभोजन घालावें म्हणजे सर्व फलांची प्राप्ति होते. ह्याप्रमाणें सांबाला उपदेश करून सूर्य निघून गेला; व सांबहि कुष्ठमुक्त होऊन द्वारकेला प्राप्त झाला. ह्याप्रमाणें हे पार्वति ! तुला सांबादित्यमाहात्म्य सांगितलें आहे, ह्याच्या श्रवणानें पाप नाश व आरोग्य प्राप्त होतें.

---

## अध्याय १०२ वा.

### कंटकशोधिनीमाहात्म्य.

शंकर म्हणतात; हे पार्वति ! नंतर कंटकशोधिनी नावाचें जें तीर्थ आहे त्या तीर्थांत स्नान करून सर्व देव व दैत्य कंटक म्हणजे पातक त्याचें शोधन म्हणजे नाशन करितात. आश्विन शुक्ल नवमीचे दिवशीं जे कंटकशोधीनीचें पूजन करितात, ते सर्व पापापासून मुक्त होतात; व त्याला कधींहि शत्रुपीडा होत नाहीं. जे कोणी ह्या कंटकशोधिनीचें दर्शन घेतात त्यांस ती पुत्राप्रमाणें रक्षण करते. ह्याप्रमाणें कंटकशोधिनीचें पापनाशक माहात्म्य तुम्हांला सांगितलें आहे; हें श्रवण केलें असतां उत्तमप्रकारें रक्षण होतें.

---

## अध्याय १०३ वा.

### कपालेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; पार्वति ! नंतर कपालेश्वराचें दर्शन घ्यावें. पूर्वीं एकदां दक्ष यज्ञ करीत असतां शंकर तेथें कुश्चल वेष घेऊन प्राप्त झाले. कुश्चलवेषधारी पुरुषाला पाहून दक्षयज्ञांतील ब्राह्मण त्याचा धिक्कार करूं लागले व त्यास हे पापी पुरुषा ! तूं येथें कशाला आलास, लवकरच येथून निघून जा, असें ह्मणूं लागले. असें ब्राह्मणाचें निंदायुक्त भाषण ऐकून कुश्चलवेषधारी शंकरानें हातांतील नरकपाल त्या यज्ञवेदीवर टाकिलें; व किंचित् हास्यहि केलें. एक कपालाची तत्काळ तेथें अनंत नरकपालें दिसूं लागलीं. हें पाहून ब्राह्मण आश्चर्यचकित झाले व आपसांत बोलूं लागले कीं, हें कार्य शंकरावांचून दुसरा कोण करूं शकणार आहे ? नंतर हा कुश्चलवेषधारी पुरुष इतर कोणीहि सामान्य मनुष्य नसून हा शंकरच असला पाहिजे, अशी आपली खात्री करून घेऊन ब्राह्मणांनीं शंकराची स्तुति करण्यास सुरुवात केली. ब्राह्मण म्हणतात; हे ईश्वरा ! आपण सर्व जगाचें आदिकारण असून नित्य व अनंत आहां, तुम्हाला लोक अक्षर, ब्रह्म वगैरे नांवांनीं बोलावितात व तुझी स्तुति करितात. आम्ही तुम्हांला शरण आलों आहों. असें ब्राह्मणांचें स्तोत्र श्रवण करून शंकर म्हण-तात; ब्राह्मण हो ! तुह्मी वर मागून घ्या; नंतर ब्राह्मण म्हणतात शंकरा ! ज्याठिकाणीं आपण कपाल टाकिलेंत तेथें कपालेश्वरनांवानें आपण वास्तव्य करावें. असें ब्राह्मणांचें भाषण ऐकून शंकरानें तेथें वास्तव्य केलें; व त्याचें माहात्म्यहि वर्णित केलें. हें तीर्थ मुक्ति देणारें आहे.

## अध्याय १०४ वा.

### कोटीश्वरमाहात्म्य.

शंकर ह्मणतात; पार्वती! नंतर कोटीश्वराला जावें. हें तीर्थ सर्व प्राण्यांचें पाप दूर करणारें आहे; व संसारपाशापासून मुक्ति देणारें आहे. पूर्वीं शिवभक्त कपा-लेश्वरासमीप अंगाला विभूति लावून तप करीत होते. जटामुकुट धारण करून; व मुंज नांवाच्या गवताची मेखला कंबरेला बांधून शांतचित्तानें क्रोधरहित होत्सा-ते ते शैव ब्राह्मण तप करीत असतां त्यांनीं शिवमंत्राचा कोटी वेळां जप केला; व त्या योगें तेथें शिवलिंगाची पूजा केली. त्या पूजनाच्या योगें शंकर प्रसन्न होऊन त्या

ब्राह्मणांस मुक्ति देते झाले. त्याठिकाणीं कोटी वेळां शिवमंत्राचा जप करून लिंग-पूजन केल्यामुळें अगर तेथें कोट्यावधि ऋषींना सिद्धि प्राप्त झाल्यामुळें त्या लिंगाला कोटीश्वर असें नांव प्राप्त झालें आहे. जे कोणी शिवभक्त ह्या कोटीश्वराचें पूजन करतात; त्यांस कोटि वेळां शिवमंत्राचा जप केल्याचें फळ मिळतें. ह्या कोटीश्वर-लिंगाचें पूजन करून जे कोणी ब्राह्मणांना स्वर्णदान करितात त्यांस कोट्यावधि होम केल्याचें फळ मिळतें; व ऐहिक आणि पारलौकिक सुखहि मिळतें.

---

# अध्याय १०५ वा.

## बालब्रह्ममाहात्म्य.

शंकर म्हणतात; पार्वति ! आतां आम्ही तुम्हांला एक उत्तम रहस्य सांगतों; ऐका. हें रहस्य सर्व पापांचें नाशन करणारें आहे. ह्या प्रभासक्षेत्रांत सोमेश्वर, बालब्रह्म, अर्कस्थल, अर्कादित्य, प्रभासेश्वर, शशिभूषण हे साहा देव श्रेष्ठ आहेत. ह्या साहा देवांच्या दर्शनानें मनुष्य कृतकृत्य होऊन सर्व पातकांपासून मुक्त होतो. नंतर पार्वतीनें शंकराला बालब्रह्माचें माहात्म्य विचारल्यावरून शंकर म्हणतात; पार्वति ! मी तुला बालब्रह्माचें माहात्म्य सांगतों; तें ऐक. ब्रह्मासारखा दुसरा गुरु नाहीं; व ब्रह्मासारखा दुसरा देव नाहीं, जोपर्यंत मनुष्य ब्रह्मदेवाची भक्ति करीत नाहीं; तोंपर्यंतच त्याला दुःखें प्राप्त होतात; व तोंपर्यंतच त्याला शोकादि प्राप्त होतात. ज्यानें आपलें मन ब्रह्मदेवाचे ठिकाणीं आसक्त केलें आहे, असा कोणता पुरुष संसारबंधनापासून मुक्त होत नाहीं. हें बालब्रह्मस्थान कोठें आहे ? असा पार्वतीनें प्रश्न केला असतां शंकर म्हणतात; हे देवि ! सोमेश्वराच्या ईशान्य दिशेस, सांबादित्याच्या आग्नेयेस हें बालब्रह्माचें श्रेष्ठ स्थान आहे. त्याठिकाणीं पुष्कळ कल्पपर्यंत ज्यांना आयुष्य आहे, असे मार्कंडेयासारखे पुष्कळ तपस्वी कल्पपर्यंत तेथें राहतात. ह्याठिकाणीं स्वतः ब्रह्मदेव बालरूप घेऊन राहिल्या-मुळें ह्या स्थानाला बालब्रह्म असें नांव प्राप्त झालें आहे. जगताचा उत्पन्नकर्ता व सर्वसंरक्षक असा ब्रह्मदेव येथें आठ वर्षांचें बालरूप घेऊन आला आहे व त्यानें तप करून येथें शिवलिंग स्थापिलें व त्याचें बालब्रह्म असें नांव ठेविलें. ह्या बालब्रह्माला येथें वास करून बेचाळीस परार्ध वर्षें झालीं आहेत. हें आख्यान सर्व सौभाग्य व पुत्राद्यैश्वर्य देणारें आहे.

ह्याप्रमाणें बालब्रह्ममाहात्म्य श्रवण केल्यानंतर पार्वतीनें प्रत्येक कल्पांतील ह्या लिंगांचीं नांवें विचारल्यावरून शंकर म्हणतात; हे पार्वति ! पहिल्या कल्पांत ह्याचें नांव स्वयंभू असें होतें, दुसऱ्या कल्पांत पद्मभू, तिसऱ्या कल्पांत विश्वकर्ता,

चवथ्या कल्पांत बालब्रह्म अशीं नांवें ह्याला प्राप्त झालीं आहेत. जे कोणी ह्या बालब्रह्माचें नित्य स्मरण करितात ते दीर्घायु होतात. ज्या वेळीं ब्रह्मदेवाची रात्र होते, त्या वेळीं चंद्र, सूर्य, सर्व ग्रह, देव दैत्य, मनुष्य वगैरे त्रैलोक्य नाश पावतें; व ज्या वेळीं ब्रह्मदेवाच्या दिवसाला प्रारंभ होतो त्या वेळीं पुनः सर्व सृष्टीची उत्पत्ति होते. आतां ब्रह्मदेवाच्या दिवसाचें व काळाचें प्रमाण सांगतों; ऐका. निमेषाचा जो पावभाग म्हणजे चतुर्थांश त्याला त्रुटि* म्हणतात, दोन त्रुटि म्हणजे अर्धे निमेष, दोन अर्धे निमेष म्हणजे एक निमेष†, पंधरा निमेष म्हणजे एक काष्ठा, तीस काष्ठा म्हणजें एक कला, तीस कला म्हणजे एक मुहूर्त,‡ पंधरा मुहूर्त म्हणजे एक दिवस; व दिवसाइतकीच रात्र समजावी, म्हणजे तीस मुहूर्त म्हणजे अहोरात्र एक दिवस होय. पंधरा अहोरात्र दिवस म्हणजे एक पक्ष+, दोन पक्ष म्हणजे एक महिना, साहा महिने म्हणजे एक अयन, दोन अयनें म्हणजे एक वर्ष. अशीं त्रेचाळीस लक्ष वर्षें झालीं म्हणजे सौरमानाप्रमाणें चार युगें होतात. अशीं एकाहत्तर वेळां चार युगें निघून गेलीं कीं एक मन्वन्तर होतें. एका मन्वंतराइतकेंच इंद्राचें आयुष्य आहे. हे पार्वति! ह्याप्रमाणें तुला कालमान सांगितलें आहे. एकंदर मन्वंतरें चौदा आहेत व ह्या प्रत्येक मन्वन्तरामध्यें एक एक मनु होतो, अर्थात् मनुहि चौदाच आहेत. त्यांचीं नांवें अनुक्रमें स्वायंभुव, स्वारोचिष, उत्तम, तामस, रैवत, चाक्षुष, वैवस्वत, सावार्णि, अर्कसावार्णि, ब्रह्मसावार्णि, धर्मसावार्णि, रौच्य, भौत्य, दक्षसावार्णि ह्याप्रमाणें हे चौदा मनु आहेत. आतां ह्या चौदा मन्वंतरांतील चौदा इंद्रांचीं नांवें सांगतों. विश्वभुक्, विपश्चित्, सुकीर्ति, शिबि, विभु, मनोभुव, तेजस्वी, बलि, अद्भुत, शांति, वृषा, ऋतधाम्ना, दिवस्वामी, शुचि ह्याप्रमाणें हे चौदा इंद्र ब्रह्मदेवाचा जेव्हां दिवस संपतो; व रात्रीला प्रारंभ होतो, तेव्हां नाश पावतात. आता कल्पांचीं नांवें सांगतों. पहिला-श्वेतकल्प, दुसरा नीललोहितकल्प, तिसरा वामदेवकल्प, चौथा राथंतरकल्प, पांचवा रौक्मकल्प, साहवा प्राणकल्प, सातवा बृहत्कल्प, आठवा कंदर्पकल्प, नववा सद्यकल्प, दाहवा ईशानकल्प, अकरावा ध्यानकल्प, बारावा सारस्वतकल्प, तेरावा उदानकल्प, चौदावा गरुडकल्प, पंधरावा कूर्मकल्प, सोळावा नारसिंहकल्प, सतरावा समाधिकल्प, अठरावा आग्नेयकल्प, एकोणीसावा सोमकल्प, विसाव

*त्रुटि म्हणजे मराठींत ज्याला चुटकी म्हणतात. एक चुटकी वाजविण्यास जितका वेळ लागतो, त्या वेळेला अर्थात् काळाला 'त्रुटिकाल' असें म्हणतात. †निमेष म्हणजे डोळ्याची पापणी उघडण्यास व मिटण्यास जो वेळ लागतो त्याला 'निमेषकाल' म्हणतात. ‡मुहूर्त म्हणजे दोन घटका. +शुक्लपक्ष व कृष्णपक्ष हे प्रत्येक महिन्यांत येणारे दोन पक्ष होत.

भावनकल्प, एकविसावा सुतमालीकल्प, बावीसावा वैकुण्ठकल्प, तेवीसावा अर्चिकल्प, चोवीसावा रुद्रकल्प, पंचवीसावा लक्ष्मीकल्प, सव्वीसावा वैराजकल्प, सत्ताविसावा गौरीकल्प, आठ्ठाविसावा अंधककल्प व एकोणतिसावा माहेश्वरकल्प व तिसावा पितृकल्प अशा तऱ्हेनें हे तीस कल्प आहेत. ब्रह्मदेवाच्या तीस कल्पांनीं ब्रह्मदेवाचा एक महिना होतो, कारण ब्रह्मदेवाचा एक अहोरात्र दिवस ह्मणजेच कल्प होय. ज्या कल्पामध्यें परमेश्वरानें वाराह अवतार घेऊन पृथ्वीचा उद्धार केला तोच ब्रह्मदेवाचा पहिला दिवस अर्थात् पहिला कल्प होय. ह्मा नियमाप्रमाणें ब्रह्मा आठ वर्षांचा झाला असतां बालस्थितींतच तो ह्या प्रभासक्षेत्रांत राहता झाला. बालब्रह्माला प्रभासक्षेत्रांत राहून एक परार्ध समाप्त झालें; व आतां दुसरें परार्ध सुरू आहे. अशा त्या बालब्रह्माचें पूजन करणारे सर्व पापापासून मुक्त होतात.

## अध्याय १०६ वा.

### ब्राह्मणप्रशंसा.

पार्वती शंकरांना प्रश्न करिते; हे शंकर ! जें ब्रह्म म्हणून आपण सांगितलें त्या ब्रह्माच्या पूजनाचा विधि मला सांगा. त्यांचप्रमाणें प्रभासक्षेत्रामध्यें बालरूपधारी पितामह ( ब्रह्मदेव ), त्याचें पूजन कसें करितात तेंहि सांगा. त्या पितामहाच्या पूजनाचे कोणकोणते मंत्र आहेत, तेंहि आपण सांगा. तसेंच त्याचे विधि कोणते ? ब्राह्मण किती असावेत; व कसे असावेत तें सर्व मला विस्तारपूर्वक सांगा. असा पार्वतीचा प्रश्न ऐकून शंकर म्हणतात; हे पार्वति ! हा जो तूं प्रश्न केला आहेस, तो फारच चांगला आहे. आतां मी तें सर्व तुला सांगतों, एकाग्र मनानें श्रवण कर. हें श्रवण केलें असतां मनुष्य सर्व पातकांपासून मुक्त होतो. समुद्रवलयांकित पृथ्वीवर जेवढे ब्राह्मण आहेत ते सर्व माझेच अंश आहेत, अशा ब्राह्मणांची जे पूजा करितात, ते माझीच पूजा करितात, असें मी समजतों. जे कोणी ब्राह्मणांना संतुष्ट ठेवितात ते मलाच संतुष्ट ठेवितात. जे ब्राह्मण तेच मी व जो मी तेच ब्राह्मण आहों, आमच्यांत भेदभाव मुळींच नाहीं. ब्राह्मणांची पूजा करून जे त्यांना संतुष्ट ठेवितात, त्यांच्यावर मी प्रसन्न होतों; व जे ब्राह्मणांशीं वैर करितात ते माझे शत्रु होत. ह्यांत संशय नाहीं. जे केवळ माझीच पूजा करितात त्यांच्या पूजनानें मी इतका संतुष्ट होत नाहीं; तर जितका ब्राह्मणाची पूजा केली असतां मी संतुष्ट होतों. जितके ब्राह्मण पृथ्वीतलावर व्रतनियमानें वागणारे आहेत व जितके व्रतनियमानें वागणारे नाहींत, त्या सर्वांची पूजा केली पाहिजे; कारण ब्राह्मण सर्व येऊन

तेथून पुण्यरूपच आहेत. क्षेत्रांत राहणाऱ्या ब्राह्मणांची श्राद्धकर्मामध्येंसुद्धां परीक्षा करूं नये. ब्राह्मणाची परीक्षा करीत बसणें फारच वाईट व दोषास्पद आहे. कोणी, खुजा, थोटा, लंगडा, दरिद्री व रोगी कसाहि ब्राह्मण असो, तो जर वेदाध्ययन केलेला असेल तर श्राद्धकर्मामध्यें त्याची योजना करावी. ब्राह्मण हा जन्माला आल्यापासून पूज्य आहे. त्यांतून वेदाध्ययन केलेला ब्राह्मण अधिक पूज्य आहे. वेदार्थ जाणणारा ब्राह्मण तर सर्वांमध्यें श्रेष्ठ आहे. ब्राह्मणाची कधींहि निंदा करूं नये. मी ब्राह्मणरूपानें पृथ्वीवर हिंडत असतों, हें अज्ञानी लोकांना कळत नाहीं; व त्यामुळें ते ब्राह्मणांची निंदा करितात. जे कोणी मत्स्वरूपी ब्राह्मणांना भलतींच कामें करावयास लावतात ते मेल्यानंतर त्यांना यमदूत करवतीनें लांकडांप्रमाणें कापून काढतात. जे कोणी नराधम ब्राह्मणांना वाणीनें त्रास देतील किंवा पायानें ताडण करितील त्यांस मेल्यानंतर यमदूत यमलोकाला नेतात व त्यांस जमिनीवर पाडून लाथा मारितात. त्याचप्रमाणें अशा लोकांची जिव्हा यमदूत अग्नीप्रमाणें तीक्ष्ण अशा शस्त्रानें कापून काढितात. जे कोणी ब्राह्मणांकडे पापदृष्टीनें पाहतात, ते वज्रतुंड नांवाच्या नरकामध्यें जाऊन पडतात. जे कोणी ब्राह्मणांचा नाश करितात, ते ब्रह्महत्येनें युक्त होऊन पन्नास कोटी नरकांत क्रमाक्रमानें जाऊन पडतात; करितां हे पार्वति! ब्राह्मणांना नित्य वंदन करीत असावें. ब्राह्मणाची अन्नपानादिकांनी पूजा करावी. ब्राह्मणांना सर्वप्रकारचीं दानें घेण्याचा अधिकार आहे. ब्राह्मणाशिवाय इतर जर कोणी दान घेईल तर तो अधोगतीला प्राप्त होईल. जो कोणी तपश्चर्या करणारा आहे व निष्पाप आहे; त्यानें कितीहि दानें घेतलीं तरी त्यापासून त्यांची कोणत्याहि प्रकारची हानि होत नाहीं. जो ब्राह्मण नित्य अध्यात्मचिंतन करितो तो सर्व पातकापासून मुक्त होतो. इंद्रादि लोकपालसुद्धां ब्राह्मणांचे गुणानुवाद वर्णन करितात; व त्यांचें पूजन करितात; ह्मणून ब्राह्मणाचा अपमान कधींहि कोणींहि करितां उपयोगी नाहीं. ब्राह्मणांचें सामर्थ्य असें आहे कीं, ते क्रुध झाल्यास त्रैलोक्य भस्म करूं शकतील. अगस्त्यमुनीनें समुद्राचें प्राशन केलें, हें सर्वांना माहीत आहेच. तात्पर्य ब्राह्मणाशी कधींहि वैर करूं नये. जरी ब्राह्मण कितीहि पापी असला तरी तो अवध्य आहे, असें समजावें. ज्याप्रमाणें अग्नीमध्यें अर्पण केलेलें द्रव्य देवतांना मिळतें त्याप्रमाणेंच ब्राह्मणांच्या मुखांत घातलेलें द्रव्यहि देवतांना पोहोंचतें. ब्राह्मणांच्या शरीरांत सर्व देवता राहत असतात; ह्मणून ब्राह्मणांचे अवश्य पूजन करावें. ब्राह्मण विद्वान् असो किंवा अविद्वान् असो, तो माझें शरीर आहे, असें परमेश्वरानें सांगितलें आहे. ज्याप्रमाणें श्मशानांतील अग्निसुद्धां पवित्रच असतो त्याप्रमाणें कितीही पातकी ब्राह्मण असला तरी तो नित्य पवित्रच आहे. क्षेत्रांत राहणारे जे ब्राह्मण आहेत त्यांचे

प्राजापत्य, कपोत, ग्रंथिक, कुटिक, वेताल, पद्महंस, धृतराष्ट्र, बक, कंक, गोपाळ, त्रुटिक, मठर, गुटिक व दंडिक हे प्राजापत्यादि चवदा भेद आहेत. आतां प्रजापत्यादि चवदा प्रकारच्या ब्राह्मणांचीं लक्षणें सांगतों. जे कोणाचीहि हिंसा न करितांना गुरुसेवा, वेदाध्ययन व संध्यादि नित्य कर्म करून सत्य भाषण करितात; व चौर्यादि दुष्कर्में स्वप्नांतसुद्धां जे करीत नाहींत त्यांस प्राजापत्य ब्राह्मण म्हणतात. कपोत पक्ष्याप्रमाणें धान्यकण वेंचून जे आपला निर्वाह करितात त्यांस कपोत ब्राह्मण म्हणतात. जे घरें बांधून राहतात त्यांस ग्रंथिक म्हणतात. जे नित्य शिवाराधना करितात त्यांस साधक म्हणतात. तीर्थादि विधि करणारे जे त्यांस कुटिक म्हणतात. साहसाचीं कामें करणारे जे ब्राह्मण त्यांस वेताल म्हणतात. सकाम कर्म करणाऱ्यांना पद्महंस म्हणतात. जे जिंकलेल्या जगांत राहतात ते धृतराष्ट्र होत. जे ब्राह्मण स्वार्थसाधु असतात. त्यांस बक म्हणतात. पाण्याच्या आश्रयानें राहणारे जे ब्राह्मण त्यांस कंक ब्राह्मण म्हणतात. जे नित्य गोसेवा करून पंचगव्य प्राशन करितात त्या ब्राह्मणास गोपाळ म्हणतात. अत्यल्प भोजन करणाऱ्यांना त्रुटिक म्हणतात. जे मठांत म्हणजे झोपडींत राहतात त्यांस मठर म्हणतात. आठ गुटिका (गोळ्या) एवढें भोजन करणारे जे ब्राह्मण त्यांस गुटिक म्हणतात. स्वतःच्या शरीराला दंड ( त्रास ) देऊन जे शिवानुष्ठान करितात, त्यांस दंडिक म्हणतात. क्षेत्रांत राहणाऱ्या सर्वप्रकारच्या ब्राह्मणांची सामान्य व विशिष्ट अशीं दोनप्रकारचीं लक्षणें तुला सांगितलीं आहेत. अशाप्रकारें अनेक कर्मांनीं युक्त असलेले ब्राह्मण ह्या प्रभासक्षेत्रांत राहत असतात. हे सर्व ब्राह्मण ह्या बालरूपधारी पितामहाचें पूजन करीत असतात. वेदाध्ययन करणाऱ्या सर्वांनीं ह्याचें पूजन करावें.

---

## अध्याय १०७ वा.

### बालब्रह्मपूजामाहात्म्य.

शंकर म्हणतात; पार्वति ! आतां तुला बालब्रह्माच्या पूजेचा विधि सांगतों. प्रथम भक्तिमाहात्म्य वर्णितों. भक्ति अनेकप्रकारची आहे. वाणी, मन व बुद्धि यांनीं केलेली भक्ति मोठमोठ्या सिद्धि मिळवून देण्यास समर्थ असते. लौकिकी भक्ति, वैदिकी भक्ति आणि आध्यात्मिकी भक्ति अशा मुख्य तीन प्रकारच्या भक्ती आहेत. पैकीं कांहीं भक्ति ध्यानानें व धारणेनें केली जाते. कित्येक भक्ति वेदाध्ययनानें व स्मरणानें होते. ज्यायोगें ब्रह्म प्रसन्न होतें, त्या भक्तीस मानसी भक्ति म्हणतात. वैदिकमंत्रांच्या पठनानें, नमस्कारांनीं, होमादिकांनीं, श्राद्धादि विधीनें, जपानें,

स्तुतीनें जी भक्ति केली जाते ती वाचिकी भक्ति होय. व्रतादिकांनीं, इंद्रियनि- ग्रहांनीं व चांद्रायणादिकांनीं जी भक्ति केली जाते, ती कायिकी भक्ति होय. गाईचें तूप, दूध, दहीं, मध व साखर; त्याचप्रमाणें दर्भमिश्रित जल, गंध, फुलें, अनेकप्रकारच्या स्तुति, धूप, सुगंधी पदार्थ, अलंकार, माळा वगैरेनीं केलेली जी भक्ति ती लौकिक भक्ति होय. वैदिकप्रयोगानें जी भक्ति केली जाते ती वैदिकी भक्ति होय. ह्याप्रमाणें अनेकप्रकारच्या भक्तींचें चिंतन करून, त्याप्रमाणें ब्रह्माची उपासना करितात ते ब्रह्मभक्त होत. आतां पूजाविधि सांगतों, ऐका. प्रथम स्नान करून नंतर शुभ्रवस्त्रादि परिधान करावें; व पूजासाहित्य घेऊन ब्रह्मपूजन करावें. प्रथम पंचामृतानें ब्रह्माला स्नान घालावें; नंतर "ॐ तत्सवितुर्वरेण्यं०" ह्या मंत्रानें गोमूत्र घ्यावें. "आप्ययस्वसेमतुते०" ह्या मंत्रानें दूध, "दधिक्राव्णो०" ह्या मंत्रानें दहीं, "तेजोऽसिशुक्रम्" ह्या मंत्रानें तूप, "गंधद्वारां०" ह्या मंत्रानें गोमय, "देवस्यत्वा" या मंत्रानें दर्भमिश्रजल, "आपोहिष्ठा०" ह्या मंत्रानें ते पांच ( गोमूत्र, गोमय, दूध, दहीं व तूप हे पांच ) पदार्थ एकत्र करून त्या पंचगव्यानें ब्रह्मदेवाला स्नान घालावें. एक अब्ज वर्षेपर्यंत जेवढें केलेलें पातक आहे तेवढें सर्व पातक ह्या ब्रह्मदेवाला स्नान घालण्यानें नष्ट होतें. ह्याप्रमाणें पंचगव्यस्नान घातल्यानंतर कर्पुर (कापूर) व अगरु ह्या सुगंधी पदार्थांनें युक्त अशा उदकानें स्नान घालावें. नंतर गायत्री मंत्राच्या प्रत्येक अक्षरानें देवाला न्यास करावेत. 'त' ह्या अक्ष- रानें मस्तकाला स्पर्श करावा. 'स' ह्या अक्षरानें मुखाला स्पर्श करावा. 'वि' ह्या अक्षराचा उच्चार करून कंठाला स्पर्श करावा. 'तु ह्या अक्षरानें सर्व सांध्यांना स्पर्श करावा 'व' हें अक्षर उच्चारून हृदयाला स्पर्श करावा. रे ह्या अक्षराच्या उच्चारानें दोन कुशींना स्पर्श, करावा. 'णि' ह्या अक्षरानें पार्श्वबाजूंना स्पर्श करावा. 'य' ह्या अक्षरानें कंबरेला स्पर्श करावा 'भ' ह्या अक्षरानें नाभीला ( बेंबीला ) स्पर्श करावा. 'गो' ह्या अक्षरानें उजव्या मांडीला स्पर्श करावा. 'दे' ह्या अक्षरानें डाव्या मांडीला स्पर्श करावा. 'व' ह्या अक्षरानें पायांना स्पर्श करावा. 'स्य' ह्या अक्षरानें अंगठ्यांना स्पर्श करावा. 'धी' ह्या अक्षरानें वक्षःस्थलाला स्पर्श करावा. 'म' ह्या अक्षरानें मांड्यांच्या मूळांना स्पर्श करावा. 'हि' ह्या अक्षरानें लिंगाला स्पर्श करावा. 'धी' ह्या अक्षरानें हृदयाला स्पर्श करावा. 'यो' ह्या अक्षरानें खालच्या ओठाला स्पर्श करावा. 'यो' ह्या अक्षरानें वरच्या ओठाला स्पर्श करावा. 'न' ह्या अक्षरानें नाकाला स्पर्श करावा. 'प्र' ह्या अक्षरानें डोळ्याला स्पर्श करावा. 'चो' ह्या अक्षरानें भुवयांना स्पर्श करावा. 'द' ह्या अक्षरानें प्राणाला स्पर्श करावा. 'यात्' ह्या शब्दानें दोन भुवयांच्या मध्यभागीं प्राणाची स्थापना करावी.

ह्याप्रमाणें गायत्रीन्यास करून नंतर गंधादि सोळा उपचारांवर " अपवित्रः पवित्रो वा " ह्या मंत्रानें उदकानें प्रोक्षण करावें. नंतर वेदोक्त अगर पुराणोक्त मंत्रानीं अधिकारपरत्वें देवाची षोडशोपचारांनीं पूजा करावी. जे कोणी पौर्णिमेला ह्या देवाचें पूजन करितात ते श्रेष्ठपदाला प्राप्त होतात. जे कोणी कार्तिक महिन्यांत प्रभासक्षेत्रामध्यें ब्राह्मणाचें पूजन करितात ते शिवलोकाला प्राप्त होतात. जे कोणी उपवास करून बालब्रह्माचें पूजन करितात त्यांस अश्वमेध यज्ञ केल्याचें पुण्य लागतें. बालब्रह्माला रथावर घालून क्षेत्रप्रदक्षिणा करावी. अशातऱ्हेनें रथयात्रा केल्यानंतर बालब्रह्माची स्तुति करावी. हें आख्यान श्रवण करणारे शिवसायुज्यमुक्तीप्रत प्राप्त होतात.

---

## अध्याय १०८ वा.

### प्रत्यूषेश्वरलिंगमाहात्म्य.

शंकर म्हणतात; पार्वति ! नंतर वसूंनीं स्थापिलेल्या प्रत्यूषेश्वराचें दर्शन घ्यावें. त्याच्या दर्शनानें सप्त जन्मांतील सर्व पातकें नाश पावतात. दक्षानें साठ कन्या धर्माला दिल्या, त्यांपैकीं विश्वा नांवाची जी एक कन्या होती तिला आठ मुलगे झाले. त्यांचीं आप, ध्रुव, सोम, धर, अनल, अनिल, प्रत्यूष, प्रभास, अशीं नांवें होत. ह्यांसच वसु म्हणतात. त्यां आठामध्यें सातवा वसु जो प्रत्यूष त्यानें पुत्रप्राप्तीकरितां प्रभासक्षेत्रीं येऊन शिवाराधना केली. त्यानें ज्या शिवलिंगाची आराधना करून पुत्रप्राप्ती करून घेतली, त्याच लिंगाला प्रत्यूषेश्वर म्हणतात. प्रत्यूषाला देवल नांवाचा शिवकृपेनें मुलगा झाला. जे निपुत्रिक असतील त्यांनीं ह्याचें पूजन करावें, म्हणजे त्यांस पुत्रप्राप्ति होईल.

---

## अध्याय १०९ वा.

### अनिलेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; पार्वति ! नंतर अनिलेश्वराचें दर्शन घ्यावें. ह्याच्या दर्शनानें पाप नाश होते. पूर्वीं सांगितलेल्या आठ वसूंपैकीं पांचवा वसु जो अनिल त्यानें ह्याची स्थापना केली. ह्या लिंगपूजनाच्या प्रभावानें त्या अनिलाला मनोजव नांवाचा एक मुलगा झाला. जो कोणी ह्या अनिलेश्वराचें दर्शन घेतो

तो कधींहि व्याधिग्रस्त, आंधळा, बहिरा, मुका, दरिद्री वगैरे दोषानें युक्त न होतां सर्वांगपूर्ण व सर्वैश्वर्यसंपन्न होतो. जो कोणी ह्या लिंगाचें पुष्पादिकांनीं पूजन करितो तो रूपवान् होतो. ह्याप्रमाणें हें माहात्म्य श्रवण करणारे सर्व पातकापासून मुक्त होतात.

## अध्याय ११० वा.

### प्रभासेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; पार्वति। नंतर प्रभासेश्वराचें दर्शन घ्यावें. आठवा वसु जो प्रभास त्यानें ह्या लिंगाची स्थापना करून पूजन केलें. त्या योगें त्याला विश्वकर्मा नांवाचा मुलगा झाला. जे कोणी ह्या लिंगाचें पूजन करितात त्यांना पुत्रप्राप्ति होते. ह्या लिंगाचें पूजन करून वृषभदान करणाराला सर्व यात्रांचें फल प्राप्त होतें. हें आख्यान श्रवण व पठण करणारेहि पाप मुक्त होऊन पुत्रवान् होतात.

## अध्याय १११ वा.

### पुष्करारण्यमाहात्म्य.

शंकर म्हणतात; पार्वति! नंतर पुष्करारण्याचें पूजन करावें. हें प्रभासेश्वराच्या ईशान्येस साठ धनुष्यें लांब आहे. त्या ठिकाणीं अष्टपुष्कर नांवाचें एक कुंड आहे. त्याच कुंडाजवळ पूर्वी रामचंद्रांनीं रामेश्वराची स्थापना केली होती. अशा ह्या पुष्करारण्याचें माहात्म्य श्रवण केलें असतां ब्रह्महत्यादि सर्व पातकें नाश पावतात. रामेश्वराची स्थापना कशी झाली? असा पार्वतीचा प्रश्न ऐकून शंकर म्हणतात; पार्वति! चोवीसाव्या *महायुगांतील त्रेतायुगांत रामचंद्राचा रावणनाशार्थ अवतार झाला. नंतर कांहीं काल मध्यंतरी गेल्यावर दशरथपुत्र रामचंद्र सीता व लक्ष्मण यांसह वनवासाकरितां अरण्यात गेला. अरण्यांत फिरतां फिरतां तो रामचंद्र प्रभासक्षेत्राला प्राप्त झाला. तो रात्रीं निद्रित झाला असतां दशरथानें स्वप्नांत येऊन रामाला सांगितलें कीं, हें पुष्कर नांवाचें तीर्थ उत्तम आहे, ह्या ठिकाणीं तूं श्राद्ध कर. असें दशरथाचें भाषण ऐकून जागृत झाल्यानंतर रामचंद्रानें श्राद्धाला योग्य अशा ब्राह्मणांस आमंत्रण केलें, नंतर लक्ष्मणांनीं आणलेल्या

* कृतयुग, त्रेतायुग, द्वापरयुग व कलियुग मिळून एक महायुग होतें.

बेलफळ, कवठ, हिंगणबेटाचीं फळें, बोरें, करवंदें, वाळकें, माहाळुंगें, नारळ वगैरे फळांनीं श्राद्धविधि पूर्ण केला. त्या वेळीं रामचंद्रांनीं तेथें रामेश्वर नांवाचें एक लिंग स्थापित केलें. मंगळवारीं किंवा शुक्रवारीं चतुर्थी अगर षष्ठी आली असतां पुष्करारण्यांत श्राद्ध करावें. जे कोणी येथें पितृश्राद्ध करितात त्यांचे पितर बारा वर्षेपर्यंत तृप्त होतात; व त्यास अश्वमेध यज्ञाचें फल प्राप्त होतें. ह्याप्रमाणें तुला रामेश्वरस्थापना व पुष्करारण्यमाहात्म्य सांगितलें आहे.

## अध्याय ११२ वा.

### लक्ष्मणेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; पार्वती ! नंतर लक्ष्मणेश्वराचें दर्शन घेऊन पूजन करावं. हें स्थान रामेश्वराच्या पूर्वेस तीस धनुष्याच्या लांबीवर आहे. हें लक्ष्मणानें स्थापित केलें आहे. ह्या लिंगाची देवादिकांनींहि पूजा केली असल्यामुळें हें सर्व पापांचें क्षालन करणारें आहे. जे कोणी ह्या ठिकाणीं; नृत्य, गायन व वादन इत्यादिकांनीं किंवा होम, जप वगैरेनें ह्या लिंगाचें पूजन करितात ते शिवलोकाला प्राप्त होतात. त्या ठिकाणीं ब्राह्मणांना अन्न, उदक व सोनें अर्पण करावें; व गंगादिकांनीं लक्ष्मणेश्वराचें पूजन करावें. माघ कृष्ण चतुर्दशीला जे येथें स्नान, दान, जप वगैरे करितात तें त्याचें कृत्य अक्षय्य फल देणारें आहे. हें आख्यान श्रवण करणारांच्या सर्व इच्छा पूर्ण होतात.

## अध्याय ११३ वा.

### जानकीश्वरमाहात्म्य.

नंतर रामेश्वराच्या नैर्ऋत्य दिशेस असणाऱ्या जानकीश्वराचें दर्शन घ्यावें. हे जनकाची कन्या जी जानकी अर्थात् रामपत्नी जी सीता तिनें शंकराची आराधना करून हें शिवलिंग स्थापिलें आहे. ह्या लिंगाचें वशिष्ठानें पूजन केलें होतें; म्हणून ह्यास कोणी वशिष्ठेश म्हणतात. ह्याठिकाणीं जानकीश्वराच्या पूजनानें साठ हजार वालखिल्य ऋषि मुक्त झाले. ह्याला कलियुगांत युगलिंग म्हणतात. जो कोणी पुरुष अथवा स्त्री ह्या लिंगाचें पूजन करील तो सर्व पातकापासून मुक्त होईल. माघ महिन्यांतील तृतीयेला जे कोणी पुरुष अगर स्त्री ह्याचें पूजन करील त्यांस अश्वमेध यज्ञाचें फल प्राप्त होईल.

## अध्याय ११४ वा.

### वामनस्वामिमाहात्म्य.

शंकर म्हणतात; पार्वति ! नंतर वामनस्वामीचें दर्शन घ्यावें. ज्या वेळीं विष्णूनें वामनावतार घेऊन बलिराजाला पाताळांत नेलें. त्या वेळीं बलीजवळ वामनानें तीन पावलें भूमि दान मागितली; व दुसरा पाय स्वर्गापर्यंत नेला, तेव्हां वामनाच्या पादाघातानें आकाशगंगा पुष्करक्षेत्रांत खालीं पडली. पुष्कर हें जलाला व आकाशाला नांव आहे. ह्या वामनाच्या पादस्पर्शानें भूमीवर पडलेल्या आकाश–गंगेला विष्णुपदी म्हणतात; व त्या विष्णुपदीच्या कडेला वामनाची मूर्ति स्थापिलेली आहे, त्यालाच वामनस्वामि म्हणतात. जे कोणी पुष्करक्षेत्रांत विष्णुपदीमध्यें स्नान करितात व वामनस्वामीचें पूजन करितात, त्यांस अश्वमेधयज्ञ केल्याचें पुण्य प्राप्त होऊन व त्यांच्या पितरांची अक्षय्य तृप्ति होऊन ते अखंड अशा शिवलोकाला प्राप्त होतात.

## अध्याय ११५ वा.

### पुष्करेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; पार्वति ! नंतर जानकीश्वराच्या दक्षिण दिशेस असणाऱ्या पुष्करेश्वराकडे जावें. हें लिंग ब्रह्मदेवाचा पुत्र जो सनत्कुमार त्यानें स्थापिलें आहे. ह्याचें पूजन सनत्कुमारानें सोन्याच्या पुष्करांनीं म्हणजे कमळांनीं केल्यामुळें ह्यास पुष्करेश्वर असें नांव प्राप्त झालें आहे हें संपूर्ण पातकांचें नाशन करणारें आहे. जे कोणी ह्या पुष्करेश्वराचें गंधादिकांनीं पूजन करितात, त्यांना पुष्करक्षेत्राच्या यात्रेचें फल प्राप्त होतें. ह्याच्या श्रवणानें सर्व सिद्धि प्राप्त होतात.

## अध्याय ११६ वा.

### कुण्डेश्वरीमाहात्म्य.

नंतर कुंडेश्वरीचें दर्शन घ्यावें. हें कुण्डेश्वरी स्थान शंखोदक कुंडाजवळ आहे. पूर्वी शंख नांवाचा एक दैत्य होता. त्या शंखाचें विष्णूनें नाशन केलें व तो शंख घेऊन विष्णु प्रभासाला प्राप्त झाले; नंतर विष्णूनें तेथें शंखाला स्नान

घालून त्या शंखाचा मोठा शब्द केला. तो शंखध्वनि ऐकून तेथें एक देवी प्राप्त झाली; नंतर विष्णूनें त्या देवीची शंखोदककुंडाजवळ स्थापना केली; त्यालाच कुंडेश्वरी म्हणतात; व जेथें विष्णूनें शंखाला स्नान घातलें त्याला शंखोदककुंड म्हणतात. जे कोणी माघतृतीयेला ह्या देवीचें पूजन करितात ते गौरीपदाला प्राप्त होतात. त्या ठिकाणीं दांपत्यपूजन व कञ्चुकदान व फलदान करावें; ब्राह्मणभोजन घालावें; म्हणजे सर्व पातकांचा नाश होऊन सर्वप्रकारच्या इच्छित मनकामना परिपूर्ण होतात.

---

## अध्याय ११७ वा.

### भूतेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; पार्वति! नंतर भूतेश्वराचें दर्शन घ्यावें. हें कुंडेश्वरीच्या ईशान्येस आहे. हें प्रलयकालींहि नाश न पावणारें असें लिंग आहे. त्रेतायुगांत ह्यालाच वीरभद्रेश्वर असें नांव होतें; व ह्यालाच कलियुगांत भूतेश्वर म्हणतात. द्वापारयुगाच्या शेवटीं कोट्यावधी प्राणी ह्या लिंगाच्या प्रभावानें अनेक सिद्धीप्रत प्राप्त झाले; व म्हणूनच ह्यास भूतेश्वर म्हणतात. ह्या भूतेश्वरासंनिध तिल व सुवर्ण ह्यांचें दान करावें, ह्यायोगें पितरांना मुक्ति मिळते. ह्याप्रमाणें हें भूतेश्वराचें माहात्म्य सांगितलें आहे. जे कोणी ह्याचें पठण अगर श्रवण करितात, ते सर्व पातकापासून नाश पावून स्वर्गलोकाला प्राप्त होतात.

---

## अध्याय ११८ वा.

—:o:—

### गोप्यादित्यमाहात्म्य.

शंकर म्हणतात; पार्वति! नंतर गोप्यादित्याचें पूजन करावें, हें भूतेश्वराच्या वायव्येस तीन धनुष्याच्या अंतरावर आहे. पूर्वीं एकदा श्रीकृष्ण छप्पन्न कोटी यादवांना बरोबर घेऊन प्रभासाला प्राप्त झाले. त्या वेळीं सोळा हजार गोपी तेथें आल्या होत्या. एकसष्ट लक्ष श्रीकृष्णाचे पुत्रही तेथें आले होते. त्याचा तेथें बारा वर्षेपर्यंत वास झाला. त्याठिकाणीं प्रत्येकानें एक एक शिवलिंग स्थापून त्याची आराधना करून सिद्धि मिळविली. त्या त्या लिंगांना त्यांचीं त्यांचीं नांवें प्राप्त झालीं. तीं सर्व भूमि यादवांनीं एकएका हातावर स्थापिलेल्या लिंगांनीं भरून गेली. तेथें ज्या सोळा हजार गोपी आल्या होत्या त्यांपैकीं

ज्या सोळा मुख्य गोपी त्यांचीं नांवें अनुक्रमें पुढें सांगितल्याप्रमाणें आहेत. १ लंबिनी, २ चंद्रिका, ३ कांता, ४ क्रूरा, ५ शान्ता ६ महोदया, ७ भीषणी, ८ नंदिनी, ९ अशोका, १० सुपर्णा, ११ विमला, १२ अक्षया, १३ शुभदा, १४ शोभना, १५ पुण्या, १६ हंसाख्या ह्याप्रमाणें त्यांचीं नांवें आहेत, ज्या चंद्राच्या सोळा कला त्याच गोपीरूपानें अवतीर्ण झाल्या होत्या. त्या गोपींनीं कृष्णाच्या आज्ञेनें रवीची (आदित्याची) स्थापना केली; म्हणून त्यास गोप्यादित्य ह्मणतात हें गोप्यादित्य स्थान सौभाग्य देणारें आहे. ह्याप्रमाणें श्रीकृष्णप्रमुख सर्व गोपी व यादव प्रभासक्षेत्रीं राहून व लिंगस्थापना करून परत द्वारकेला गेले. जे कोणी या गोप्यादित्याचें पूजन करितात ते धनधान्यांनीं युक्त होऊन एकवीस कुळांचा उद्धार करितात. माघ शुद्ध सप्तमीला तेलाला स्पर्श करूं नये, निळ्या वर्णाचें वस्त्र नेसूं नये, वादविवाद करूं नये, अशारीतीनें व्रतस्थ राहून या गोप्यादीत्याचें पूजन करावें; म्हणजे सर्व सिद्धि प्राप्त होतात. या गोप्यादित्याच्या दर्शनानेंहि एक लक्ष गाई दान दिल्याचें पुण्य लागतें. हें आख्यान श्रवण करणारास सर्व सुखें प्राप्त होतात.

---

## अध्याय ११९ वा.

### बलातिबलदैत्यघ्नीमाहात्म्य.

शंकर ह्मणतात; पार्वति! नंतर बलातिबलदैत्यघ्नी नांवाच्या देवीचें दर्शन घ्यावें. ती त्याठिकाणीं कोट्यावधि दैत्यांचा नाश करून राहिली आहे. पूर्वी रक्तासुर नांवाचा एक असुर होता. हा महिषासुराचा मुलगा असून हिरण्याक्षासारखा पराक्रमी होता. त्या रक्तसुराचे बल व अतिबल ह्या नांवाचे दोन पुत्र होते. त्यांनीं इंद्रादि देवांना जिंकून त्रैलोक्याचें राज्य करण्यास प्रारंभ केला. हजार अक्षौहिणी सैन्यांना एक एक अधिपति असे त्याचे तेत्तीस सेनापति होते. त्यांचीं नांवें धूम्राक्ष, भीमदंष्ट्र, कालवश्य, महाहनु, ब्रह्मघ्न, यज्ञकोप, क्षीघ्र, पापनिकेतन, विद्युन्माली, बंधूक, शंकुकर्ण, विभावसु, देवांतक, विकर्मा, दुर्भिक्ष, क्रूर, हयग्रीव, अश्वकर्ण, केतुमान्, वृषभ, द्विज, शरभ, शलभ, व्याघ्र, निकुंभ, माणिक, बक, शूर्पक, विक्षर, माली, काल, दण्डककुराल ह्याप्रमाणें बलातिबल दैत्यांच्या सेनाधिपतींचीं नांवें होतीं. दैत्यांनीं इंद्राचें सर्व राज्य हरण केलें; असें पाहून सर्व देव हिमालयपर्वतावर येऊन देवीची स्तुति करूं लागले. देवांची स्तुति ऐकून देवी प्रसन्न झाली; व तत्काळ तेथें स्वस्वरूपानें प्रगट झाली; तेव्हां

देव त्या देवीला म्हणतात कीं, बल व अतिबल ह्या दोन असुरांनीं आमचें स्वर्गराज्य जिंकून आम्हांस स्थान–भ्रष्ट केलें आहे, तरी आपण त्या असुरांचा नाश करून आम्हांस आमचें राज्य मिळवून द्यावें; नंतर ती देवी आपल्या मातृगणासह प्रभासक्षेत्रीं येऊन बलातिबल ह्या दोन असुरांचा सहज नाश करिती झाली; नंतर देवांना मोठा आनंद झाला व ते पुनः देवीची स्तुति करूं लागले; नंतर ती देवी देवांच्या आज्ञेवरून बलातिबलदैत्यघ्नी या नांवानें प्रभासक्षेत्रीं राहती झाली. बलातिबलदैत्यघ्नीच्या आसपास ज्या चौसष्ट योगीनी आहेत. त्यांचीं नांवें पुढीलप्रमाणें आहेत. महालक्ष्मी, क्षेमकरी, शिवदूती, महाभद्रा, भ्रामरी, चंद्रमण्डला, रेवती, हरसिद्धि, दुर्गा, विषमलोचना, सहजा, कुलजा, कुब्जा, मायावी, शांभवी, क्रिया, आद्या, सर्वगता, शुद्धा, भावगम्या, मनोतिगा, विद्या, अविद्या, महामाया, सुषुम्ना, सर्वमंगला, ॐकारात्मा, महादेवी, वेदार्थजननी, शिवा, पुराणा, आन्वीक्षिकि, दीक्षा, चामुण्डा, शंकरप्रिया, ब्राह्मी, शांतिकरी, गौरी, ब्रह्मण्या, ब्राह्मणप्रिया, दीक्षा, भद्रा, भगवती, कृष्णा, ग्रहनक्षत्रमालिनी, त्रिपुरा, त्वरिता, नित्या, सांख्या, कुंडलिनी, ध्रुवा, कल्याणी, शोभना, निष्कला, परमा, कला, योगिनी, योगसद्भावा योगगम्या, गुहाशया, कात्यायनी, उमा, शर्वा, अपर्णा, नित्या ह्याप्रमाणें हीं चौसष्ट योगिनींचीं नांवें आहेत; अष्टमी, नवमी व चतुर्दशी ह्या तीन दिवशीं देवीस्तोत्राचें पठण करावें; म्हणजे त्यानें सर्व सिद्धि प्राप्त होतात. ह्याप्रमाणें तुला बलातिबल दैत्यघ्नीचें माहात्म्य सांगितलें आहे.

---

## अध्याय १२० वा.

---

### गोपीश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; हे पार्वति ! नंतर गोपीश्वराचें दर्शन घ्यावें. हें स्थान बलातिबलदैत्यघ्नीच्या उत्तरेस आहे. ह्या लिंगाची गोपींनीं स्थापना केली होती. जे कोणी ह्या गोपीश्वराचें पूजन करितात त्यांस पुत्रफलप्राप्ति होते. चैत्र शुक्ल तृतीयेच्या दिवशीं जो कोणी मनुष्य पूजन करतो, त्याच्या सर्व इच्छा पूर्ण होतात. ह्याप्रमाणें प्रभासक्षेत्रांत असणाऱ्या गोपीश्वराचें माहात्म्य तुम्हांला सांगितलें आहे.

---

# अध्याय १२१ वा.

## रामेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात पार्वति ! नंतर रामेश्वराचें दर्शन घ्यावें. हें परशुरामानें स्थापिलें आहे. हें गोपीश्वराच्या वायव्येस तीस धनुष्य लांब आहे. ज्या वेळीं परशुरामानें मातृवध केला, त्या वेळीं तद्दोषपरिहारार्थ त्यानें प्रभासक्षेत्रीं येऊन ह्या लिंगाची स्थापना करून पूजा केली. तेथेंच पंचनद्नांवाचें एक तीर्थ निर्माण केलें जो कोणी मनुष्य ज्येष्ठ कृष्ण चतुर्दशीला ह्या पंचनद-तीर्थांत स्नान करून परशुरामस्थापित रामेश्वराचें पूजन करितो व जागरण करितो त्याला अश्वमेधयज्ञाचें फल मिळतें व तो अंतीं शिवलोकीं जातो.

# अध्याय १२२ वा.

## चित्रांगदेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; पार्वति ! नंतर चित्रांगदेश्वराचें दर्शन घ्यावें. हें रामेश्वराच्या नैर्ऋत्येस आहे. चित्रांगद नांवाच्या गंधर्वराजानें प्रभासक्षेत्र हें पवित्र क्षेत्र आहे, असें समजून त्या ठिकाणीं लिंगस्थापना केली व त्यानें घोर तपश्चर्या करून शंकराला संतुष्ट केले. जे कोणी पुरुष मोठ्या भक्तियुक्त अंतःकरणानें ह्या चित्रांगदेश्वराचें पूजन करितात ते गंधर्वलोकाला प्राप्त होऊन गंधर्वांसह आनंदानें राहतात. शुक्लपक्षांतील त्रयोदशीला स्नान करून जे चित्रांगदेश्वराला स्नान घालतात; व त्याची पूजा करितात त्यांच्या सर्व इच्छा पूर्ण होतात.

# अध्याय १२३ वा.

## रावणेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; पार्वति ! नंतर रावणानें स्थापिलेल्या रावणेश्वराचें दर्शन घ्यावें. हें चित्रांगदेश्वराच्या दक्षिणेस आहे. पुलस्त्यऋषीला एक रावण नांवाचा मुलगा झाला. तो रावण त्रैलोक्य जिंकण्याच्या इच्छेनें पुष्पक विमानांत बसून हिंडत असे. नित्यनियमाप्रमाणें तो विमानांत बसून आकाशमार्गानें गमन करीत

असतां एकाएकी त्याचें विमान स्तब्ध झालें. विमानाची गति कुंठित झाली, असें पाहून रावणाला फार आश्चर्य वाटलें; व त्यानें प्रहस्त नांवाच्या आपल्या दूतास पृथ्वीवर विमानगति कुंठित होण्याचें कारण शोधण्याकरितां पाठविलें. नंतर तो प्रहस्तदूत रावणाच्या आज्ञेप्रमाणें पृथ्वीवर येऊन पाहतों तों पृथ्वीवर सोमेश्वराचें एक स्थान आहे, व ते पुष्कळ ऋषि व देव सोमेश्वराचें पूजन करून त्याची स्तुति करीत आहेत, असे त्यास दिसलें. नंतर प्रहस्त तसाच परत रावणाजवळ जाऊन सर्व कांहीं सांगूं लागला. प्रहस्त म्हणतो; रावणा ! येथें खालीं एक शिवक्षेत्र आहे, त्याचें नांव प्रभास असें आहे. त्याठिकाणीं शंकर स्वतः सोमेश्वर नांवानें राहिले आहेत; व त्या सोमेश्वराचें वालखिल्यादि पुष्कळ ऋषि पूजन करीत आहेत. त्या सोमेश्वराच्या प्रभावानें तुमचें विमान कुंठित झालें असावें; असें मला वाटतें. असें प्रहस्ताचें भाषण श्रवण करून रावण तत्काळ विमानासह पृथ्वीवर सोमेश्वराचें दर्शन घेण्याकरितां आला; व त्यानें सोमेश्वराचें पूजन केलें. सर्व नगरांतील लोक रावणाला पाहून भीतीनें पळूं लागले. तेव्हां शंकर आकाशवाणीनें राक्षसाला म्हणतात कीं, हे रावणा ! येथें पुष्कळ लोक माझ्या दर्शनाकरितां आले होते, ते सर्व तुझ्या भीतीनें पळून गेले, तरी तूं येथें फार वेळ राहूं नये. अशी आकाशवाणी ऐकतांच रावण तेथून दूर एका गुहेंत गेला; व तेथें त्यानें एक शिवलिंग स्थापिलें; व त्याचें नांव रावणेश्वर असें ठेविलें. जे कोणी त्या रावणेश्वराचें पूजन करितात त्यांस विजय प्राप्त होतो; व ते सिद्धीला प्राप्त होतात.

## अध्याय १२४ वा.

### सौभाग्येश्वरीमाहात्म्य.

शंकर म्हणतात; पार्वति ! नंतर रावणेश्वराच्या पश्चिमेस पांच धनुष्यें लांबीवर सौभाग्येश्वरी नांवाच्या देवीचें स्थान आहे. ह्याठिकाणी पूर्वीं अरुंधतीनें तप करून अखंड सौभाग्य मिळविलें होतें. जी कोणी स्त्री ह्या सौभाग्येश्वरीचें माघ शुद्ध तृतीयेच्या दिवशीं पूजन करील तीस सौभाग्यादि सिद्धि प्राप्त होतील.

## अध्याय १२५ वा.

—:0:—

### पौलोमीश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; पार्वति ! नंतर पौलोमीनें स्थापिलेल्या पौलोमीश्वराचें दर्शन घ्यावें. ज्यावेळीं तारकासुरानें इंद्रादिदेवांना जिंकून त्यांचें राज्य हरण केलें

त्या वेळीं इंद्र देवांसह अत्यंत शोक करूं लागला. त्याकाळीं पौलोमी ( इंद्राणी ) जी इंद्रपत्नी तिनें इंद्राला पुन: स्वर्गराज्य मिळावें म्हणून प्रभासक्षेत्रांत येऊन शिवलिंगस्थापना केली; आणि शिवाराधना केली. ती तपश्चर्यारूप आराधना पाहून शंकर प्रसन्न झाले; व त्यानें पौलोमीला इष्ट वर दिला; व सांगितलें कीं, माझा पुत्र जो कार्तिकस्वामी तो तारकासुराचा नाश करून तुम्हाला राज्य मिळवून देईल. ह्या लिंगाच्या पूजनानें शिवलोकप्राप्ति व विजयप्राप्ति होते.

## अध्याय १२६ वा.

### शांडिल्येश्वरमाहात्म्य.

नंतर शांडिल्य नांवाच्या ऋषीनें स्थापिलेल्या शांडिल्येश्वराचें दर्शन घ्यावें. शांडिल्य नांवाचा एक ब्रह्मर्षि होता. तो ब्रह्मदेवाचा सारथी होतात. तो प्रभासक्षेत्रीं येऊन त्यानें सोमेश्वराच्या उत्तरेस एक शिवलिंग स्थापिलें; व तो देवांचीं शंभर वर्षे पुरीं होईपर्यंत त्या लिंगाची आराधना करूं लागला; व त्या आराधनेनें त्याच्या सर्व इच्छा पूर्ण झाल्या. त्या शाण्डिल्येश्वराचें दर्शन घेणारा मनुष्य तत्काळ पापरहित होतो. लहानपणीं, तारुण्यावस्थेंत किंवा वृद्धापकाळीं समजून अगर न समजून जें कांहीं पाप झालें असेल तें सर्व ह्याच्या दर्शनानें नाश पावतें.

## अध्याय १२७ वा.

### क्षेमेश्वरमाहात्म्य.

नंतर क्षेमेश्वराचें दर्शन घ्यावें. हें लिंग क्षेममूर्ति राजानें स्थापिलें आहे. जे कोणी ह्या लिंगाचें दर्शन घेतात त्याचें अत्यंत कल्याण होतें; व प्रत्येक जन्मामध्यें त्याच्या सर्व इच्छा पूर्ण होतात. ह्या लिंगाच्या दर्शनानें मनुष्याला शंभर गोप्रदानें दिल्याचें पुण्य लागतें. ज्याला आपणाला क्षेत्रफळ मिळावें, असें वाटत असेल त्यांनीं ह्याचें पूजन करावें. हें आख्यान सर्वसिद्धि व मुक्ति देणारें आहे.

# अध्याय १२८ वा.

## सागरादित्यमाहात्म्य.

शंकर म्हणतात; पार्वति! नंतर सागरादित्याचें दर्शन घ्यावें. हें भैरवाच्या पश्चिमेस व कामेशाच्या उत्तरेस आहे. हें सर्व रोग व दारिद्र्य ह्यांचें नाशन करणारें आहे. हें सागरानें स्वतः शिवाराधना करून प्रभासक्षेत्रांत स्थापन केलें आहे. जे ह्या सागरादित्याचें दर्शन घेतात ते मुर्ख, अंध, दरिद्रि व दुःखित जरी असले तरी सर्व पीडांपासून दूर होतात. माघ महिन्यांतील शुक्लपक्षांतील षष्ठीच्या दिवशीं उपोषण करून सागरादित्याजवळ रात्रीं शयन करावें; व सप्तमीला जागृत होऊन सागरादित्याचें पूजन करावें; आणि यथाशक्ति निरभिमानपणानें ब्राह्मणांस भोजन घालावें; म्हणजे मनुष्य दुर्लभ अशा सूर्यगतीला प्राप्त होतो; व अशा उपासकास सूर्य अश्वमेधयज्ञाचें फल देतो. सूर्य हा त्रैलोक्यांतील मुख्य दैवत आहे. वसन्तऋतूंत सूर्य पिंगटवर्णाचा असतो, ग्रीष्मऋतूंत सोन्यासारख्या पीतवर्णाचा असतो, वर्षाऋतूंत श्वेतवर्णाचा शरदृतूंत तीक्ष्णवर्णाचा सूर्य असतो, हेमंतऋतूंत तांबूस, व शिशिरऋतूंत तांबडा ह्याप्रमाणें सूर्याच्या वर्णाचें ध्यान करून सूर्यसहस्रनामाचा पाठ करावा;

# अध्याय १२९ वा.

## अक्षमालेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; पार्वति! नंतर अक्षमालेश्वराचें दर्शन घ्यावें. ह्याला उग्रसेनेश्वर असें दुसरें नांव आहे पूर्वीं एकदां अक्षमाला नांवाची एक अत्यंज (शूद्र) कुलांत उत्पन्न झालेली पतिव्रता स्त्री होती. एकेकाळीं दुष्काळ पडला असतां पुष्कळ ऋषि भुकेनें व्याकुळ होऊन तिच्या घरीं आले; व त्यांनीं भिक्षेची याचना केली. त्या वेळीं ती ऋषींनां म्हणते कीं मी अन्त्यज म्हणजे शूद्र आहे. माझ्या घरचें अन्न तुम्हांला चालणार नाहीं. जो कोणी शूद्रान्नाचें सेवन करितो त्याला ग्रामवराहाचा जन्म प्राप्त होतो. ब्राह्मणाच्या घरचें अन्न अमृताप्रमाणें आहे. क्षत्रियाच्या घरचें अन्न दुधासारखें आहे. वैश्याचें घरचें अन्न अन्नवत् आहे; व शूद्रान्न हें रक्तासारखें आहे. शूद्राच्या घरचें अन्न, शूद्राचा स्पर्श शूद्राबरोबर व्यवहार वगैरे शूद्रासंबंधिक सर्व तेजस्वी मनुष्याची सुद्धा हानी करितात. जो अग्निहोत्री शूद्रान्न सेवन करितो त्याचें तीन अग्नि ( दक्षिणाग्नि,

गार्हपत्याग्नि व आहवनीयाग्नि) आत्मा व वेद हें सर्व नाश पावतें. शूद्रान्न खाऊन जर ब्राह्मण मृत होईल तर त्या महिन्याच्या आंत तो पिशाचयोनींत जन्माला येईल. जो ब्राह्मण शूद्रान्न खाबून अग्निहोत्र आचरितो तो शूद्रजन्माला प्राप्त होतो. महिनाभर शूद्रान्न खाणारा मनुष्य ह्या जन्मीं व दुसऱ्या जन्मीं शूद्रच होतो. अशाप्रमाणें अक्षमालेचें भाषण ऐकून वशिष्ठाला आनंद झाला; व त्यानें अक्षमालेला पवित्र करून तिचें नांव अरुंधती असें ठेविलें. नंतर ती अरुंधती वशिष्ठादिऋषिसह फिरत फिरत प्रभास क्षेत्रीं आली; व तिनें तेथें असलेल्या उग्रसेनेश्वराचें पूजन केलें; व ह्मणून त्याला अक्षमालेश्वर हें नांव प्राप्त झालें. ह्या अक्षमालेश्वराचें पूजन करणारे सर्व पापापासून मुक्त होतात.

---

## अध्याय १३० वा.

### पाशुपतेश्वरमाहात्म्य.

नंतर पाशुपतेश्वराचें दर्शन घ्यावें. हें सर्व पापाचें क्षालन करणारें आहे. ह्या युगांत ह्यालाच संतोषेश्वर हें दुसरें नांव प्राप्त झालें आहे. त्या ठिकाणीं त्या लिंगाचें पूजन केलें असतां शंकर संतुष्ट होतो. वामदेव, सावर्णि, अघोर व कपिल हे चार ऋषि पाशुपतेश्वराचें पूजन करून सिद्धि मिळविते झाले. ह्या पाशुपतेश्वराजवळ श्रीमुखनांवाचें एक वन आहे. ह्या वनांत एक लक्ष्मीचें स्थान आहे; व त्या ठिकाणीं पाशुपत नांवाचे ऋषि राहतात; व ते ऋषि ह्या शिवलिंग पूजनाच्या प्रभावानें शिवलोकाला प्राप्त झाले. जे कोणी माघ महिन्यांत ह्याचें पूजन करितात त्यांस सर्वप्रकारचे यज्ञ केल्याचें फळ मिळतें. "**अग्निरिति भस्म वायुरिति भस्म जलमिति भस्म स्थलमिति भस्म सर्वं ह वा इदं भस्म**" ह्या मंत्रानें भस्म अंगाला लावून नंतर पाशुपतेश्वराचें पूजन करणारा मनुष्य शिवस्वरूप होतो. हें आख्यान सर्वपापाची निवृत्ति करितें.

---

## अध्याय १३१ वा.

### ध्रुवेश्वरमाहात्म्य.

आतां ध्रुवेश्वरमाहात्म्य सांगतों. पूर्वी उत्तानपाद नांवाचा एक राजा होता. त्याला ध्रुव नांवाचा एक पुत्र झाला. तो ध्रुव एके दिवशीं प्रभासक्षेत्रांत येऊन

माझी आराधना करूं लागला; नंतर त्यानें माझें स्तवन केलें. तें स्तवन ऐकून मी संतुष्ट झालों व इष्ट वर मागून घे असें बोललों; नंतर ध्रुव म्हणतो; जें मी तुझें लिंग स्थापिलें आहे, तेथें तुझें स्वस्वरूपानें वास्तव्य असलें पाहिजे; एवढाच मला वर द्या. नंतर त्याच्या सांगण्याप्रमाणें मी त्या लिंगामध्यें जाऊन राहिलों; व ध्रुवाला ध्रुवपदाला घेऊन गेलों. जे कोणी श्रावणांतील अमावास्येच्या दिवशीं ध्रुवेश्वराचें पूजन करितात त्यांस अश्वमेधयज्ञाचें फळ मिळतें, जो निपुत्रिक असेल त्यास त्याच्या पूजनानें पुत्रप्राप्ति होते, जो गरीब असेल तो श्रीमंत होईल; व शेवटीं तो शिवलोकीं जाईल.

## अध्याय १३२ वा.

### सिद्धलक्ष्मीमाहात्म्य.

नंतर वैष्णवी शक्ति जी सिद्धलक्ष्मी तिचें दर्शन घ्यावें. हें पीठ महालक्ष्मी नांवानें प्रसिद्ध आहे. ह्याला सिद्धलक्ष्मी ह्मणण्याचें कारण ह्या महालक्ष्मीच्या पूजनानें सर्व सिद्धि प्राप्त होतात. पंचमीच्या दिवशीं जे कोणी गंधादि उपचारांनीं ह्याचें पूजन करितात त्यांना धनधान्यादिकांची प्राप्ति होतें; व ते ऐहिक सुख भोगून अंतीं शिवलोकीं गमन करितात. हें आख्यान सर्व पातकें नष्ट करितें.

## अध्याय १३३ वा.

### महाकालीमाहात्म्य.

ह्या सिद्धलक्ष्मीजवळच एक महाकाली नांवाचें एक स्थान आहे. तें सर्व दुःखें नाहींसें करणारें असून सर्व शत्रूंचाहि नाश करणारें आहे. कृष्णपक्षांतील अष्टमीच्या दिवशीं ह्या महाकालीचें अपरात्रीं पूजन करावें. ह्याप्रमाणें एक वर्षपर्यंत पूजा व व्रताचरण करावें व तोंपर्यंत मूग, उडीद, वाटाणे, चवळ्या, मसुरा, गहू, हरभऱ्याची डाळ वगैरे अन्नाचें भक्षण करूं नये. ह्याप्रमाणें व्रताचरण करणाऱ्याच्या घरीं धन, धान्य वगैरेची समृद्धि होईल; त्यास सात जन्मपर्यंत दुःख, रोग व दारिद्र्यादिकाची बाधा होणार नाहीं. आश्विन शुक्ल नवमीच्या दिवशीं ह्या महाकालीच्या समीप रात्रभर गीत, नृत्य, वादन, पुराण, कथा वगैरेच्या योगें जागरण करावें, व पूजा, बली वगैरेनें आराधना करून सिद्धि मिळवावी.

## अध्याय १३४ वा.

### पुष्करावर्तकानदीमाहात्म्य.

नंतर पुष्करावर्तकनदीचें दर्शन घेऊन तेथें स्नानदानादि शुभ कृत्य करावें. पूर्वी एकदां सोमयाग सुरू असतांना ब्रह्मदेव देवांसह प्रभासक्षेत्रीं येऊन राहिले होते. चंद्रानें सोमनाथाची प्रभासक्षेत्रीं स्थापना करण्याबद्दल ब्रह्मदेवास सुचविलें असतां ब्रह्मदेव योग्य मुहूर्त पाहून पुष्करांचें चिंतन करूं लागला. चिंतन करितांच तीं पुष्करें नदीच्या कांठीं येऊन तयार झालीं. नंतर ब्रह्मदेवानें त्या पुष्करांचें पुष्करावर्तका असें नांव दिलें; व ह्मटलें कीं, ही नदी ह्या नांवानें त्रैलोक्यांत प्रसिद्ध होईल. नंतर तेथेंच ब्रह्मदेवांनीं सोमनाथाची स्थापना केली. जे कोणी ह्या पुष्करावर्तकानदींत स्नान करून सोमनाथाचें पूजन करितात त्यांचे जन्ममरणरूप संसार नाश पावतात; व ते अखंड मोक्षसुखाचा अनुभव घेतात. श्रावण शुक्ल तृतीयेच्या दिवशीं ह्याठिकाणीं पितृश्राद्ध करणारे एकवीस कुळांचा उद्धार करितात.

---

## अध्याय १३५ वा.

### शीतलागौरीमाहात्म्य.

शंकर म्हणतात; पार्वति ! नंतर शीतलेचें पूजन करावें, ह्यायोगें बालांची शांति होते; व खरूजसारखे पिटिकाप्रमुख उपद्रव होत नाहींत. कांहीं प्रमाणांत मसुरा घेऊन त्या कुटाव्यात व त्या देवीला अर्पण कराव्यात; व म्हणावें कीं, हे देवि ! ह्या मसुराच्या योगें संतुष्ट होऊन तूं आमचीं बालकें निरोगी व दीर्घायु कर. ही देवी पुटकुळ्या, शोथ व वातविकार यांचें नाशन करणारी आहे. ह्या शीतलागौरीजवळ श्राद्धविधि करून ब्राह्मणांना भोजन घालावें. कापूर, फुलें; कस्तुरी, चंदन, सुगंधीपदार्थ, नैवेद्य, तूप, दूध वगैरे पदार्थांनीं देवीची पूजा करावी. शुक्लपक्षांतील नवमीच्या दिवशीं एक बेलांच्या पानांची माळ तयार करावी; व देवीला भक्तियुक्त अंतःकरणानें अर्पण करावी; म्हणजे देवीच्या कृपेनें सर्व सिद्धि प्राप्त होतात.

---

# अध्याय १३६ वा.

## लोमशेश्वरमाहात्म्य.

नंतर लोमशेश्वराचें दर्शन घ्यावें! हें लोमशनांवाच्या एका महर्षीनें स्थापिलें आहे. हें इतकें अक्षय्य आहे कीं, ज्या वेळीं इंद्रादिदेवांचा नाश होईल; व जेव्हां प्रलय होईल, तेव्हांच त्याचा नाश होईल. या लोमशाला लोमश नांव प्राप्त होण्याचें कारण असें आहे कीं, एक एक इंद्राच्या आयुष्याबरोबर एक एक लोम (अंगावरील केंस) गळून पडावयाचा, अशातऱ्हेनें जितकें लोमशाच्या अंगावर लोम आहेत तितके इंद्र नष्ट झाले म्हणजे ह्याच्या अंगावरील सर्व लोम पडून जातील, तेव्हांच ह्याचा नाश होईल. तात्पर्य ह्याचें आयुष्य इतकें फार आहे कीं,ह्याच्या अंगावरच्या केंसा इतके इंद्र होईपर्यंत याच्या शरीराला भंग नाहीं. एवढें जरी आहे, तथापि त्याचाहि तितका काळ निघून गेल्यावर नाश हा ठरलेलाच आहे, असो. एका लोमशाच्या आयुष्यांत साहा ब्रह्मदेव होतात. जे कोणी ह्या लोमशेश्वराचें पूजन करितील ते दीर्घायु होतील.

# अध्याय १३७ वा.

## कंकालभैरवक्षेत्रपालमाहात्म्य.

शंकर ह्मणतात; पार्वति! नंतर त्याठिकाणी कंकालभैरवक्षेत्रपालाचें पूजन करावें. हें भैरवानें स्थापिलें आहे. श्रावण शुक्ल पंचमी किंवा अष्टमी ह्या दिवशीं अगर आश्विन शुक्ल पंचमी किंवा अष्टमी ह्या दिवशीं जे कोणी मोठ्या भक्तीनें बलिपुष्पादिकांनीं ह्याची पूजा करितात त्यांच्या पुत्रपौत्रादिकांचें रक्षण होतें.

# अध्याय १३८ वा.

## तृणबिंद्वीश्वरमाहात्म्य.

नंतर कंकालभैरवक्षेत्रपालाच्या पश्चिमेस असणाऱ्या तृणबिंद्वीश्वराचें दर्शन घ्यावें. हें तृणबिंदु नांवाच्या एका महर्षीनें दीर्घ तपश्चर्या करून स्थापिलें आहे. तो प्रत्येक महिन्या महिन्याला एक गवताची काडी घेऊन ती उदकांत बुडवून त्यांतील एक उदकबिंदु (थेंब) प्राशन करावयाचा व तपश्चर्या करावयाची अशा नियमानें वागत होता. अशातऱ्हेनें घोर तप करून शेवटीं त्यास सिद्धी मिळाली.

# अध्याय १३९ वा.

## चित्रादित्यमाहात्म्य.

शंकर म्हणतात; पार्वति ! एक कायस्थ जातींत उत्पन्न झालेला मित्र नांवाचा गृहस्थ होता. तो फार दयाळू व उदार होता. त्याला दोन आपत्यें झालीं. एक चित्र नांवाचा मुलगा व चित्रा नांवाची एक कन्या. अशीं तीं दोन अपत्यें उत्पन्न होताच मित्राचा अंत झाला. नंतर मित्राची पत्नी पतीबरोबर सहगमन करती झाली. नंतर तीं दोन अपत्यें प्रभासक्षेत्रीं येऊन सूर्याची आराधना करूं लागलीं. ह्याप्रमाणें आराधना करून नंतर तीं उभयतां सूर्याची स्तुति करीत असत. ह्याप्रमाणें स्तुति ऐकून सूर्य संतुष्ट झाला; व त्या दोघांनाहि त्यानें ज्ञानी केलें. सूर्याच्या प्रसादानें चित्र व चित्रा उभयतां सर्वज्ञ झालीं. त्यांचें ज्ञान पाहून यमधर्मानें चित्राला आपल्या कचेरींत लेखक ( कारकून ) या नात्यानें नेमिलें. तो चित्रगुप्तनांवानें प्रसिद्ध झाला; व जेथें सूर्य म्हणजे आदित्य प्रसन्न झाला त्या स्थानाला चित्रादित्य असें नांव प्राप्त झालें. जे कोणी सप्तमीच्या दिवशीं चित्रादित्याचें पूजन करितात त्याचें सात जन्माचें दारिद्र्य नाश पावते. तेथें अश्वदान केलें असतां यात्रांचें फल मिळतें.

# अध्याय १४० वा.

## चित्रपथानदीमाहात्म्य.

नंतर चित्रपथानदीचें दर्शन घ्यावें. चित्रादित्याच्या मध्यें व ब्रह्मकुंडासमीप एक नदी आहे, जेथें चित्राला यमदूतांनीं यमाकडे नेलें. चित्र नांवाचा आपला भाऊ नाहींसा झाला, असें पाहून त्या चित्रा नामक भगिनीला फारच वाईट वाटलें; व ती शोक करूं लागली व ती नदीरूपानें तेथें वाहूं लागली. ती नदी चित्र नांवाच्या बंधूचा शोध करीत करीत व वहात वहात पुढें समुद्राला जाऊन मिळाली आहे. पुढें त्या नदीचें चित्रपथा असें देवांनीं नांव ठेविलें. ह्या चित्रपथा नदीमध्यें स्नान करून जे चित्रादित्याचें पूजन करितात ते सूर्यलोकाला प्राप्त होतात. ही नदी कलियुगामध्यें गुप्त झाली होती; परंतु सांप्रत ती पावसाळ्यांत लोकांना दिसते. ह्या नदीचें दर्शन फारच दुर्लभ आहे. स्वर्गांत राहणारे पितर व देवसुद्धां ह्या नदीच्या दर्शनानें आनंदित होऊन गायनादि करितात. जो कोणी ह्या ठिकाणीं पितृश्राद्ध करील, त्याचे पितर एक कल्पपर्यंत

तृप्त राहतील. ह्याकरितां पितृ–तृप्ति व्हावी म्हणून प्रत्येकानें ह्या चित्रपथा नदीचें दर्शन घेऊन श्राद्ध करावें; व पितरांना तृप्त करावें. ह्याप्रमाणें प्रभासांत चित्रपथानदीची स्थापना कशी झाली व तिचें किती माहात्म्य आहे, हें सांगितलें.

## अध्याय १४१ वा.

### कपर्दिचिंतामणिमाहात्म्य.

नंतर कपर्दिचिंतामणीचें दर्शन घ्यावें. ज्याप्रमाणें चिंतामणि हा चिंतिलेलें सर्व कांहीं देत असतो त्याचप्रमाणें या कपर्दिचिन्तामणीचें पूजन केलें असतां चिंतिलेलें सर्व कांहीं मिळतें. मंगळवारीं संकष्टीचतुर्थी आली असतां त्याचें पूजन करावें; व ह्यास स्नान घालावें. नंतर मोदकांचा नैवेद्य दाखवून पूजेची सांगता करावी. याप्रमाणें या कपर्दिचिंतामणीचें पूजन करावें; म्हणजे पूजा करणाऱ्याच्या सर्व इच्छा पूर्ण होतात.

## अध्याय १४२ वा.

### चित्रेश्वरमाहात्म्य.

नंतर चित्रेश्वराचें दर्शन घ्यावें. तें कपर्दिचिंतामणीच्या आग्नेयदिशा व दक्षिणदिशा ह्याच्यामध्यें आहे. या लिंगाचा असा मोठा प्रभाव आहे कीं, तें सर्व पातकांचें एकदम नाशन करितें. त्याठिकाणीं चित्रेश्वराची पूजा केली असतां नरकांत जाण्याचें भय उरत नाहीं. त्या मनुष्याच्या पदरीं जें कांहीं पाप असेल तें सर्व चित्रेश्वर समूळ नष्ट करितो. याकरितां निष्पाप होऊन आत्यंतिक सुख प्राप्त करून घेण्याची इच्छा करणाऱ्या पुरुषानें या चित्रेश्वराचें अवश्य दर्शन घेऊन पूजन करावें. मग तो कितीहि जरी पापी असला तरी नरकाकडे कधीं पाहणारही नाहीं, मग जाणेंतर लांबच.

## अध्याय १४३ वा.

### विचित्रेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; पार्वति ! नंतर विचित्रेश्वराचें दर्शन घ्यावें. हें चित्रेश्वराच्या पूर्व व आग्नेय ह्या दोन दिशांच्या मध्यभागीं आहे. तें दहा धनुष्य लांब

आहे. ह्या विचित्रेश्वराच्या पूजनानें सर्व पापें नाश पावतात. विचित्र नांवाचा एक यमाचा लेखक आहे, त्यानें प्रभासक्षेत्रीं मोठी तपश्चर्या करून ह्या लिंगाची स्थापना केली. अशा या लिंगाचें दर्शन घेऊन त्याचें यथाविधीनें जे पूजन करितात ते पापमुक्त होऊन व दुःखरहित होऊन ह्या लोकात अनेक प्रकारचीं सुखें उपभोगितात व अंतकालीं शिवविमांनत बसून शिवलोकीं जातात.

## अध्याय १४४ वा.

### पुष्करकुण्डमाहात्म्य.

शंकर म्हणतात; पार्वति ! नंतर विचित्रेश्वराच्या पूर्वेच्या व ईशान्यदिशेच्या मध्यभागीं असणाऱ्या पुष्करकुण्डांत स्नान करावें. ह्या पुष्करकुण्डाची पूर्वी ब्रह्मदेवानें मध्याह्नकाळीं उपासना केली होती. ह्या पुष्करकुण्डांत पौर्णिमेच्या दिवशीं शुद्धांतःकरणानें जे कोणी स्नान करितात व सुवर्णादि दानें देतात त्यांचीं सर्व पातकें एकसमयावच्छेदेकरून नाश पावतात. ह्याप्रमाणें तुम्हांला हें थोडक्यामध्यें पुष्करकुंडाचें माहात्म्य सांगितलें आहे. हें माहात्म्य जे कोणी श्रवण करितात किंवा पठण करितात त्यांचीं पापें नष्ट होऊन, इच्छा पूर्ण होतात.

## अध्याय १४५ वा.

### गजकुंभोदरमाहात्म्य.

त्याचठिकाणीं एक गजकुंभोदर नांवाचें गणपतीचें स्थान आहे. त्याच्या पूजनानें सर्वसिद्धि प्राप्त होतात. जे कोणी त्या कुंडांत स्नान करून चतुर्थीच्या दिवशीं पवित्रांतःकरणानें ह्या गजकुंभोदराचें पूजन करितात त्यांच्यावर गणपति संतुष्ट होऊन तो सर्वांच्या इच्छा पूर्ण करितो; व त्यांच्यावर प्रसन्न होतो. हें माहात्म्यहि सर्व कार्यें निर्विघ्नपणें सफल करणारें व पूर्ण करणारें आहे.

# अध्याय १४६ वा.

## यमेश्वरमाहात्म्य.

नंतर यमधर्मानें स्थापिलेल्या यमेश्वराचें दर्शन घ्यावें. हें गजकुंभोदराच्या उत्तरेस आहे. ज्या वेळीं सूर्यपत्नी जी छाया, तिनें यमधर्माला शाप दिला कीं, तूं लंगडा होशील, त्या वेळीं लंगडा झालेल्या यमधर्माला फार दुःख झालें. नंतर यमधर्म प्रभासक्षेत्रांत येऊन व शिवस्थापना करून तेथें त्यानें भयंकर तपश्चर्या केली. नंतर शिव संतुष्ट झाला; व यमधर्माला वर देऊन त्याच्या सांगण्यावरून यमेश्वर नांवानें तेथें राहूं लागला. नंतर यमधर्माला पाय आले; व तो आनंदानें स्वर्लोकाला निघून गेला. यमेश्वराचें दर्शन घेणाऱ्याला यमाचें भय उरत नाहीं. भाऊबीजेच्यादिवशीं पुष्करिणींत स्नान करून यमेश्वराचें पूजन करावें; व तिलपात्रदान करावें, म्हणजे मनुष्य सर्व पातकापासून मुक्त होतो.

---

# अध्याय १४७ वा.

## ब्रह्मकुण्डमाहात्म्य.

शंकर ह्मणतात; पार्वति! नंतर ब्रह्मकुंडांत जाऊन स्नान करावें. हें यमेश्वराच्या नैर्ऋत्येस ब्रह्मदेवानें स्थापिलें आहे. ज्या वेळीं चंद्रानें सोमनाथाची स्थापना केली त्या वेळीं ब्रह्मादिक देव त्याठिकाणीं प्राप्त झाले. त्या वेळीं चंद्र ब्रह्मदेवास ह्मणतो कीं, तुम्हांला सर्व कांहीं ईश्वरस्थापनेचा विधि माहिती आहे, करितां तुह्मी सर्व तीर्थांच्या समक्ष सोमनाथाची स्थापना करावी. असें इंद्राचें भाषण ऐकून ब्रह्मदेवानें त्याठिकाणीं पुष्करादि तीर्थांना आव्हान केलें. तशींच स्वर्गांत आणि पाताळांत असणारीं जीं तीर्थें आहेत त्यांनाहि आमंत्रण केलें, अशातऱ्हेनें त्रैलोक्यांतील तीर्थें तेथें आलीं असतां ब्रह्मदेवानें तेथें एक कुंड निर्माण करून त्यांत सर्व तीर्थांची स्थापना केली; तें कुंड ब्रह्मदेवानें निर्माण केलें ह्मणून त्या कुण्डास ब्रह्मकुंड ह्मणतात. ह्या ब्रह्मकुंडांत त्रैलोक्यांतील तीर्थें राहत असल्यामुळें त्यांत स्नान करणाराला सर्व तीर्थांत स्नान केल्याचें पुण्य प्राप्त होतें. त्याठिकाणीं चवदा हजार गण वास करितात; व ह्या कुंडांत नित्य स्नान करितात, हें तीर्थ सामान्यजनांना दुर्लभ आहे. ह्या कुंडांत जो मनुष्य स्नान करून पितरांना तृप्त करील त्याला अग्निष्टोम यज्ञ केल्याचें फल प्राप्त होईल; व त्या पुण्याच्या प्रभावानें तो विमानांत बसून स्वर्गाला जाईल. सर्व पातकांच्या नाशाकरितां ह्याठिकाणी ब्राह्मणाला गोदान

अश्वदान, सुवर्णदान वगैरे द्यावें. सरस्वतीसुद्धा स्वतः त्या ब्रह्मकुंडांत प्रत्येक पौर्णिमेला स्नान करण्याकारितां येते. ब्रह्मकुंडांतील उदक सर्वरोगनाशक अशा रसायनाप्रमाणें असल्यामुळें तेथें स्नान करण्याला कोणत्याहि प्रकारची बाधा होत नाहीं. सर्व क्षेत्रांत प्रभासक्षेत्र श्रेष्ठ आहे. त्याची लांबी बारा योजनें म्हणजे अठ्ठेचाळीस कोसपर्यंत आहे. त्या प्रभासक्षेत्रांत सर्वश्रेष्ठ असें सोमेश्वराचें स्थान आहे. त्याच्या पूर्वेसच हें ब्रह्मकुंड आहे. त्या ब्रह्मकुंडाच्या वायव्येस हिरण्येश्वर नांवाचें लिंग आहे. हिरण्येश्वराचें पूजन करून महामंत्राचा जप करावा; व दशांशानें हवन करावें. ब्रह्मकुंडाच्या ईशान्येस भैरेश्वर नांवाचें लिंग आहे. ब्रह्मकुंडांत स्नान करणाऱ्यांना दारिद्र्य, रोग, दुःख वगैरे प्राप्त होत नाहीं; व तो राजमान्य व सर्वश्रेष्ठ होतो. या कुंडाच्या दर्शनानें सात जन्मांचीं पातकें नाश पावतात. ब्रह्मेश्वर, हिरण्येश्वर, क्षेत्रपाल व चतुर्वक्त्र ह्यांचें पूजन करणारे एकवीस कुळांचा उद्धार करून मुक्त होतात.

---

# अध्याय १४८ वा.

## कुण्डलकूपमाहात्म्य.

शंकर म्हणतात; पार्वति ! नंतर कुण्डलकूपांत स्नान करावें. हें ब्रह्मकुण्डाच्या उत्तरेस आहे. सुदर्शन नांवाचा एक सार्वभौम राजा होता. त्याचा काशीराजाच्या सुनंदा नामक कन्येबरोबर विवाह झाला. तो एकदां पूर्वजातीचें स्मरण करून आपल्या पत्नीला म्हणतो हे देवि ! पूर्वी केलेल्या ज्या शिवरात्रिव्रताच्या प्रभावानें मला आज हें राज्य प्राप्त झालें आहे तें शिवरात्रिव्रत करण्याची माझी इच्छा आहे. आतां तुला त्या शिवरात्रीचें माहात्म्य सांगतों. एक धन नांवाचा वाणी होता. त्यानें पत्नीसह एकदां शिवरात्रीचें उपोषण केलें. त्या ठिकाणीं मी एकदां पूर्वी चोरी करण्याच्या उद्देशानें गेलों. मला त्या दिवशीं जागरण पडलें व त्या जागरणाच्या प्रभावानें मी सांप्रत राजा झालों आहे, नंतर तो सुदर्शन राजा पत्नीसह प्रभासक्षेत्राला गेला व त्यानें चित्रपथा नदी व चित्रेश्वरलिंग ह्यांचें पूजन केलें; नंतर तो कुण्डलकूपाजवळ गेला व तेथें स्नान करून त्या पुण्यप्रभावानें ऐहिक राज्यसुख भोगून अंतीं मुक्त झाला. हें कुण्डलकूपमाहात्म्य व शिवरात्रिमाहात्म्य जे श्रवण करितात त्यांना सुखप्राप्ति होऊन ते शिवलोकीं जातात.

---

## अध्याय १४९ वा.

### भैरवेश्वरमाहात्म्य.

नंतर भैरवेश्वराचें दर्शन घ्यावें. हें ब्रह्मकुण्डाच्या ईशान्येस आहे. ह्या ठिकाणीं स्वतः शंकर चार मुखें धारण करून राहतात. ह्या ब्रह्मकुण्डांत स्नान करून जो मनुष्य भैरवेश्वराचें पूजन करितो तो एकवीस कुळांचा उद्धार करितो. ह्याठिकाणीं शंकर स्वतः शिवगणासह विमानांत बसून हिंडत असतात. ह्याप्रमाणें हें चार मुखाच्या भैरवेश्वराचें माहात्म्य सांगितलें आहे. ह्याच्या श्रवणानें मनुष्यें कृतार्थ होऊन व ह्या लोकीं सुखभोगून अंतीं शिवलोकाला प्राप्त होतात.

## अध्याय १५० वा.

### ब्रह्मेश्वरमाहात्म्य.

शंकर ह्मणतात; पार्वति नंतर ब्रह्मदेवानें स्थापिलेल्या ब्रह्मकुंडांत स्नान करून ब्रह्मेश्वराचें पूजन करावें. चतुर्दशीच्या दिवशीं किंवा अमावास्येच्या दिवशीं ह्याठिकाणीं श्राद्धविधि करून ब्रह्मेश्वराचें पूजन करावें. नंतर ब्राह्मणांना सुवर्णादि दानें द्यावींत. ह्याप्रमाणें जो मनुष्य ब्रह्मेश्वरपूजन करितो त्याला पुष्कळ कीर्ति प्राप्त होऊन तो ब्रह्मदेवासह स्वर्गांत आनंदानें राहतो.

## अध्याय १५१ वा.

### सावित्रीश्वरभैरवमाहात्म्य.

ह्या ब्रह्मेश्वराच्या दक्षिणेस भैरव नांवाचें एक स्थान आहे. ह्या भैरव सावित्रीनें स्थापिलेला आहे. सावित्रीनें ह्याठिकाणी केवळ वायुभक्षण करून शंकराची आराधना केली. त्या आराधनेनें शंकर संतुष्ट झाले; व सावित्रीला म्हणाले कीं, हे सावित्रि! जे कोणी ब्रह्मकुंडांत स्नान करून तूं स्थापिलेल्या ह्या भैरवाचें पौर्णिमेला पूजन करितात त्याच्या सर्व इच्छा माझ्या आशीर्वादानें पूर्ण होतात. पंचमहापातकांनीं युक्त जरी मनुष्य असेल तरी तो सर्व पातकांपासून मुक्त होतो. जे कोणी हें माहात्म्य श्रवण करितात त्यांच्या सर्व इच्छा पूर्ण होतात.

# अध्याय १५२ वा.

## नारदेश्वरभैरवमाहात्म्य.

शंकर म्हणतात; पार्वति! तुला तिसरा भैरव सांगितला आतां चवथा भैरव सांगतों ऐक. ह्या ब्रह्मेश्वराच्या पश्चिमेस आहे. ह्याची नारदानें स्थापना केली; म्हणून ह्याला नारदेश्वर म्हणतात. पूर्वीं एके काळीं सरस्वतीनें तयार केलेली वीणा हातांत घेऊन नारद वाजवूं लागला. त्या वीणाध्वनीच्या शब्दश्रवणानें ब्राह्मण जमिनीवर मूर्च्छित होऊन पडूं लागले. नंतर ह्या मूर्च्छित झालेल्या ब्राह्मणांना पाहून नारदाला फार वाईट वाटलें; व तो नारद त्या दोषाच्या निरासार्थ प्रभासक्षेत्रीं आला; व त्यानें ह्या भैरवाची स्थापना केली; आणि तो दोषमुक्त झाला. जे माघांत ह्याचें पूजन करितात ते दोष मुक्त होतात.

# अध्याय १५३ वा.

## हिरण्येश्वरमाहात्म्य.

नंतर हिरण्येश्वराचें दर्शन घ्यावें. हें ब्रह्मकुंडाच्या वायव्यदिशेस आहे. हें सर्व पातकांचें नाशन करणारें असून दारिद्र्याचाहि नाश करणारें आहे. एकदां ब्रह्मदेव प्रभासक्षेत्रीं यज्ञ करीत असतां त्याला द्रव्याचा तोटा आला तेव्हां तेथें ब्रह्मदेवानें शंकराची आराधना केली; व शंकर प्रसन्न होऊन त्यानें सरस्वतीला आज्ञा केली कीं, तूं सुवर्णाला ह्मणजे हिरण्याला वाहणारी अशी नदी होऊन तेथें वाहत राहा. अशी शंकराची आज्ञा ऐकून सरस्वती नदीरूपानें तेथें वाहूं लागली. ती सर्व नदी हिरण्याची असल्यामुळें ब्रह्मदेवाला द्रव्याचा तोटा आला नाहीं; व त्याचा सर्व यज्ञ समाप्त झाला. नंतर ब्रह्मदेवानें त्या हिरण्यरूपानें वाहणाऱ्या नदीच्या काठीं एक शिवलिंग स्थापित केलें, व त्याचें नांव हिरण्येश्वर असें ठेविलें. माघमहिन्यांतील चतुर्दशीला ह्या लिंगाचें पूजन करावें ह्मणजे सुखसौभाग्याची प्राप्ति होते; व त्यानें सर्व ब्रह्मांडाचें पूजन केल्यासारखें होतें. ज्यानें ह्याचें पूजन केलें त्यानें ब्रह्मांडाचें दान दिल्यासारखें होऊन सर्वप्रकारची दानें दिल्यासारखे होतें; व सर्व देव त्यामुळें संतुष्ट होतात. हे पार्वति! तुझ्यावर माझें फार प्रेम असल्यामुळें हें गुप्त असें माहात्म्य तुला सांगितलें आहे. जो कोणी हें श्रवण करील तो सर्व पातकापासून मुक्त होईल.

# अध्याय १५४ वा.

## गायत्रीश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; पार्वति ! नंतर गायत्रीश्वराचें दर्शन घ्यावें. हें सर्व पातकांचें क्षालन करणारें असून हिरण्येश्वराच्या वायव्येस आहे. हें लिंग गायत्रीनें स्थापिलें आहे. जे कोणी ह्या लिंगाचें पूजन करून तेथें गायत्रीमंत्राचा जप करितात ते ब्रह्महत्यादि महापातकापासून मुक्त होतात. जे कोणी ज्येष्ठ पौर्णिमेला येथें दांपत्य ( मेहूण ) भोजन घालितात; व त्यास धनवस्त्रादि देतात ते सर्वैश्वर्यसंपन्न होऊन अंतीं शिवलोकाला प्राप्त होतात. जो कोणी गंधपुष्पादिकांनीं पौर्णिमेला गायत्रीश्वराचें पूजन करितो त्यास प्रत्येक जन्मीं ब्राह्मणकुलांत जन्म प्राप्त होतो. हें माहात्म्य मुक्ति देणारें आहे.

# अध्याय १५५ वा.

## रत्नेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात; पार्वति ! विष्णूनें स्थापिलेल्या रत्नेश्वराचें पूजन करावें. जे कोणी रत्नकुंडांत स्नान करून रत्नेश्वराचें पूजन करितात त्यांचें सर्व मनोरथ पूर्ण होतात. हें स्थान मला फारच प्रिय असल्यामुळें मी येथें नित्य राहतो. जे कोणी ह्या रत्नेश्वरासमीप मृत होतील ते श्रेष्ठपदाला ह्मणजे शिवपदाला प्राप्त होतात. तेथें जो सुवर्णाचा गरुड व पिवळीं वस्त्रें ब्राह्मणास दान देतो त्याला तीर्थयात्रांचें फल प्राप्त होतें. हें आख्यान श्रवण केल असतां मोक्षप्राप्ति होते.

# अध्याय १५६ वा.

## गरुडेश्वरमाहात्म्य.

नंतर रत्नेश्वराच्या उत्तरेस असणाऱ्या गरुडेश्वराचें दर्शन घ्यावें. हें स्थान गरुडानें स्थापिलें आहे. जे कोंणी पंचमीच्या दिवशीं गरुडेश्वराचें पूजन करितात त्यांस सर्पविषाची बाधा होत नाहीं. जे कोणी पंचामृतानें ह्या गरुडेश्वराचें पूजन करितात व त्यास स्नान घालितात ते पुण्ययुक्त होऊन स्वर्गांत आनंदानें राहतात. हें आख्यान सर्वप्रकारचीं सुखें देणारें असून मुक्ति देणारें आहे.

## अध्याय १५७ वा.

### सत्यभामेश्वरमाहात्म्य.

नंतर सत्यभामेश्वराचें दर्शन घ्यावें. हें कृष्णाची पत्नी जी सत्यभामा तिनें स्थापित केलें आहे. जे कोणी ह्या ठिकाणीं जाऊन व स्नान करून ह्या सत्यभामेश्वराचें पूजन करितात त्यांना सद्गति, लक्ष्मी व कांति प्राप्त होते. माघ महिन्यांतील तृतीयेला जे कोणी ह्याचें पूजन करितात ते सर्व पातकापासून मुक्त होतात. दुर्दैव, दुःख, शोक, विघ्न वगैरे अपकार करणाऱ्या गोष्टींपासून तो मनुष्य मुक्त होतो व त्यास सर्वैश्वर्याची प्राप्ति होते. हें आख्यान श्रवण अगर पठण केल्यानें सर्वप्रकारचीं फलें प्राप्त होऊन शिवलोकप्राप्तिहि होते.

## अध्याय १५८ वा.

### अनंगेश्वरमाहात्म्य.

नंतर अनंगेश्वराचें दर्शन घ्यावें. हें अनंग जो मदन ( काम ) त्यानें स्थापिलें आहे. जे कोणी ह्या अनंगेश्वराचें पूजन करितात ते कामासारखे स्वरूपवान् होतात; व त्यायोगें स्वर्गांतील अप्सरासुद्धां त्यांना पाहून मोहित होतात. अनंगत्रयोदशीच्या दिवशीं जे व्रतस्थ होऊन ह्या स्थानाची विशेषरीतीनें आराधना करितात त्यांच्या जन्माचें साफल्य होतें. ह्याठिकाणीं ब्राह्मणाला शय्यादान करावें; म्हणजे तीर्थयात्रांचें फल प्राप्त होतें.

## अध्याय १५९ वा.

### रत्नकुंडमाहात्म्य.

शंकर म्हणतात; पार्वति ! नंतर रत्नकुंडांत स्नान करावें. हें रत्नकुंड विष्णूनें निर्माण केलें आहे. विष्णूनें हें कुंड उत्पन्न करते वेळीं त्याठिकाणीं त्रैलोक्यांतील तीर्थांची स्थापना केली होती. विशेषेकरून एकादशीला येथें पिंडदान करावें; म्हणजे पितरांची अक्षय्य तृप्ति होते. ह्या कुंडांत स्नान करणाराला अश्वमेधयज्ञ केल्याचें फल मिळतें. ह्याठिकाणीं ब्राह्मणांना पिवळ्या वस्त्रांचें दान करावें; व गोप्रदान द्यावें. कृतयुगांत हेमकुंड, त्रेतायुगांत रौप्यकुंड, द्वापरयुगांत चक्रकुंड; व कलियुगांत रत्नकुंड ह्याचीं माहात्म्यें विशिष्ट फल देणारीं आहेत. ह्या कुंडांत स्नान करणारांना तीर्थयात्रेचें फल मिळतें.

## अध्याय १६० वा.

### रैवंतकराजभट्टारकमाहात्म्य.

शंकर म्हणतात;—पार्वति! नंतर रैवंतकराजभट्टारकाचें दर्शन घ्यावें. हें सावित्रीश्वराच्या नैर्ऋत्येस आहे. ह्याचें दर्शन घेणारा मनुष्य सर्व आपत्तीपासून मुक्त होतो. रविवारीं सप्तमी आली असतां जे कोणी ह्या लिंगाचें पूजन करितात त्यांच्या कुळांत कोणीहि पुरुष दरिद्री होत नाहीं. ह्याकरितां मोठ्या प्रयत्नानें सर्वांनीं ह्या स्थानाचें अवश्य पूजन करावें; म्हणजे सिद्धि प्राप्त होतील

## अध्याय १६१ वा.

### अनन्तेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात;—पार्वति! नंतर रैवंतकराजभट्टारकाच्या दक्षिणेस असणारें; व लक्ष्मणेश्वराच्या ईशान्येस असणारें जें अनन्त (शेष) ह्यानें स्थापितलेलें अनन्तेश्वर लिंग त्याचें पूजन करावें. फाल्गुन शुद्ध पंचमीला जे कोणी अनन्तेश्वराचें पूजन करितात त्यांना पंधरा वर्षेंपर्यंत सर्पदंशाची भीति राहत नाहीं. ह्याकरितां पंचमीच्या दिवशीं अनंतव्रतपूर्वक अनन्तेश्वराचें पूजन करावें. ह्याठिकाणीं ब्राह्मणांना भोजन दिलें असतां सर्व कार्यांची सिद्धि व मुक्ति मिळते.

## अध्याय १६२ वा.

### अष्टकुलेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात;—पार्वति! नंतर लक्ष्मणेश्वराच्या पूर्वेस अष्टकुलेश्वर नांवाचें एक लिंग आहे. हें सर्व पातकांचें नाशन करणारें असून विषबाधेचेंहि नाशन करणारें आहे. हें सिद्धांनीं व गंधर्वांनीं पूजित केलें असून इच्छित वस्तु देणारें आहे. कृष्णाष्टमीच्या दिवशीं जे ह्याचें पूजन करितात ते मुक्त होतात.

## अध्याय १६३ वा.

### नासत्येश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात;-पार्वति ! नंतर नासत्य म्हणजे आश्विनौदेव त्यांनीं स्थापिलेल्या नासत्येश्वराचें पूजन करावें. हें नासत्येश्वराचें स्थान अष्टकुलेश्वराच्या पूर्वेस आहे. ह्याच्या पूजनानें सर्वपातकांचें क्षालन होऊन त्यायोगें सर्वसिद्धि प्राप्त होतात; व तो ऐहिक सुख भोगून अंतकालीं शिवलोकाला प्राप्त होतो.

## अध्याय १६४ वा.

### अश्विनेश्वरमाहात्म्य.

नंतर अश्विनेश्वराचें दर्शन घ्यावें. ह्याच्या दर्शनानें सर्व रोगांचा नाश होतो. माघ महिन्यांतील द्वितीयेच्या दिवशीं ह्याचें दर्शन दुर्लभ आहे; करितां कल्याणाची इच्छा करणाऱ्या मनुष्यानें त्या दिवशीं ह्याचें दर्शन घ्यावें. हें लिंग मोठ्या पातकांचें नाशन करणारें व अष्टसिद्धि देणारें आहे.

## अध्याय १६५ वा.

### सावित्रीमाहात्म्य.

शंकर म्हणतात;-पार्वति ! नंतर सावित्रीचें दर्शन घ्यावें. ही महापातकांचें नाशन करणारी आहे. एकदां प्रभासक्षेत्रांत यज्ञ करण्याकरितां ब्रह्मदेव उद्युक्त झाले असतां ब्रह्मदेवानें सावित्रीला बोलावणें पाठविलें; परंतु सावित्री वेळेवर न आल्यामुळें ब्रह्मदेवाला राग आला व त्यानें दुसरी पत्नी आणण्याकरितां इंद्राला पाठविलें. इंद्रानें एका गोपकन्येला आणून ब्रह्मदेवाच्या स्वाधीन केलें; व ब्रह्मदेवानें तिच्याशीं विवाह लावून तिचें नांव गायत्री असें ठेविलें. ब्रह्मदेवानें गायत्रीसह यज्ञ समाप्त केला. यज्ञ समाप्त होण्याचे वेळीं सावित्री ब्रह्मदेवानें बोलावल्यामुळें लक्ष्मी, सरस्वती, पार्वती, इंद्राणी वगैरे स्त्रियांसह यज्ञस्थानीं आली; व पाहते तों ब्रह्मदेवानें गायत्रीबरोबर विवाह लावून यज्ञ समाप्त केला आहे. हें पाहून सावित्रीला तो अपमान सहन झाला नाहीं; व ती ब्रह्मदेवावर रागावून त्याला तिनें शाप दिला कीं, तूं अपूज्य होशील; व इंद्राला शाप दिला;

कीं, तुझें सर्व राज्य शत्रु हरण करितील. अशातऱ्हेनें शाप देऊन सावित्री प्रभासक्षेत्रीं तपश्चर्या करीत बसली. जे कोणी ह्या सावित्रीचें दर्शन घेतात त्यांस पुत्रपौत्रादिकांची प्राप्ति होते. ज्येष्ठपौर्णिमेला सावित्रीचें दर्शन घेणारा व ब्रह्मसूक्ताचा पाठ करणारा पापमुक्त होतो व शिवलोकाला जातो.

## अध्याय १६६ वा.

### सावित्रीव्रतमाहात्म्य.

पूर्वीं अश्वपति नांवाचा एक राजा होता. तो यात्रा करीत करीत सावित्रीस्थलास प्राप्त झाला; व त्यानें सावित्रीव्रताला प्रारंभ केला. ह्या सावित्रीव्रताच्या प्रभावानें सावित्री संतुष्ट झाली; व तीच पुढें त्या राजाची कन्या झाली. त्या कन्येचें नांवहि अश्वपतिराजानें सावित्री असें ठेविलें होतें, त्या सावित्रीनेंहि ह्याच व्रताचें आचरण केलें. नंतर सावित्रीनें द्युमत्सेनाचा पुत्र जो सत्यवान् त्याच्याशीं विवाह करण्याचा निश्चय करून जरी तो अल्पायु आहे, असें नारदानें सांगितलें होतें तथापि त्याच्याशींच विवाह लाविला. कांहीं काळ मध्यंतरीं गेल्यावर सत्यवान् अरण्यांत काष्ठादि आणण्याकरितां गेला असतां सावित्रीनेंहि त्याच्या मागोमाग गमन केलें. त्या वेळीं सावित्री व्रतस्थ होती. नंतर सत्यवान् काष्ठें तोडीत असतां त्याच्या मस्तकाला वेदना झाल्या व तो सत्यवान् सावित्रीला ह्मणाला कीं, माझें मस्तक फार पीडित झालें आहे. असें ह्मणून सत्यवान् सावित्रीच्या मांडीवर मस्तक ठेवून निजला. तितक्यांतच यम येऊन त्याला घेऊन जाता झाला. आपल्या पतीला यमानें नेलें असें पाहून सावित्री यमाच्या मागोमाग गेली; व तिनें पतीला यमपाशापासून मुक्त केलें; त्या वेळीं द्युमत्सेनाला राज्यप्राप्ति, नेत्रप्राप्ति व पित्याला पुत्रप्राप्ति वगैरे अनेक वर तिनें यमापासून मागून घेतले. हा सर्व सावित्रीव्रताचा प्रभाव आहे. आतां हें व्रत कसें करावें सांगतों. ज्येष्ठ शुद्ध त्रयोदशीला दंतधावनादि संस्कार करून उपवास करावा, उपवास करणें अशक्य असल्यास नक्त करावें. चतुर्दशीला म्हणजे दुसरे दिवशीं अयाचित म्हणजे न मागतां कोणी होऊन जर कांहीं फलादि आणून दिलें तर तें खाऊन राहावें व तिसरे दिवशीं म्हणजे पौर्णिमेला निराहार उपोषण करावें; व एक भांडें घेऊन त्यांत पांचशेर वाळू किंवा धान्य घालून तें पात्र वस्त्रानें गुंडाळावें; व त्या पात्रावर सावित्रीची सुवर्णाची प्रतिमा करून किंवा मातीची प्रतिमा करून तिची ब्रह्मदेवासह पूजा करावी; नंतर पौर्णिमेच्या दुसरे दिवशीं पारणें सोडावें. ह्या व्रताच्या प्रभावानें स्त्रियांना

सुखसौभाग्यादि प्राप्त होतात. नंतर सावित्रीव्रताच्या सांगतेकरितां उद्यापन करावें. एकशें आठ, चौपन किंवा सत्तावीस तरी निदान सावित्रीला प्रदक्षिणा घालाव्यां. हें आख्यान सर्व संपत्ति, पुत्राद्यैश्वर्य व सौभाग्याची वृद्धि करणारें आहे.

## अध्याय १६७ वा.

### भूमातृकामाहात्म्य.

नंतर सावित्रीस्थलाच्या पश्चिमेस असणाऱ्या भूतमातृकास्थानाचें माहात्म्य सांगतों. ही भूतमाता सर्व भूतगणांबरोबर राहत असते. जे कोणी भूमातेचा प्रभाव जाणतात त्यास चांगली संतति होते; व त्याच्या सर्व इच्छा पूर्ण होतात.

## अध्याय १६८ वा.

### शालकटंकटामाहात्म्य.

नंतर शालकटंकटाचें दर्शन घ्यावें. ही सर्व पातकांचें नाशन करणारी आहे ही पौलस्त्या (रावणा)नें स्थापिलेली आहे. माघ महिन्यांतील चतुर्दशीला जे हिची आराधना करितात ते शत्रुरहित होतात; व हें आख्यान श्रवण करणारे पुत्रवान्, लक्ष्मीवान् व बुद्धिवान् होतात.

## अध्याय १६९ वा.

### वैवस्वतेश्वरमाहात्म्य.

नंतर वैवस्वतेश्वराचें दर्शन घ्यावें. हें वैवस्वत मनूनें स्थापिलें आहे. त्या [illegible] ीं स्नान करून जे वैवस्वतेश्वराचें पूजन करितात त्यांना सर्वप्रकारच्या [illegible] होतात; व ते परलोकीं आनंदानें जाऊन राहतात.

## अध्याय १७० वा.

### [illegible]लदेवीमाहात्म्य.

[illegible] मातृगणबलदेवीचें पूजन करावें. श्रावण [illegible] देवीचें पूजन करतो व दूध, मध व दिव्य

पुष्पें देवांला अर्पण करितो त्याला सर्वप्रकारचीं सुखें प्राप्त होतात; व ते ऐहिक ऐश्वर्य मिळून अंतीं शिवलोकीं जातात.

## अध्याय १७१ वा.

### दशरथेश्वरमाहात्म्य.

एकल्लवीरादेवीच्या दक्षिणदिशेस दशरथानें ह्या लिंगाची स्थापना केली. ह्या लिंगपूजनाच्या प्रभावानें दशरथाला राम ह्या नावाचा तेजस्वी व पराक्रमी पुत्र झाला. देव, दैत्य व ऋषि ह्या लिंगाच्या पूजनानें सिद्धि मिळविते झाले. हें लिंग सर्वश्रेष्ठ असून मुक्ति देणारें आहे.

## अध्याय १७२ वा.

### भरतेश्वरमाहात्म्य.

नंतर भरतेश्वराचें दर्शन घ्यावें. आग्नीध्राचा पुत्र जो भरत राजा त्यानें ह्या लिंगाची स्थापना केली. ह्याच्या नांवानें आज हें भरतखंड प्रसिद्ध आहे. ह्यानें आपल्या खंडाचें नऊ भाग करून नऊ पुत्रांना दिलें. भरतेश्वराच्या पूजनानें सर्व यज्ञांचें फळ प्राप्त होतें.

## अध्याय १७३ वा.

### कुशकादिलिंगमाहात्म्य.

कुशकेश्वर, गर्गेश्वर, मैत्रेयेश्वर व पुष्करेश्वर ह्या चार लिंगाचें पूजन करावें; म्हणजे तो मनुष्य सर्व पातकांपासून मुक्त होऊन त्यास शिवलोकाची प्राप्ति होते. वैशाख शुक्ल चतुर्दशीला ह्यांचें पूजन करून ब्राह्मणांना वस्त्र, अन्न, सुवर्ण वगैरेचीं दानें द्यावीं, ह्मणजे सिद्धि मिळतें.

## अध्याय १७४ वा.

### कुंतीश्वरमाहात्म्य.

नंतर कुंतीनें स्थापिलेल्या कुंतीश्वराचें दर्शन घ्यावें. ज्या वेळीं पांडव तीर्थ-यात्रा करण्याकरितां प्रभासक्षेत्रीं आले होते त्या वेळीं कुंतीनें हें लिंग स्थापिलें

होतें. कार्तिकी पौर्णिमेला ह्या लिंगाचें पूजन केलें असतां तो शिवलोकीं जाऊन मानमान्यता मिळवितो; व शिवस्वरूप होतो.

---

## अध्याय १७५ वा.

### अर्कस्थलमाहात्म्य.

नंतर अर्कस्थलाचें पूजन करावें. हें कुंतीश्वराच्या आग्नेयेस आहे. ह्याचें पूजन करणारास दारिद्र्यादि दुःखे प्राप्त होत नाहींत. ह्याचें दर्शन घेणारास शंभर गोप्रदानाचें पुण्य लागतें. त्या ठिकाणीं महिषीदान केलें असतां हजारों वर्षें स्वर्गलोकांत प्रतिष्ठा मिळवून तो शिवलोकीं राहतो.

---

## अध्याय १७६ वा.

### सिद्धेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात;–पार्वती! अर्कस्थलपूजन केल्यानंतर सिद्धेश्वराचें दर्शन घेऊन त्याचें पूजन करावें. हें सिद्धेश्वरलिंग अर्कस्थलाच्या जवळ आग्नेयदिशेस स्थापिलेलें आहे. ब्रह्मचारी असे अठरा हजार ऋषि ह्या सिद्धेश्वराच्या पूजनानें सिद्धीला गेले; म्हणूनच ह्याला सिद्धेश्वर म्हणतात. जे कोणी ह्या सिद्धेश्वराचें पूजन करून व उपवास करून इंद्रियनिग्रहपणानें ब्राह्मणांना दक्षिणा देतात त्यांच्या सर्व इच्छा तृप्त होऊन ते उच्चपदाला ह्मणजे कैलासलोकाला प्राप्त होतात.

---

## अध्याय १७७ वा.

### लकुलीशमाहात्म्य.

त्या सिद्धेश्वराच्या पूर्वेस लकुलीश नांवानें एक शिवलिंग आहे. त्या शिवलिंगा मध्यें शंकर स्वतः येऊन राहतात. स्वतः शंकरानें तेथें तपश्चर्या करून चित्त-स्वास्थ्य संपादन केलें आहे. कार्तिकी पूर्णिमेला जे कोणी त्याचें पूजन करि-तात ते मुक्त होतात. मोठमोठे देव व दैत्य सुद्धा ह्याच्या पूजनानें सर्व इष्ट वस्तु मिळवित झाले.

---

## अध्याय १७८ वा.

### भार्गवेश्वरमाहात्म्य.

शंकर ह्मणतात;–पार्वती! नंतर लकुलीशाच्या दक्षिणेस भार्गवेश्वर नांवाचें लिंग आहे. तें सर्व पातकांचें नाशन करणारें आहे. जे कोणी दिव्य पुष्पांनीं व फलादिकांनीं ह्या लिंगाचें पूजन करितात, ते मनुष्य कृतकृत्य होतात. ह्यांत संशय नाहीं. हें लिंग भार्गवानें स्थापिलें आहे. ह्याचें माहत्म्य श्रवण केलें असतां सर्व सिद्धि प्राप्त होतात.

---

## अध्याय १७९ वा.

### माण्डव्येश्वरमाहात्म्य.

शंकर ह्मणतात;–पार्वति! नंतर मांडव्येश्वराचें दर्शन घ्यावें. हें लिंग सिद्धेशाच्या दक्षिणेस आहे. ह्या स्थानाची लांबी रुंदी ३ धनुष्यें ह्मणजे १२ हात आहे. हें मांडव्येश्वर नांवाचें लिंग महापातकांचें नाशन करणारें आहे. जो कोणी माघ कृष्ण चतुर्दशीच्या दिवशीं ह्मणजे माघी शिवरात्रीला उपोषण व जागरण करितो तो जितेन्द्रिय मनुष्य पुनः मृत्युलोकांत जन्माला येत नाहीं. हें माहात्म्याचें कथानक श्रवण केलें असतां सर्व पातकें नाश पावतात, व त्यास सद्गति प्राप्त होते.

---

## अध्याय १८० वा.

### पुष्पदन्तेश्वरमाहात्म्य.

नंतर तेथेंच असणाऱ्या पुष्पदन्तेश्वराचें पूजन करावें. पुष्पदंत नांवाचा एक शिवगणांचा राजा होता, त्यानें तपश्चर्या करून शिवाराधना केली; व शिवलिंगाची स्थापना केली. त्या पुष्पदन्तस्थापित पुष्पदन्तेश्वराचें दर्शन घेऊन व पूजन करून जे उपोषणादि करितात, त्या प्राण्याचीं जन्मसंसार-बंधनें नष्ट होऊन जातात व त्यांच्या सर्व इच्छा पूर्ण होतात; आणि तो ह्या लोकीं सुख भोगून अंतकाळीं सर्व दुःखापासून मुक्त होऊन शिलोकाला अर्थात् मोक्षाला प्राप्त होतो.

---

## अध्याय १८१ वा.

—:o:—

### क्षेत्रपालेश्वरमाहात्म्य.

नंतर क्षेत्रपालेश्वराचें दर्शन घ्यावें. हें लिंग सिद्धेश्वराजवळ पूर्वदिशेला आहे. जे कोणी शुक्ल पंचमीच्या दिवशीं ह्याचें दर्शन घेतात त्यांना सर्पदंशादि बाधा होत नाहीं. ह्या क्षेत्रपालेश्वराचें पूजन गंधपुष्पादिकांनीं करावें. नंतर यथाशक्ति ब्राह्मणांना भोजन द्यावें. अशा तन्हेनें ह्या क्षेत्रपालेश्वरपूजनाचा समारंभ केला असतां सर्वबाधापासून निवृत्ति होऊन त्यांस सर्वप्रकारचीं सुखें प्राप्त होतात.

## अध्याय १८२ वा.



### मातृगणपूजामाहात्म्य.

शंकर ह्मणतात;–पार्वति! नंतर वसुनंदादि ज्या मातृदेवता आहेत, त्यांचें पूजन करावें. हें मातृगणस्थान अर्कस्थलाच्याच जवळ दक्षिणदिशेला आहे. आश्विन शुक्ल नवमीच्या दिवशी जे कोणी ह्या मातृगणांचें पूजन करितात त्यांना अनेकप्रकारच्या अलभ्य सिद्धि प्राप्त होतील. त्याच ठिकाणीं श्रीमुखविवर नांवाचें स्थान आहे, त्यांचेंहि दर्शन घेऊन पूजन करावें; ह्मणजे त्यायोगेंहि सिद्धि प्राप्ति होते. ह्याप्रमाणें मी सांगितलेल्या ह्या योगिनींचें जे पूजन करितात ते ऐहिक व पार लौकिल सुख मिळवून शेवटीं ब्रह्मलोकाला व शिवलोकाला प्राप्त होतात.

## अध्याय १८३ वा.



### त्रिसंगममाहात्म्य.

शंकर ह्मणतात;–हे पार्वति ! सरस्वती, हिरण्या ह्या दोन नद्या व समुद्र ह्या तिघांचा जेथें संगम ( एकीभवन ) झाला आहे. त्यास त्रिसंगम ह्मणतात. ह्यासच कोणी मिश्रतीर्थ ह्मणतात. हें सौर ( सूर्यदेवतासंबंधी ) तीर्थ आहे. समुद्राशी झालेला जो सरस्वती हिरण्या ह्या दोन नद्यांचा संगम तो त्रैलोक्यांतहि दुर्लभ आहे; तो संगम सर्व तीर्थांमध्यें व क्षेत्रामध्यें श्रेष्ठ असा आहे. रथसप्तमी-सारखी सूर्याची जी पर्वणी ह्मणून येईल त्या पर्वणीवर ह्या संगमाचें पूजन कुरु-

क्षेत्राच्या पुजनाहून श्रेष्ठ आहे. त्या त्रिसंगमावर केलेलें स्नान, दान जप, होम वगैरे कृत्य कोटिपटीनें अधिक फल देणारें आहे मंकीश्वरापासून कृतस्मरापर्यंत जीं दहाकोटी तीर्थें व शिवलिंगें आहेत तीं सर्व ह्या त्रिसंगमावर राहत असल्या-मुळें ह्या संगमाचें माहात्म्य अगाध आहे. ह्या त्रिसंगमावर असणारे कृमि, पक्षी, पशु, चांडाळ पापी दुष्ट पुरुष सुद्धा जरी ह्यांचें दर्शन घेतील तरी सर्व पातकापासून मुक्त होऊन शिवलोकाला जातील ह्यांत संशय नाहीं; असें जर आहे तर सच्छील परमेश्वरभक्त ह्या त्रिसंगमाच्या दर्शनानें मुक्त होईल, हें तर निराळें सांगावयास नकोच. ज्याच्या मनांत आपल्या यात्रेचें आपणास उत्तम फल मिळावें, अशी इच्छा वास करीत असेल त्यानें ह्या संगमावर ब्राह्मणांना आमंत्रण करून त्यांना पिवळ्या रंगाचीं पीतांबरासारखीं वस्त्रें दान द्यावींत, तसेंच सुवर्ण, कपिलागाय वगैरे हि दानें भक्तियुक्त अंतःकरणानें अर्पण करावींत. जे कोणी कृष्णपक्षांतील चतुर्दशीला तेथें स्नान करून पितरांना तर्पणानें तृप्त करितो त्यास ते पीतर चांगला आशीर्वाद देऊन अखंड तृप्त करितात. ह्याचें वैशाखी पौर्णिमेला फल विशेष आहे. येथें वृषोत्सर्गविधि करावा; ह्मणज पितर मुक्त होतात.

---

# अध्याय १८४ वा.

## मंकीश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात,-हे पार्वती! नंतर मंकीश्वराचें दर्शन घ्यावें. हें स्थान त्रिसंगमाजवळ असून, सर्व पातकांचें नाशन करणारें आहे. पूर्वीं मंकी नांवाचा एक श्रेष्ठ मुनि होता. प्रभासक्षेत्र सर्व क्षेत्रांमध्यें श्रेष्ठ आहे; असें जाणून मंकीनें तेथें भयंकर तप केलें. त्याप्रमाणें दहा हजार वर्षें पूर्ण होतांच मी प्रसन्न झालों; व मंकीला ‘ वर माग ’ असें बोललों. अशा तऱ्हेनें मी संतुष्ट झालों असतां मंकीनें मोठ्या स्वस्थ चित्तानें वर मागितला कीं, हे शंकर! जर आपण मजवर प्रसन्न झाला असाल; व जर आपली वर देण्याची इच्छा असेल, तर “ आपण ह्या ठिकाणीं कायमचा स्वस्वरूपानें वास करा; आणि ह्या स्थानाचें महत्त्व वाढवा ” एवढाच वर द्या, ह्यापेक्षां मला कसलीही इच्छा नाहीं. नंतर माझ्या वरानें त्या स्थानाला मंकीश्वर हें नांव प्राप्त झालें. जे कोणी ह्या मंकीश्वराचें माघ कृष्ण त्रयोदशी व चतुर्दशी ह्या दिवशीं पूजन करितील, त्यांच्या सर्व इच्छा पूर्ण होतील. ज्यांना आपली यात्रा सफल व्हावी, अशी इच्छा असेल त्यांनीं ह्या ठिकाणीं कपिलावर्णाच्या अशा सवत्स गाईचें दान करावें. जे कोणी ह्या मंकीश्वराचें दर्शन घेऊन पूजन करितील, त्यांच्या सर्व इच्छा सफल होऊन ते शिवलोकाला प्राप्त होतील.

---

## अध्याय १८५ वा.

### देवमातागौरीमाहात्म्य.

शंकर म्हणतात,–पार्वति ! नंतर देवमातागौरीच्या दर्शनाला जावें. हें देवमातास्थान मंकेशाच्या नैर्ऋत्येस आहे. गौरी [ पार्वती जी तूं, तीच ] देवमाता नांवानें अवतीर्ण झाली आहे. देवमाता सरस्वती नांवानें सर्वत्र प्रसिद्ध आहे. तीच देवमाता वडवेचें स्वरूप घेऊन राहिलेली आहे. माघ शुक्ल तृतीयेच्या दिवशीं जे कोणी ह्या देवमातेचें पूजन करितात ते सर्व दुःखापासून मुक्त होतात; व त्यांच्या सर्व मनकामना परिपूर्ण होतात. कोणताहि पुरुष अगर कोणतीहि स्त्री ह्या देवमातेचें पूजन करील तर तिच्या सर्व इच्छा पूर्ण होतील. जी स्त्री सुवर्णपादुका ब्राह्मणाला दान देईल, तिला स्वर्गसुख मिळेल.

## अध्याय १८६ वा.

### नागरमाहात्म्य.

शंकर म्हणतात,–पार्वती ! नंतर नागरस्थानाचें दर्शन घ्यावें. हें स्थान मंकीश्वराच्या पश्चिमेस आहे. हें स्थान सर्वांच्या पापाचें नाशन करण्यास समर्थ आहे. ज्या वेळीं श्रीकृष्ण निजधामाला गेले, असें बलरामानें ऐकिलें त्या वेळीं ते भल्लतीर्थांत स्नान करून प्रभासक्षेत्राला प्राप्त झाले. हें प्रभासक्षेत्र फारच मोठें पुण्यकारक आहे, असें श्रवण करून तेथें सर्व यादवांचा नाश केला; व स्वतः वैराग्य धारण करून तेथें राहिले. बलराम हा नागा ( शेषा ) चा अवतार असल्यामुळें तो तेथें स्वतपःसामर्थ्यानें स्वशरीराचा त्याग करून नागरूपानें राहिला; व शिवाराधना करून बिलद्वारानें नागलोकीं गेला. जेथें बलरामानें नागस्वरूप धारण करून स्वदेशत्याग केला, त्या स्थानाला नागरस्थान म्हणतात. जे कोणी तेथें स्नान करून नागरस्थानाचें पंचमीच्या दिवशीं पूजन करितात; व यथाशक्ति श्राद्ध करून ब्राह्मणांना दक्षिणा वगैरे देतात ते सर्व दुःखापासून मुक्त होऊन रुद्रलोकाला जातात. जो कोणी ब्राह्मणाला मधुर पदार्थांनीं युक्त असें क्षीर वगैरे भक्ष्यभोज्य पदार्थ घालतो त्यांस कोटी ब्राह्मणांना भोजन दिल्याचें पुण्य लागतें.

# अध्याय १८७ वा.

## प्रभासपंचकमाहात्म्य.

शंकर ह्मणतात; पार्वति ! नंतर प्रभासपंचक नांवाचें जें स्थान आहे,त्याचें दर्शन घ्यावें. प्रभासपंचक ह्मणजे पांचठिकाणीं प्रभासस्थानें असून त्याचीं निरनिराळीं नांवेंहि कल्पिलीं आहेत. तीं अनुक्रमें पश्चिमेला प्रभास, दक्षिणेला वृद्धप्रभास व जलप्रभास, पूर्वेला कृतस्मरप्रभास व उत्तरेला श्मशानप्रभास ह्याप्रमाणें पांच प्रभासाला मिळून प्रभासपंचक असें नांव आहे. जे कोणी ह्या प्रभासपंचकाचें दर्शन घेतात ते शिवलोकाला प्राप्त होतात. ह्या प्रभासपंचकाचें पूजन करून शिवलोकीं गेलेला प्राणी पुनः जन्माला येत नाहीं. ह्या पांच प्रभासांपैकीं जें पहिले प्रभास तीर्थ हें त्रैलोक्यामध्यें श्रेष्ठ आहे; व देवांनाहि मिळण्यास कठीण असें आहे. जे कोणी अमावास्येच्या दिवशीं ह्या प्रभासाचे ठिकाणीं जलदान करितात ते सर्व पातकापासून मुक्त होऊन शिवलोकाला प्राप्त होतात. गंगा व समुद्र ह्यांचा जेथें संगम झाला आहे, अशा पुण्यक्षेत्रामध्यें सात जन्मपर्यंत केलेलीं जीं मोठमोठीं पातकें तीं सर्व ह्या प्रभासस्नानानेंच नाश पावतात. चतुर्दशी, पूर्णिमा व अमावास्या ह्या दिवशीं उपोषण करून ब्राह्मणांना भोजन देणारे, त्याचप्रमाणें गाई, सुवर्ण वगैरेहि ब्राह्मणांस अर्पण करणारे पाप मुक्त होतात; व त्यांवर मी संतुष्ट होतों; व त्यांस इच्छित फल देतों. आतां प्रभासपंचकाची उत्पत्ति कशी झाली ? असा पार्वतीचा प्रश्न ऐकून शंकर ह्मणतात; पार्वती ! आतां मी तुला सर्व पापांचें नाशन करणारी प्रभासपंचकाची कथा सांगतों; ऐक. पूर्वीं मी दिगंबर असा पृथ्वीवर हिंडूं लागलों; व हिंडतां हिंडतां जेथें ऋषींचे आश्रम होते तेथें आलों;व त्या दारुवनांत ब्राह्मणांच्या आश्रमामध्यें मी भिक्षा मागूं लागलों. अशातऱ्हेनें भिक्षा मागत दिगंबर होऊन हिंडणारा जो मी त्या मला पाहून सर्व ब्राह्मणस्त्रिया मोहित झाल्या; व कामपीडित होऊन त्यांच्या मनांत पापवासना उत्पन्न झाली. आपल्या स्त्रियांचीं मनें चंचल होऊन त्या परपुरुषाला पाहून कामपीडित झाल्या, असें तेथील ब्राह्मणांनीं जाणून त्यांनीं मला शाप दिला कीं, ज्या कारणास्तव तूं नग्न होऊन आमच्या स्त्रियांचीं मनें बिघडविलींस त्या कारणास्तव तुझें लिंग जमिनीवर गळून पडेल. अशाप्रमाणें ब्राह्मणांच्या मुखांतून शापवाणी निघतांच माझें लिंग तेथेंच गळून पडलें. ज्या वेळीं माझें लिंग जमिनीवर पडलें त्यावेळीं पृथ्वी थरथर कांपूं लागली; समुद्र क्षुब्ध झाले ( समुद्राला तुफान झालें )पर्वतांचीं शिखरें गळून पडलीं. अशा वेळीं सर्व देव व गंधर्व ब्रह्मदेवाजवळ

जाऊन असें होण्याचें कारण विचारूं लागले. नंतर ब्रह्मदेव देवांना ह्मणतात; देवहो ! ब्राह्मणांच्या शापानें शिवलिंग जमीनीवर पडलें आहे; ह्मणून हा हाहाःकार सुरू झाला आहे. असें ऐकून सर्व देव शंकराकडे गेले; व त्यांनीं शंकराची स्तुति केली; व झालेलें वर्तमान सांगितलें. नंतर शंकराच्या सांगण्यावरून ब्रह्मदेव, इंद्र, कुबेर, यम व वरुण ह्या पांचानीं पांच लिंगांची प्रभासक्षेत्रीं स्थापना केली; व पूजन केलें. त्यामुळें त्यांचीं सर्व दुःखें नष्ट होऊन ते आनंदित झाले. ह्या पांच लिंगांनाच प्रभासपंचक ह्मणतात. ह्याच्या पूजनानें सर्व दुःखांचा नाश होतो.

## अध्याय १८८ ते १९० वा.

### रुद्रेश्वरादिमाहात्म्य.

शंकर म्हणतात; पार्वति ! नंतर रुद्रेश्वर नांवाचें जें स्थान आहे त्याचें दर्शन घेऊन पूजन करावें. हें आदिप्रभासाच्या पूर्वेस तीन धनुष्यें लांब आहे. ह्या ठिकाणीं रुद्रानें स्वतः ध्यान करून आपलें, तेज त्याठिकाणीं स्थापिलें आहे. हें रुद्रेश्वर लिंग सर्व पातकाचें नाशन करणारें आहे. ह्याचें पूजन करणाऱ्याच्या सर्व इच्छा पूर्ण होतात. ह्या रुद्रेश्वराच्या पूर्वेस कर्मकोटी नावाची देवता आहे. नवमीच्या दिवशीं ह्या देवीचें पूजन करावें म्हणजे त्यास सर्वप्रकारचें सुख होऊन तो अप्सरांना प्रिय होतो. नंतर प्रभासाच्या नैर्ऋत्येस असणाऱ्या मोक्षस्वामीचें दर्शन घ्यावें. एकादशीच्या दिवशीं उपोषण करून ह्याचें पूजन केल्यास अग्निष्टोम यज्ञ केल्याचें फल प्राप्त होतें. ह्याठिकाणीं चांद्रायणादि व्रतें केलीं असतां मोक्षप्राप्ति होते.

## अध्याय १९१ ते २०० वा.

### अजीगर्तेश्वरादिलिंगमाहात्म्य.

नंतर अजीगर्तेश्वर, विश्वकर्मेश्वर, यमेश्वर, अमरेश्वर, वृद्धप्रभास, जलप्रभास जमदग्नीश्वर, प्रभासपंचक, कानकुंड ह्या नऊ लिंगाचें पूजन करावें. दक्षयज्ञांत सतीनें आपला देह जाळून घेतल्यानंतर शंकर अरण्यांत जाऊन तप करूं

लागले. नंतर कामानें शंकराच्या तपांत विघ्न उत्पन्न केल्यामुळें शंकरानें कामाला जाळून टाकिलें. नंतर रतीनें कामप्राप्त्यर्थ एक कुंड निर्माण करून तेथें शिवाराधना केली. त्यायोगें शंकर प्रसन्न होऊन रतीला कामप्राप्ति झाली. अजीगर्तेश्वरादि नऊ लिंगाचें पूजन केलें असता मनुष्याच्या सर्व प्रकारच्या इच्छा पूर्ण होतात; व तो अंतीं शिवलोकाला जातो.

## अध्याय २०१ ते २१० वा.

### कालभैरवश्मशानादिमाहात्म्य.

नंतर कालभैरवश्मशानाचें दर्शन घ्यावें. ह्या ठिकाणीं जे प्राणी मृत होतात ते शिवलोकाला जातात. ह्यानंतर रामानें स्थापिलेल्या रामेश्वराचें दर्शन घेऊन मंकीश्वर,सरस्वतीसंगम. मार्कण्डेयेश्वर, पुलस्त्येश्वर, वगैरे लिंगाचें दर्शन घ्यावें. हीं सर्व लिंगें पूजन करणाऱ्या शिवभक्तांच्या इच्छा पूर्ण करणारीं आहेत.ह्या लिंगाच्या दर्शनानें सुख व सौभाग्य प्राप्त होऊन अंतकाळीं मोक्षप्राप्ति होते.

## अध्याय २११ ते २२० वा.

### पुलहेश्वरादिलिंगमाहात्म्य.

शंकर म्हणतात; पार्वति ! नंतर पुलऋषीनें स्थापिलेल्या पुलहेश्वराचें दर्शन घ्यावें. नंतर ऋत्वीश्वर, कश्यपेश्वर, कौशिकेश्वर. कुमारेश्वर, मार्कण्डेश्वर, देवराजेश्वर, मानवेश्वर, नीलकण्ठ, वृषभध्वजेश्वर, वगैरे लिंगांचें दर्शन घेऊन पूजन करावें. हीं लिंगे सर्वांच्या इच्छा पूर्ण करणारीं असून मुक्ति देणारीं आहेत. हीं लिंगमाहात्म्यें सर्वांना सुख, सौभाग्य व ऐश्वर्यें देणारीं आहेत.

## अध्याय २२१ ते २३० वा.

### ऋणमोचनेश्वरादिमाहात्म्य.

नंतर ऋणमोचनेश्वर, रुक्मवतीश्वर, पुरुषोत्तमतीर्थ, इन्द्रेश्वर, अनरकेश्वर, मेघेश्वर, बलभद्रेश्वर, भैरवेश्वर, गंगातीर्थ, गणपतीश्वर, वगैरे स्थानांचें दर्शन घ्यावें.

ह्या दर्शनांच्या प्रभावानें मनुष्यें सर्वपातकापासून मुक्त होऊन अंतकाळीं शिवलोकाला प्राप्त होतात. हीं स्थानें सर्वप्रकारच्या सिद्धि देणारीं आहेत.

## अध्याय २३१ ते २३८ वा.

### जांबवतीनदीप्रमुखतीर्थक्षेत्रमाहात्म्यें.

नंतर जांबवतीनदीचें दर्शन घेऊन तेथें स्नान करावें. नंतर पांडवकूपांत स्नान करून पांडवेश्वराचें पूजन करावें. पांडवेश्वराचें पूजन केल्यानंतर दशाश्वमेधिकतीर्थ, शतमेधतीर्थ, सहस्रमेधतीर्थ, कोटिमेधतीर्थ, ह्या तीन तीर्थांत स्नान करून दुर्वासादित्याचें पूजन करावें. नंतर वज्रेश्वराचें पूजन करून हिरण्यानदींत स्नान करावें. ह्याप्रमाणें त्या त्या तीर्थांत स्नान करून दानादि कार्यें करावींत; म्हणजे सर्व कार्यांची सिद्धि होते. हीं सर्व माहात्म्यें श्रवण व पठण केलीं असतां भक्तांच्या सर्व इच्छा पूर्ण करून त्यांना सुखसौभाग्यादि प्राप्त होऊन मुक्ति प्राप्त होते.

## अध्याय २३९ ते २४१ वा.

### नागरार्कादिलिंगमाहात्म्य.

शंकर म्हणतात; हे पार्वति ! नंतर हिरण्येच्या पायथ्याशीं असलेल्या सर्व रोगांतून मुक्त करणाऱ्या नागरार्काला जावें. पूर्वीं सत्राजितानें द्वारकेला गेल्यावर सूर्याची आराधना केली. पुत्रनाशानें दुःखित झालेल्या सत्राजितानें महाव्रत घेतलें असतां त्याला सूर्यानें प्रसन्न होऊन स्यमंतक मणि प्रसादार्थ दिला. तो मणि प्रत्येक दिवशीं आठ भार सुवर्ण देत असे. आणखीं वर माग असें सूर्यानें म्हटलें तेव्हां ह्या आश्रमांत आपण सदोदित वास करावा, असा सत्राजितानें वर मागितला. तो वर देऊन सूर्य अन्तर्धान पावला. तेथें सत्राजितानें सूर्याची शुभ्र प्रतिमा स्थापन केली; व नगरच्या लोकांना बोलावून सत्कारयुक्त वृत्तिदानपूर्वक सर्वांना संतुष्ट करून तो झाला. पूर्वीं रावणाच्या मुलानें इंद्राला जिंकून नेलेली प्रतिमा रामानें रावणाला मारल्यावर लक्ष्मणाच्या जयाचें लक्षण म्हणून ती

अयोध्येंत आणिली. ती रामानें वसिष्ठाला दिली; व वसिष्ठानें मला दिली. ती मी येथें स्थापन केली आहे. हिचा प्रतिपाल करणें मी आपणाकडे सोंपविलें आहे. सोमेशाच्या नगरवासी जनांकडे ही प्रतिमा सोंपवून मी हिचें नांव नागरार्क ठेविलें आहे. ब्राह्मणांनीं संतुष्ट होऊन त्याचें ह्मणणें मान्य केलें, प्रयागक्षेत्रीं शंभर गाई दान केल्याचें पुण्य नागरार्काच्या दर्शनानें मिळतें. त्याच्या दर्शनानें प्राणी संपूर्ण रोगांतून मुक्त होतात. हिरण्येंत स्नान करून नागरार्काचें दर्शन करणाराला कोट्यावधि वर्षें सूर्यलोक प्राप्त होतो. शुक्लपक्षांतल्या सप्तमीला सूर्यसंक्रांत झाली असतां ती महाजया पर्वणी होते. त्या दिवशीं केलेलें स्नान, दान, जप, होम व देवापितरांचें पूजन हीं कोटिगुण फलप्रद होतात. तेथें एका ब्राह्मणांला भोजन घातल्यानें कोटि ब्राह्मण भोजनाचें फळ मिळतें. ही कथा भक्तीनें ऐकणारा सूर्यलोकीं जातो. नंतर बलभद्र; कृष्ण व सुभद्रा यांचें दर्शन करावें. येथें पूर्वीं कृष्णानें देह ठेविला ह्मणून ह्या क्षेत्राला गात्रोत्सर्ग म्हणतात. येथें ह्या तिघांची पूजा करणारा स्वर्गाला जातो. तेथें बलभद्रानें शेषरूपानें देहत्याग केला आहे. मित्रवनांत त्रिसंगमक्षेत्रीं चार कोस विस्तीर्ण असें रेवतीसह बलभद्राचें शरीर लिंगाकार आहे. त्याला शेष ह्मणतात. तेथें भल्लतीर्थांत कृष्णाला बाण मारणारा जरानामक व्याध नाश पावला. चैत्र शुक्ल त्रयोदशीला ह्या शेषाचें पूजन करणाराचें वर्ष सुखानें जातें. व खरूजकांजा देवी, गोंवर वगैरे रोग मुलांना होत नाहीं.

---

## अध्याय २४२ ते २४७ वा.

### कुमारीप्रमुखदेवतामाहात्म्य.

नंतर कुमारीदेवीला जावें. पूर्वीं रथंतर कल्पांत रुरुनांवाचा राक्षस सर्व लोकाना भीतिदायक झाला. त्याच्या उपद्रवानें सर्व देव त्रासून ब्रह्मलोकीं गेले. तो पृथ्वीवर यज्ञयागादि कांहीं कर्म होऊं देईना. देव व महर्षि एकत्र जमून त्याच्या नाशाचा विचार करूं लागले. श्रमानें त्यांच्या अंगांतून जो घाम निघाला त्यापासून सुस्वरूप तेजःपुंज अशी एक मुलगी उत्पन्न झाली. ती आपल्या तेजानें दहा दिशा देदीप्यमान करीत देवांना ह्मणाली; तुह्मी मला कशाकरितां उत्पन्न केलें आहे तव्हां. देव सर्वेश्वरीचें चरित्र वर्णन करून ह्मणाले कीं, तूं आमचें त्या दैत्यापासून रक्षण कर. हें ऐकतांच ती मुलगी हंसली, तेव्हां तिजपासून पाशांकुशासिपट्टीशादि आयुधें धारण केलेल्या असंख्य कन्या उत्पन्न झाल्या. त्याच्या फेत्कारशब्दांनीं दाही दिशा व्यापून गेल्या. ती कन्या त्या मुलींसह

रुरूच्या आंगावर चालून गेली. नंतर त्यांचें भयंकर युद्ध झालें. त्या कुमारीच्या शस्त्रप्रहारांनीं जर्जर होऊन रुरूचे सैनिक पळून गेले. तेव्हां रुरूनें आपली तापसी माया तिजवर सोडिली तिचा तिजवर कांहीं परिणाम झाला नाहीं. तिनें सोडलेल्या शक्तीचा त्याच्या हृदयावर तडाखा लागून तो मूर्छित झाला. सावध झाल्यावर त्यानें पळून जाण्याचा विचार ठरविला व समुद्राकडे पळाला. देवी त्याच्या पाठीस लागली. तो समुद्रांत शिरला तेव्हां देवीनें त्याची पाठ पुरवून खड्गानें त्याचें मस्तक तोडलें. देवांनीं तिची स्तुति केली. असतां ती प्रभासक्षेत्रीं येऊन राहिली. ती देवांना ह्मणाली; मी तुह्मांला प्रसन्न आहें तुम्ही इच्छित वर मागा. तेव्हां देव ह्मणाले; हें तुझें स्तोत्र ह्मणणारावर तूं अनुग्रह कर हें तुझें चरित्र ऐकणारा पापमुक्त व्हावा. तूं येथेंच चिरकाल वास करावास. आश्विनशुक्ल पौर्णिमेस तुझी पूजा करणाराचें कल्याण व्हावें. नंतर देवी तेथेंच राहिली व देव स्वर्गाला गेले. ईश्वर ह्मणतात; हे पार्वति! नंतर हिरण्येच्या तीरीं ईशान्य कोणास जनरक्षणाकरितां राहिलेल्या महाप्रभ क्षेत्रपालाला जावें. तेथें स्त्रियांचें क्षेत्र आहे त्याचें तो रक्षण करतो. कृष्णपक्षांतल्या त्रयोदशीस त्याची पूजा करणाराचे सर्व हेतु पूर्ण होतात. नंतर हिरण्येच्या तिरीं असलेल्या पापनाशक विचित्रेश्वराला जावें विचित्रनांवाच्या रामाच्या लेखकानें तप करून तें लिंग स्थापिलें आहे. त्याचें दर्शन करणारांना यमलोक दिसत नाहीं. नंतर पर्णादित्याच्या पश्चिमेला सरस्वतीच्या तीरीं ब्रह्मदेवानें स्थापिलेल्या ब्रह्मेश्वराला जावें. तेथें द्वितीयेला स्नान करून उपवास करावा; व ब्रह्मेश्वराची पूजा करून पितृतर्पण करावें. ह्मणजे मोक्षपद मिळतें. नंतर ऋषितीर्थाच्या पश्चिमेकडून निघून समुद्राला मिळणाऱ्या पापनाशक पिंगली नदीला जावें. तिचें दर्शन करणारा रूपवान् होतो. पूर्वीं सोमेश्वराच्या दर्शनाकरितां प्रभासक्षेत्रांत कियेक महर्षि येऊन नदीतीरीं राहिले. ते काळे व विद्रूप होते; परंतु त्यांनीं पिंगलींत स्नान केल्याबरोबर ते रूपवान् मदनाचे पुतळे झाले. त्यांनीं आश्चर्यचकित होऊन तिचें नांव पिंगा ठेविलें. हिच्यांत स्नान करणाराच्या वंशांत कोणीही कुरूप जन्मणार नाहीं. हिच्या दर्शनानें पितृमेधाचें फळ मिळतें. हिच्याकांठीं केलेलें स्नान दुप्पट व तर्पण चौपट फलप्रद आहे. श्राद्धाचें फल असंख्य आहे. असा वर देऊन ऋषींनीं त्या नदीचें तीर खणून त्या ठिकाणीं यज्ञोपवीताएवढीं तीर्थें निर्माण केलीं. नंतर पिंगादित्य व पिंगलादेवीचें दर्शन घ्यावें. येथें तृतीयेला उपवास करणाराचे सर्व हेतु पूर्ण होतात. तेथेंच शुक्रेश्वराचें दर्शन घ्यावें. त्याच्या दर्शनानें सर्व पातकांचा नाश होतो.

---

# अध्याय २४८ ते २५४ वा.

## ब्रम्हेश्वरादिलिंगमाहात्म्य.

नंतर पर्णादित्याच्या पश्चिमेला सरस्वतीच्या कांठीं ब्रह्मदेवानें स्थापिलेल्या ब्रह्मेश्वराला जावें. पूर्वीं ब्रम्हदेव सृष्टि उत्पन्न करीत असतां एक अनुपमरूपलक्षणयुक्त स्त्री उत्पन्न झाली. तिला पाहून ब्रह्मा कामवश झाला व तिची रतीकरितां विनवणी करूं लागला. त्या पापानें त्याचें खररूप पांचवें मस्तक गळून पडलें. मुलीशीं पापवासना धरल्यानें घडलेल्या ह्या प्रत्यक्ष फळानें ब्रह्मा लज्जित होऊन प्रभासक्षेत्रीं आला. तेथें पापक्षालनार्थ सरस्वतींत स्नान करून त्यानें शंकराचें लिंग स्थापन केलें; व स्वस्थळीं गेला. सरस्वतींत स्नान करून ब्रह्मेश्वराचें दर्शन घेणारा पापमुक्त होऊन सत्यलोकीं पूज्य होतो. चैत्र शुक्ल चतुर्दशीला ब्रह्मेश्वराचें दर्शन घेणारा शिवलोकीं जातो. नंतर त्याच्या पश्चिमेकडील गोलक्षनामक संगमेश्वराला जावें. पूर्वीं उद्दालकनामक ब्राम्हण महातपस्वी होता. त्यानें पिंगा व सरस्वती यांच्या संगमावर भयंकर तप केलें. त्याच्या भक्तीस्तव त्याच्या समोर लिंग उत्पन्न झालें; व अशी आकाशवाणी झाली किं, उद्दालका! आजपासून येथें माझा नित्य वास होईल. हें लिंग संगमावर आहे, म्हणून ह्याचें नांव संगमेश्वर पडेल. येथें स्नान करून संगमेश्वराचें दर्शन करणाराला सद्गति मिळेल. नंतर उद्दालक मरेपर्यंत संगमेश्वराची सेवा करून शेवटीं शिवलोकाला गेला. नंतर त्रैलोक्यांत प्रसिद्ध असलेल्या संगमेश्वराच्या पश्चमेकडील गंगेश्वराला जावें. जेव्हां विष्णूनें अंतकाळीं स्नानाकरितां गंगेला बोलाविलें तेव्हां हें ऋषींनीं व लिंगांनीं व्याप्त असें सुक्षेत्र पाहून गंगेने तेथें लिंग स्थापन केलें. हे पार्वति! गंगेश्वराच्या दर्शनानें गंगास्नानाचें फळ मिळतें. तें हजार अश्वमेधांच्या पुण्याशीं तुल्य आहे. नंतर गंगेश्वराच्या पूर्वेकडे शंकरानें स्थापिलेल्या शंकरादित्याला जावें. शुद्ध षष्ठीला ह्याची पूजा करणाराला सूर्यलोक मिळतो. रक्तचन्दनयुक्त रक्तपुष्पाक्षतांनीं तांब्याच्या अर्घ्यानें तांब्याच्या ताम्हनांत जो ह्याला अर्घ्य देतो, त्याला उत्तम सिद्धि प्राप्त होते; व कधींही दारिद्र्य येत नाहीं; म्हणून त्या क्षेत्रांत मनःपूर्वक शंकरादित्याचें पूजन करावें, म्हणजे सर्व मनोरथ पूर्ण होतात. तेथेंच असलेल्या त्रैलोक्यप्रसिद्ध शंकरनाथाचें दर्शन घ्यावें. पूर्वीं सूर्यानें आराधना करून ह्याची स्थापना केली आहे. त्याची पूजा करून उपोषण करावें, ब्राह्मणभोजन घालावें; व जितेंद्रिय राहवें. शक्तीप्रमाणें सोनें व वस्त्र दान करणाराला उत्तम स्थान प्राप्त होते. नंतर हिरण्येच्या उत्तरभागीं असलेल्या पापनाशक गुंफेश्वराला जावें. त्याच्या दर्शनानें कोट्यावधि हत्यांच्या पातकाचा नाश होतो.

तेथेंच असलेल्या देवदानवांनीं पूजलेल्या ऋषि व सिद्ध यांचे मनोरथ पूर्ण करणाऱ्या पापनाशक घंटेश्वराला जावें. सोमवारीं अष्टमी आली असतां त्याची पूजा करणाऱ्याचे सर्व हेतु पूर्ण होतात व पाप नाश पावतें.

---

## अध्याय २९५ वा.

### ऋषितीर्थमाहात्म्य.

नंतर त्याच्या पश्चिमेकडे असलेल्या त्रैलोक्यप्रसिद्ध अशा ऋषींच्या तीर्थाला जावें. त्या तीर्थांत अद्यापि तीन डोळ्यांचे मासे दिसतात. अंगिरा, गौतम, अगस्त्य, सुमति, सुसखि, विश्वामित्र, स्थूलशिरा, संवर्त, प्रतिमर्दन, रैभ्य, बृहस्पति, च्यवन, कश्यप, भृगु, दुर्वास, जामदग्न्य, मार्कंडेय, गालव, उशना, भरद्वाज, यवक्रीत, स्थूलाक्ष, सकलाक्ष, कण्व, मेधातिथि, कुश, नारद, पर्वत-वसिष्ठ, अरुंधती, कण्व, गैतम, धौम्य, शतानंद, कृतव्रण, जमदग्नि, राम, बक, कृष्णद्वैपायन त्याचे अनेक शिष्य व पुत्र ह्या सर्वांनीं येथेंच तप केलें. हे सर्व समाधियोगानें ब्रह्मलोकाला मिळविण्याची इच्छा करीत असतां एकदां मोठा दुष्काळ पडला व सर्व लोक भुकेनें मरूं लागले. अन्न न राहिल्यानें त्यांनीं एकदां आपल्या प्राणाच्या रक्षणाकरितां एका मुलाचें प्रेत शिजविलें. हें आश्रमार्गानें भ्रमण करणाऱ्या वृषादर्भि राजानें पाहिलें व तो त्यांना म्हणाला, प्रतिग्रह घेणें हा ब्राम्हणाचा योग्य धर्म आहे. तुम्ही मजपासून प्रतिग्रह घ्या. ते म्हणाले राजाचा प्रतिग्रह अतिनिंद्य आहे, हें माहीत असतां आह्मी तो कसा घ्यावा. राजापासून दान घेणारा तामिस्रादि घोर नरकांमध्यें जाऊन पडतो. तर जा, तुला वाटेल तर तूं दुसऱ्याला दे. असें म्हणून ते अरण्यांत गेले. नंतर राजाच्या हुकुमावरून मध्यें सोनें भरलेलीं उंबराचीं फळें मंत्र्यांनीं त्या वनांत टाकलीं. तीं ऋषींनीं घेतलीं; परंतु तीं जड लागतात असें पहातांच अंगिरा म्हणाला; हीं घेऊं नका. अत्रि म्हणाला; छे, हीं घेण्याच्या लायक नाहींत, ह्यांत सोनें आहे, हें आपणाला समजलें नाहीं. वसिष्ठ म्हणाला; संचय करणें चांगलें नव्हे व तपसंचय करणें हाच आपला योग्य संचय आहे, संचय करणें सोडलें पाहिजे. कश्यप म्हणाला; अर्थसंचय करणें हेंच ब्राम्हणाला अनर्थकारक आहे, भरद्वाज म्हणाला; म्हाताऱ्याचीं इंद्रियें जीर्ण होतात पण आशा जीर्ण होत नाहीं. गौतम म्हणाला, जो इन्द्रियनिग्रही आहे तो वाटेल तें करूं शकेल. विश्वामित्र म्हणाला; इच्छिणाराची एक इच्छा पूर्ण

होते, तों दुसरी तयारच असते. जमदग्नि म्हणाला, जो प्रतिग्रह घेण्याला समर्थ असतांही प्रतिग्रह घेऊन तपोव्यय करीत नाहीं त्याचें तप हजारोंपट वाढतें. अरुंधती म्हणाली; जशीं कमळाच्या भोंवतीं पिसें तशा प्राण्याच्या मागें तृष्णा आहेतच. चंड म्हणाला; जर हे महात्मेही प्रतिग्रहाला भितात तर बलवानाला दुर्बलाप्रमाणें मीहि भितों. पशुमुख म्हणाला; हित इच्छिणारानें मोठ्याला अनुसरावें. शंकर म्हणाले ह्याप्रमाणें बोलून ते ऋषि त्या सुवर्णगर्भ फळांचा त्याग करून गेले. पुढें जातांना त्यांना एक कमळांनीं भरलेले तळें लागलें. तेथें शुनोमुख संन्यासी आला; व सर्वांनीं त्याच्याबरोबर स्नान केलें. त्यांनीं कमलपुष्पानीं जलसाध्य कर्में केलीं; व बाहेर येऊन पाहातात तों कमळकंद बिलकूल नाहींत. ते म्हणाले आम्हीं भुकेलेले असतां आमचे कमलकंद कोणत्या पापानें नाहींसे झाले. त्यांनीं तीं चोरून ठेवण्याबद्दल एकमेकांची शंका घेऊन शंका निरासाकरितां शपथा घेतल्या. शेवटीं शुनोमुख म्हणाला, बिसें चोरणारा वेदाध्ययन करो, अतिथिसत्कार करो. व नेहेमीं खरें बोलो. ही शपथ ऐकून सर्व ऋषि म्हणाले, तूं घेतलेली शपथ ब्राह्मणवृत्तीला अनुकूल आहे, तेव्हां तूंच बिसें चोरलींस. तो म्हणाला शास्त्रार्थ ऐकण्याकरितां तीं मीं चोरलीं. मीं इन्द्र आहे. तुम्हीं निर्लोभ होऊन सर्व पुण्यलोक जोडलेले आहेत. मी प्रसन्न आहें. तुमच्या इच्छेस येईल तो वर मागा. ऋषि म्हणाले, इन्द्रा ! जो पुरुष येथें येऊन तीन रात्र उपवास करील, स्नान, तर्पण व पितृश्राद्ध करील त्याला सर्व तीर्थांचें पुण्य मिळावें. त्यास अधोगति येऊं नये; व स्वर्गीं देवांसह आनंद मिळावा. इन्द्रानें तें मान्य केलें व तो अंतर्धान पावला.

---

## अध्याय २५६ वा.

### नंदादित्यमहात्म्य.

नंतर बुद्धिमान् नंदानें स्थापिलेल्या नंदादित्याला जावें. पूर्वीं नंदनामक राजा होता. त्याच्या राज्यांत सर्वांना सुख असून दुष्काळ, रोग व मरण हें कोणाला माहीतही नव्हतें. त्याच्या कारकीर्दींत कधींही दुष्काळ पडला नाहीं. त्याच्या पूर्व कर्मानें त्याच्या सर्वांगाला कुष्ठ झालें व तो वैराग्यशील बनला. त्यानें नदींतीरीं आदित्याची स्थापना करून उपासना केली व तो रोगमुक्त झाला. पार्वती म्हणाली, तो सार्वभौम राजा धर्मशील असतां त्याला रोग कां झाला. शंकर म्हणाले. हा नंदराजा धर्मवान् सदाचारी व प्रतापी होता. विष्णूनें प्रसन्न होऊन त्याला इच्छेनुरूप चालणारें व मोराप्रमाणें शिटी वाजणारें विमान

दिलें. तो विमानांतून फिरत फिरत मानससरोवरावर गेला. त्याला सरोवरांत मोठ्या कमलपुष्पांत असलेला तांबड्या वस्त्रानें आच्छादित द्विभुज असा आंगठ्या-एवढा पुरुष दिसला. तो सारथ्याला म्हणाला तें फूल काढून आण. सारथी गेला व त्यानें कमळाला हात घातला, त्याबरोबर त्याला मोठा हुंकार ऐकूं आला. तो हुंकार होण्याबरोबर राजा निर्वीर्य व कुष्ठी झाला. हें असें कां झालें असा विचार राजा करूं लागला इतक्यांत तेथें वसिष्ठ आला. तो वसिष्ठाला म्हणाला; माझ्या शरीराची अशी स्थिति झाली, आतां मला जगावेंसे वाटत नाहीं. तूं मला ह्यांतून तरणोपाय सांग. वसिष्ठ म्हणाला; हें ब्रह्मोद्भव कमळ आहे. ह्याच्या दर्शनानें सर्व देवाचें दर्शन होतें. हें क्वचितच कोणाच्या दृष्टीं पडतें. हें पाहिल्याबरोबर जो जलावगाहन करतो तो मोक्ष पावतो. तुझा सारथि तें काढण्याकरितां गेला व मृत्यु पावला. तो पुढल्या जन्मीं रोगी होईल. मी ब्रह्मपुत्र असल्यानें परमेश्वराला जाणतों. नेहेमीं सर्व देव इच्छितात कीं, मानसांतील ब्रह्मपद्माचें दर्शन होऊन आह्मी ब्रह्मपदाला केव्हां जाऊं. तुला कुष्ठ होण्याचें कारण असें आहे कीं, त्या कमळांत सूर्य होता तें मस्तकावर धारण करण्याची तूं इच्छा केलीस. त्या पातकानें तुझी गति अशी झाली. त्याचें तूं आराधन कर. त्याच्या प्रसादानें तूं रोगमुक्त होशील. तूं प्रभासास जाऊन आराधना कर. दुःखी प्राण्याला प्रभासांत सिद्धि फार लवकर होते. तें ऐकून तो राजा प्रभासक्षेत्रीं आला व त्यानें माहेश्वरीच्या तीरीं नंदादित्याची स्थापना करून आराधना केली. तो प्रसन्न होऊन वर माग म्हणाला. नन्द म्हणाला; मला कुष्ठरोगांतून मुक्त कर, व ह्या स्थलीं नेहमीं वास कर. सूर्य म्हणाला, तूं रोगमुक्त होशील व जे रविवारीं सप्तमी आली असतां माझें दर्शन घेतील तेहि मुक्त होतील. असें म्हणून सूर्य स्वलोकीं गेला. राजा रोगमुक्त होऊन बहुकाल राजसुख भोगून शेवटीं आदित्यलोक पावला. त्या तीर्थांत स्नान करून श्राद्ध व नंदादित्याचें दर्शन करणारा फिरून मृत्युलोकीं जन्म पावत नाहीं. जो तेथें अहोरात्र उपोषण करून धेनु अथवा घृतधेनु दान करतो त्याचें पुण्य मोजलें जात नाहीं. पार्वति, हें सूर्यमहात्म्य तुला सांगितलें.

---

## अध्याय २९७ वा.

### त्रितकूपमाहात्म्य.

नंतर नंदादित्यापासून बारा कोस पूर्वेकडे असलेल्या त्रितकूपाला जावें. पूर्वी सौराष्ट्र देशांत विद्वान् असा आत्रेयनामक राजा झाला. त्या

धार्मिकाला एकत, द्वित व त्रित असे तीन मुलगे झाले. त्यांतील वडील दोघे मूर्ख व धाकटा विद्वान् झाला. कांहीं काळानें आत्रेय मरण पावला. त्याच्या पश्चात् त्रित राज्यारूढ झाला. त्याला यज्ञ करण्याची बुद्धि झाली. त्यानें सर्व देवांना बोलाविलें. तो यज्ञाकरितां प्रभासाला गेला. तो जेथें जेथें जाई तेथें तेथें आदरसत्कार व पुष्कळ गाई त्याला मिळत. तो असंख्य गाई व दोघां वडील बंधूंसह प्रभासास पोहोंचला. इतक्या गाई दान करण्याकरितां आणलेल्या पाहून त्याच्या दोघांही भावांना वाईट बुद्धि आठवली. त्या दोघांनीं आपसांत विचार केला कीं हें सर्व कर्म त्रित करणार, आम्हाला वडलांचा हिसा लहानच, तर आपण ह्याला आधींच मारून टाकूं या. असा निश्चय करून ते निघाले. त्रित पुढें जात असतां मागून वाघानें डरकाळी फोडली. त्याबरोबर त्याच्या सर्व गाई सैरावैरा पळूं लागल्या, एकीकडे भयंकर अंधार असलेली विहीर होती व दुसऱ्या बाजूस वाघ होता. ह्या स्थितींत ते घोटाळले व वाघ गेल्यावर ते जाऊं लागले असतां दोघां भावांनीं त्रिताला त्या कोरड्या अंधाऱ्या विहिरींत लोटून दिला व ते गाई घेऊन पुढें गेले. विहिरींत पडलेला त्रित दुःख करूं लागला. तो म्हणाला मला जिवाची मुळींच फिकिर वाटत नाहीं. परंतु मी दुरून ब्राह्मणांना यज्ञाकरितां आमंत्रण केलें आहे; व तो यज्ञ आतां तसाच राहणार। असा विचार करीत त्यानें मानसिक यज्ञ करण्याला सुरवात केली. त्यानें सूक्तें ह्मणून रेती कुंडांत टाकावी. त्याच्या ह्या यज्ञानें देव तृप्त झाले व त्रिताजवळ येऊन त्याला म्हणाले. हे ब्राह्मणा, आम्हीं तुझ्या यज्ञानें तृप्त झालों. तूं इच्छित वर माग. तो म्हणाला जर मी कूपांतून निघालों तर घरीं जाऊन देवयज्ञ करीन. देवांनीं सरस्वतीची प्रार्थना केली. तिनें येऊन तो कूप पाण्यानें भरून टाकला. त्रित बाहेर पडला व घरीं गेला. तेव्हांपासून ह्या कूपाला त्रितकूप असें म्हणतात. ह्यांत स्नान करून तर्पण केल्यानें पितृमेधाचें फळ मिळतें. हें तीर्थ पितरांना प्रिय आहे. येथें तिलसुवर्ण दान करावें. अग्निष्वात्तादि पितर येथें वास करतात. ह्या तीर्थाच्या दर्शनानें प्राणी जन्मापासून मरणापर्यंत घडलेल्या पातकांतून मुक्त होतो. प्रभासाची यात्रा करणारानें त्रितकूपांत अवश्य स्नान करावें.

## अध्याय २५८ वा.

### शशापानमाहात्म्य.

नंतर त्याच्या दक्षिणेकडील पापनाशक अशा शशापान नामक तीर्थाला जावें. त्याच्या स्नानानें अपमृत्यु टळतो. देवांनीं समुद्र मंथन केल्यावर उत्पन्न

झालेलें अमृत येथें आणून प्राशन केलें. ते पीत असतां तेथें अमृताचे हजारों थेंब पडले. इतक्यांत तेथें एक ससा पाणी प्यावयास आला. त्याला अमृतपान घडलें व तो अमरत्व पावला. हें पाहून देव म्हणाले, हें तीर्थ अमृतमय झालें. ह्याच्या पानानें मनुष्य अमर होतील. हा ससाहि आमची स्पर्धा करूं लागला; हें आम्हावर मोठें संकट ओढवलें. इतक्यांत क्षयी झालेला चंद्र तेथें आला; व तो देवापाशीं अमृत मागूं लागला. मी मोठ्या कष्टानें येथवर आलों, माझ्यानें बिलकुल चालवतही नाहीं. देव म्हणाले; अमृत संपून गेलें, तूं उशीर कां केलास तरी आम्ही तुला एक युक्ति सांगतों. आम्ही पीत असतां ह्या तीर्थांत अमृत पडलें आहे. तूं हें तीर्थ पीऊन टाक. चंद्रानें सशासह सर्व तीर्थ पिऊन टाकलें. तें प्याल्याबरोबर अस्थिमात्र शिल्लक असलेला चंद्र धष्टपुष्ट झाला. त्याच्या पोटांत गेलेला ससा मेला नाहीं. तो अद्याप त्याच्या पोटांत दिसतो. चंद्र देवांना म्हणाला, हें तीर्थ उकरा, फिरून पाण्यानें भरेल. देवांनीं खणतांच तें जलपूर्ण झालें. तेव्हां देव म्हणाले, ह्या तीर्थाबरोबर चंद्र सशालाही प्याले; म्हणून ह्याचें नांव शशापान पडेल. येथें स्नान करणारा शिवलोक पावेल. येथें ब्राह्मणांना अन्नदान करण्याला सर्व यज्ञ केल्याचें फळ मिळेल. ह्याच्या दर्शनानें सर्व देवांच्या दर्शनाचें फळ मिळेल. असें म्हणून देव स्वर्गीं गेले. नंतर कांहीं काळानें बडवाग्नीसह सरस्वती तेथें आली. त्यानें हें तीर्थ अति पवित्र झालें. म्हणून ह्या तीर्थांत अवश्य स्नान करावें.

## अध्याय २५९ ते २६९ वा.

### पर्णादित्यादिमाहात्म्य.

नंतर प्राचीन सरस्वतीच्या उत्तरतीरीं असलेल्या पर्णादित्याला जावें. पूर्वी त्रेतायुगांत पर्णाद नांवाचा ब्राह्मण प्रभासक्षेत्रीं येऊन तपश्चरण करता झाला. त्यानें रात्रंदिवस सूर्याची आराधना चालविली. त्याला पुष्कळ कालानंतर सूर्य प्रसन्न होऊन म्हणाला; मी तुला प्रसन्न आहें. तुझ्या मनासारखा वर माग. ब्राह्मण म्हणाला; स्वप्नांतहि न प्राप्त होणारा जर तूं मला प्रसन्न आहेस तर ह्या क्षेत्रांत चिरकाल वास कर. तुझ्या दर्शनानें लोक सूर्यलोकाला जावोत. तसें होईल असें सांगून सूर्य अंतर्धान पावला. पर्णाद तसेंच आराधन करीत राहिला.

भाद्रपद शुद्ध षष्ठीला स्नान करून पर्णादित्याचें दर्शन करणाराला दुःख स्पर्श करीत नाहीं. प्रयागांत शंभर गाई दान केल्याचें पुण्य पर्णादित्याच्या दर्शनानें मिळतें. पर्णादित्याची सेवा करणाराला कोणताही रोग रहातच नाहीं. नंतर त्याच्या पश्चिमभागीं सिद्धांनीं स्थापिलेल्या सिद्धेश्वराला जावें. पूर्वी सिद्धांनीं सर्ववस्तूंच्या सिद्धीकरितां हें लिंग स्थापन केलें. शिवानें संतुष्ट होऊन त्यांला अणिमादि सर्व ऐश्वर्य दिलें. व मी नेहमीं या लिंगांत वास करीन म्हणून सांगितलें. जो चैत्र शुक्ल चतुर्दशीला ह्याची पूजा करील तो माझ्या प्रसादानें उत्तम स्थान पावेल, असें म्हणून शिव अन्तर्धान पावला. तेथें सिद्ध त्याची पूजा करितात. त्याचें आराधन करणाराला उत्तम सिद्धि मिळते; म्हणून त्याची पूजा करावी. नंतर शंकरानें मर्यादा ठरविण्याकरितां दक्षिणेकडे आणलेल्या संकुमती नंदीला जावें, तिच्यांत स्नान करून श्राद्ध करणाराचे पितर तरून जातात. वैशाख शुक्ल तृतीयेला संकुमतींत स्नान करून तिलदर्भयुक्त तर्पण केल्यानें गंगेवर श्राद्ध केल्याचें श्रेय मिळतें. नंतर गोष्पाल्याच्या दक्षिणेकडे असलेल्या पापनाशक वराहाला जावें. शुक्ल-पक्षांत एकादशीला त्याची पूजा करणाराला विष्णुपदप्राप्ती होते. नंतर संकुमतीच्या उत्तरेकडील आश्चर्यकारक अशा छायालिंगाला जावें. पुण्य-शीलांनाच त्याचें दर्शन होतें, पापिष्ठांना होत नाहीं. तेथेंच पुण्यात्म्या ऋषींची रहावयाची गुंफा आहे. त्या नदिनी गुंफेचें दर्शन करणाराला चांद्रायण व्रत केल्याचें फळ मिळतें. तेथून सर्व मनोरथ पूर्ण करणाऱ्या ईशान्येकडील करक-नन्देला जावें. चैत्र शुक्ल तृतीयेला यात्रा करणाराचे सर्व मनोरथ पूर्ण होतात. नंतर शरभस्थानाच्या पूर्वेकडील कुंभीश्वराला जावें. त्याच्या दर्शनानें मनुष्य सर्व पापांपासून मुक्त होतो. तेथून गंगापथ, उत्ताना नदी व गंगेश्वर यांजला जावें. उत्तानेंत स्नान करून गंगेश्वराची पूजा करणारांची सर्व पातकें नाश पावतात; व लक्षाश्वमेधांचें फल मिळतें. तेथून चमसोद्भेदक्षेत्राला जावें. त्याठिकाणीं महादेवानें दहा हजार वर्षें सत्र चालविलें होतें. त्याठिकाणीं देवांनीं चमसपात्रानें सौम्यपान केलें; म्हणून त्याला चमसोद्भेद म्हणतात. वैशाख शुक्ल पौर्णिमेला सरस्वतींत स्नान करून पिंडदान करणाराला गयेच्या कोटीपट पुण्य लागते. नंतर विदुराचें तप करण्याचें स्थान जें विदुराश्रम त्याला जावें. तेथें विदुरानें त्रिभुनेश्वर नामक लिंग स्थापन केलें आहे. त्याचें दर्शनानें सर्व हेतु पूर्ण होतात. गंधर्वांनीं सेवन केलेलें विदुरादालक नांवाचें द्वादश स्थान अल्पपुण्य असलेल्यांना प्राप्त होत नाहीं. तेथें कधींही अवर्षण पडत नाहीं. पाप-क्षालनाकरितां तेथील लिंगाचें दर्शन घ्यावें.

# अध्याय २७० वा.

## मंकीश्वरमाहात्म्य.

नंतर प्राचीन सरस्वतीला जावें, तेथील लिंगाला मंकीश्वर म्हणतात. त्याच्या उत्पत्तीची आश्चर्यकारक कथा सांगतों. मंकणक नामक ऋषि प्राचीनसरस्वतीला येऊन स्वाध्यायपूर्वक तप करतां करतां. त्याचीं हजारों वर्षें गेलीं. नंतर त्याच्या हाताला दर्भ टोंचून त्यांतुन शाकरस वाहूं लागला आहे. तें पाहून त्याला आश्चर्य वाटलें व तो आनंदानें नाचूं लागला. त्याच्या प्रभावानें सर्व स्थावर-जंगमात्मक जग त्याजबरोबर नाचूं लागलें. तेव्हां सर्व देवांनीं शंकराची प्रार्थना केली कीं, हा नाचणार नाहीं असें करा. जों त्रैलोक्य रसातळाला पोंचलें नाहीं, तोंच ह्याचा बंदोबस्त केला पाहिजे. तुझ्यावांचून ह्याचें निवारण होणार नाहीं हें ऐकून ब्राह्मणाचें रूप धारण करून शंकर मंकणाकडे गेला व त्याला म्हणाला; तूं इतका नांचत आहेस ह्याचें कारण तरी काय ? मंकण म्हणाला हा माझ्या हातांतून शाकरस गळत असलेला पाहिला नाहींस काय ? ही मला मोठी अलोट सिद्धि झाली आहे. हें ऐकून भगवानानें आपल्या आंगठ्यावर बोटाच्या शेवटानें प्रहार केला, त्याबरोबर त्यांतुन पांढरें शुभ्र भस्म पडलें. भगवान् मंकणाला म्हणाला, हें पहा माझ्या आंगठ्यांतून कितो तरी भस्म पडलें. तरी मला त्याचें आश्चर्यही नाहीं व आनंदही नाहीं, तें ऐकून मंकण म्हणाला, तुला मी शंकर समजतों. मी शंकराखेरीज अन्य देवाला जाणत नाहीं. शंकर म्हणाले; तूं मला बरोबर ओळखिलेंस. मी प्रसन्न आहें. तुला वाटेल तो वर माग. मंकण म्हणाला; भगवत्कृपेच्या योगें आनंदानें नृत्य केलें असतांही तपाची हानि होऊं नये. अशी युक्ति करा. शंकर म्हणाले; तुझें तप हजारपट वाढेल, त्याची हानि होणार नाहीं. आणि तुझ्यासह मी प्राचीनसरस्वतीतीरीं नित्य वास करीन. ह्या प्राचीन सरस्वतीच्या उत्तरतीरीं देह ठेवणाराला पुनर्जन्म येणार नाहीं. हिच्यांत स्नान करणाराला अश्वमेधाचें फळ मिळेल. येथें व्रतस्थ राहून स्नान करणाराला ब्रह्मपदप्राप्ति होईल. येथें गुंजभर सोनें दान केल्यानें सुवर्णमेरु दानाचें फळ मिळतें. येथें श्राद्ध करणाराच्या वंशांतील एकवीस पुरुषांचा उद्धार होईल. येथें पिंडदान केल्यानें पितरांनां ब्रह्मलोकप्राप्ती होते. केवल सरस्वतीच्या दर्शनानें स्वर्गप्राप्ती होईल. येथें दहीं दान केल्यानें अग्निलोकप्राप्ती होते. ऊर्णावस्त्र दान दिल्यानें उत्तम सिद्धि मिळते. येथें स्नान करणाराला गोप्रदानाचें फळ व वैकुंठप्राप्ती होते. तर्पण व पिण्डदान केल्यानें नरकांत पडलेल्याही पितरांचा उद्धार होतो. प्रभासांतील सरस्वती स्वर्गाची शिडी आहे. तिची पाण्याला प्राप्ती

होत नाहीं. कृष्णपक्षांतील चतुर्दशीला येथें स्नान करून पिंडदान करावें. ह्या प्रमाणें वरदान देऊन शंकर अंतर्धान पावले. ह्या तीर्थाविषयीं विष्णूंनीं अशी ख्याति गाइली आहे किं, कुरुक्षेत्र, प्रयाग, भागीरथी किंवा पुष्कर न घडेल तरी प्राचीनसरस्वतीला अवश्य जावें.

---

## अध्याय २७१ ते २७७ वा.

### ज्वालेश्वरादिमाहात्म्य

नंतर त्याच्याच जवळील ज्वालेश्वराला जावें. पूर्वीं शंकरानें येथें जळता बाण टाकला म्हणून ह्याला ज्वालेश्वर हें नांव पडलें. मनुष्य ह्याचें दर्शन केल्यानें सर्व पातकांतून मुक्त होतो. नंतर त्रिपुराच्या लिंगांना जावें. त्यांच्यीं नांवें विद्युन्माली, तारक व कपोल अशीं आहेत. त्यांचें दर्शन पापनाशक आहे. नंतर शंडतीर्थाला जावें. त्याच्या दर्शनानें पाप नष्ट होऊन सर्व मनोरथ पूर्ण होतात. पूर्वीं ब्रम्हदेवाला पांच मुखें होतीं. त्याचें मस्तक मी कांहीं कारणास्तव छिन्न केलें. त्याच्या रक्तानें गंधवती उत्पन्न झाली. तेथें मोठाले ताड उत्पन्न झाले त्याला तालवन म्हणतात. तें ब्रम्हदेवाचें कपाल माझ्या हातांत राहिलें व वृषभ. वाहनासह माझा वर्ण काळा झाला. मी पापशान्तीकरितां अनेक तीर्थांना गेलों पण पाप शांत होईना. शेवटीं प्रभासक्षेत्रीं आलों. तेथें प्राचीसरस्वतीचें दर्शन घेतलें. माझा वृषभ सरस्वतींत शिरला तो शुभ्र झाला. मीही शुद्ध झालों व माझ्या हातांतील कपाल सुटून गेलें. त्या लिंगरूप भगवंताला कपालमोचन म्हणतात. तेथें श्राद्ध केल्यानें सात कल्पपर्यंत पितरांचीं तृप्ती होते. तेथें पापशुद्धीकरतां अन्न, सुवर्ण, दहीं व कांबळें हीं यथाविधि दान करावींत. काळा वृषभ येथें शुभ्र झाला म्हणून ह्याला षंडतीर्थ नांव पडलें. नंतर सूर्यप्राचीला जावें. ही सर्व पाप शमन करून सर्व मनोरथ पूर्ण करते. तेथें स्नान केल्यानें सर्व पातकें नष्ट होतात. नंतर ऋषितीर्थाजवळच्या त्रिलोचनाला जावें. हें ऋषिपूज्य लिंग न्यंकुमतीच्या उत्तरतीराला आहे येथील माशांना तीन डोळे आहेत; व पाणी स्फटिकाप्रमाणें शुभ्र आहे. तेथें स्नान केल्यानें ब्रह्महत्त्या पातकाचा नाश होतो. भाद्रपद कृष्ण चतुर्दशीला उपवास करून रात्रीं जागरण करावें. सकाळीं श्राद्ध करून शंकराची पूजा करावी, म्हणजे शिवलोकाची प्राप्ति होते. नंतर ऋषितीर्थाजवळील देविका नामक कामिकतीर्थाला जावें. तेथें महासिद्धिवन नांवाचें ऋषिसेवित वन आहे. तें वन अनेक जातीच्या गगनचुंबित वृक्षांनीं सुशोभित असून अनेक पशुपक्षीश्वापदांनीं सेवित आहे. तेथें कोणी गातात, नाचतात, वाद्यें

वाजवितात, गर्जना करितात, पुष्पवृष्टि करितात व कोणी ऊर्ध्वबाहु उभे राहून तप करतात. तेथें मी उमापति नाम धारण करून अक्षय वास करितों. कोणत्याही युगांत मी देविकातीर सोडित नाहीं. मी तेथें तुझ्यासह राहिलों आहे; म्हणून मला उमापति म्हणतात. पौषांतल्या अमावास्येस तेथें केलेल्या श्राद्धाचें फळ कधींही संपत नाहीं. त्याच्या दर्शनानें हजारों ब्रह्महत्त्येच्या पातकांचा नाश होतो. तेथें गाय, सोनें व वस्त्र दान करावें. तेथें श्राद्ध करणारा मुलगाच फक्त पुत्र ह्या नांवाला योग्य आहे. सर्व देवांनीं तिला स्नानाकरितां बोलाविली म्हणून त्या श्रेष्ठ नदीचें नांव देविका पडलें. तेथें देविकेच्या कांठीं असलेल्या भूधर-वराहाचें दर्शन घ्यावें. त्यानें दंष्ट्राग्रानें पृथ्वी धारण केली म्हणून त्याला भूधर म्हणतात. अनेक नामें धारण करणारा भगवान् तेथें वराहरूप धारण करून राहिला आहे. पौषांतल्या अमावास्येला अथवा कन्याराशीला सूर्य आला असतां गुडयुक्त पायस व गुडयुक्त हविष्यान्न तयार करून, ‘ नमो वः पितरो रसाय ’ ह्या मन्त्रानें अन्न अभिमंत्रित करावें. “ तेजोऽसि शुक्रं, दधिक्राव्णो, आप्यायस्व ” ह्या तीन मंत्रांनीं क्रमानें तुप, दहीं व दूध आणि ‘ महानिन्द्रेण ’ ह्या मंत्रानें वरकड सर्व अन्न देऊन ‘ संवत्सरोनियो ’ ह्या मंत्रानें पाणी द्यावें. ह्याप्रमाणें ब्राह्मणभोजन झाल्यावर पिंडदान करावें. ह्याप्रमाणें श्राद्ध करणाराचे पितर तृप्त होतात; व श्राद्धकर्त्याला गयाश्राद्ध न करितां गयाश्राद्धाचें फळ मिळतें.

---

## अध्याय २७८ वा.



### देविकामाहात्म्य व मूलस्थानमाहात्म्य.

नंतर देविकेच्या कांठीं असलेल्या मूलस्थान नामक क्षेत्राला जावें. तेथें वाल्मीकि मुनीनें सूर्याची उपासना व सप्तर्षींची चोरी केली. त्याच्याच पश्चिमेला मरीच्यादिक आहेत. पार्वती म्हणाली, वाल्मीकीचें तप सिद्ध कसें झालें; व त्यानें सप्तर्षींची काय चोरी केली; हें सर्व सांगा. शंकर सांगतात. पूर्वी शमीमुख नामक ब्राह्मण गृहस्थधर्मानें वागत असतां त्याला मुलगा झाला. त्याचें नांव वैशाख, तो अतीशय भयंकर क्रूर कर्में करणारा निघाला. त्यानें फक्त गुरूच्या सेवेशिवाय दुसरे कोणतेंही सत्कर्म कधींही केलें नाहीं. त्याचे आईबाप म्हातारे झाल्यानें त्यांचें पोषण त्याजला करावें लागे. तेव्हां तो रस्त्यानें जाणाऱ्या लोकांना लुटून कुटुंबपोषण करूं लागला. एकदां सप्तर्षि तीर्थयात्रेकरितां त्या रस्त्यानें जात असलेसे त्याच्या दृष्टीस पडले. तो हात उगारून व दरडाऊन त्यांना थांबा म्हणाला. त्या शांत

मूर्तीचें त्याला दर्शन झाल्यावर आपलें दर्शन ह्याला निष्फळ होऊं नये म्हणून अंगिरा म्हणला, अरे लुटाऱ्या! मी आपल्या फायद्याकरितांच तुला विचारतों, तुला कोणी मुलें माणसें आहेत काय. तो म्हणाला म्हातारे आईबाप, बायको, एक मजुरीण व मी एवढेंच माझें कुटुंब आहे. ऋषि म्हणाले, तूं त्यांना जाऊन विचार कीं, मी जीं पापकर्मे करून तुमचें पोषण करतों त्याचे तुम्ही भागीदार आहांत काय? त्यानें जाऊन तसें विचारिलें तेव्हां आईबाप म्हणाले. पाप जो करतो त्यालाच तें भोगावें लागतें, हें ऐकून मुलगा ह्मणाला, पण हें सगळें मी तुमच्या-करतां करतों; म्हणून तुम्ही त्याचे हिस्सेदार आहात कीं नाहीं. ते ह्मणाले; आम्ही तुसें लहानपणीं पालन केलें तसें तूं आमचें म्हातारपणीं करतोस, हा ब्रह्मदेवानें लाऊन दिलेला सृष्टिमार्गंच आहे. तुझ्या पालनाकरितां केलेल्या पापपुण्याचें. फळ आम्ही भोगूं, तसें आमच्या पोषणाकारितां केलेल्या कर्मांचें फळ तूं भोग. बाळ! ज्याचें कर्म त्यालाच भोगावें लागतें; म्हणून माणसानें नेहमीं चांगलें कर्म करावें. तूं वाटेल तें कर्म कर पण आमचें पोषण तुला केलें पाहिजे. तुझ्या कर्मांचा आमच्याशीं संबंध येत नाहीं. हें ऐकून त्यानें आपल्या बायकोला तसेंच विचारिलें तेव्हां तीही तसेंच म्हणाली. तेव्हां त्याला आपल्या पूर्वकर्मा-विषयीं अतिशय पश्चाताप झाला. तो म्हणाला; जो सत्कर्म करीत नाहीं तो आप-लेंच शत्रुत्व करतो. शेवटीं तो ऋषींकडे आला व त्यांना म्हणाला, तुम्ही खुशाल मार्गानें जा. मजकडून यथाशक्ति घडेल तो आदरसत्कार स्वीकारा व मला क्षमा करा. मी आजपासून आपलें पहिलें कर्म सोडलें आहे. तुम्ही कृपा करून मला असा कांहीं नियम, व्रत, उपवास किंवा मंत्र सांगा, ज्याच्या योगानें मी ह्या पापकर्मांतून मुक्त होईन. ऋषि म्हणाले, तूं चांगला प्रश्न केलास. तुला जें आम्हीं संक्षेपानें सांगतों तें तूं कोणालाही सांगूं नकोस. तूं 'झाटघोट' ह्या चार अक्षरीं मंत्राचा सतत जप कर. ह्या मंत्रजपानें तूं सर्व पापांतून मुक्त होऊन मोक्ष पावशील. त्यानें लागलाच मंत्राचा जप करण्याला आरंभ केला; व ऋषि तीर्थाटणाला गेले. त्याची मंत्र जपतां जपतां तेथेंच समाधि लागली. ह्याप्रमाणें त्याची समाधि स्थिति होऊन हजारों वर्षें गेलीं. त्याजवर मोठें वारूळ वाढलें. त्याला त्याची खबरही नाहीं. नंतर सप्तर्षि सहज त्या मार्गानें जात असतां त्यांना मागील आठवण झाली. ते परस्परांत म्हणाले, येथेंच त्या विशाखानें आपल्याला लुटलें होतें. असें बोलत असतां त्या वारुळांतून शब्द निघालेला त्यांनीं ऐकिला, व तें वारूळ खणलें. तों चार अक्षरी मंत्राचा जप करीत असलेला तो त्यांनीं पाहिला. त्यांनीं औषधी त्याच्या अंगाला रगडल्या त्याबरोबर तो हुशार होऊन म्हणाला, तुमचा उपदेश मीं घेतला. तुम्ही तीर्थयात्रेला जा. माझ्या आईबापांना

व बायकोला सांगा कीं, विशाख निःसंग झाला; आतां तो तुमचें दर्शन घेऊं इच्छित नाहीं. ऋषि म्हणाले, त्याला असंख्य काळ लोटला. तुझा निरोप ऐकायला ते राहिलेच नाहींत. तूं मन्त्र जपत असतां तुजवर वारूळ वाढलें म्हणून तूं वाल्मीकि ह्या नांवानें प्रसिद्ध होशील. तुझ्या जिह्वाग्रीं सरस्वती वास करील. तूं रामायण काव्य लिही, त्यानें तुला मोक्ष मिळेल. तो म्हणाला, ऋषि हो, तुम्हीं मजपासून गुरुदक्षिणा घ्या. ऋषि म्हणाले, तूं सिद्धि पावलास, हीच आमची गुरुदक्षिणा आहे. तिनेंच आम्हीं कृतार्थ आहोंत. तूं इच्छेला येईल तो आम्हापाशीं वर माग. वाल्मीकि म्हणाला, जर आपण मला प्रसन्न होऊन वर देतां तर इतकेंच सांगा कीं, देविकेच्या तीरीं येथें मनोरथ पूर्ण करणारा कोणता देव रहातो. ऋषि म्हणाले, हा जो मोठा विशाल निंबवृक्ष दिसत आहे त्याच्या खालीं महादेवाचा अंश असा सूर्य वास करतो. तो ह्या क्षेत्राची देवता आहे. त्याच्या योगानें ह्या दोन कोस विस्तीर्ण प्रदेशाला सूर्यक्षेत्र म्हणतात. तूं त्याची उपासना कर. ह्या क्षेत्रांत वास करणाराला स्वर्गगति मिळते. ह्या क्षेत्राला मूलस्थान म्हणतात. तूं येथेंच वास कर. हें तीर्थ ह्यानंतर फार ख्याति पावेल. आम्हीं ज्या जागीं लुटले गेलों, ती मूळची जागा असल्यानें ह्याला मूलस्थान म्हणतात. उत्तरायणसंक्रांतीला जे येथें स्नान करतील त्यांना स्वर्गप्राप्ती होईल. तिलतर्पण केल्यानें पितरांची गयाश्राद्धानें होणारी तृप्ति होईल. येथें यथाशक्ति श्राद्ध केल्यानें पितर मोक्ष पावतात. येथल्या जलस्पर्शानें कीटपिपीलीकाही मोक्ष पावतील. आम्ही तुझ्या प्रेमास्तव श्रावणी पौर्णिमेला येथें येऊं. त्या दिवशीं तीर्थोदकानें पितृतर्पण करणारांचे अठराही कुष्ठरोग नाहींसे होतील. असें सांगून ते अन्तर्धान पावले. वाल्मीकीनें सूर्याची आराधना करून रामायण रचिलें; म्हणून ह्या देवाचें दर्शन घ्यावें, व रामायण वाचावें.

---

## अध्याय २७९ ते २८१ वा.



### च्यवनेश्वरमहात्म्य.

नंतर हिरण्येच्या पूर्वभागीं च्यवनानें स्थापिलेल्या च्यवनार्कीला जाऊन च्यवनेश्वराचें दर्शन घ्यावें. पूर्वी भृगूचा च्यवन नांवाचा मुलगा प्रभासांत वीरासन घालून तप करूं लागला. तो एका जागीं पुष्कळ काळपर्यंत तप करीत राहिला. तेथें त्या ऋषीवर एक वारूळ तयार झालें होतें. नंतर कांहीं काळानें शर्याति राजा सोमेशाच्या दर्शनाकरितां प्रभासास आला. त्याला

सुकन्या नांवाची एकच मुलगी होती. ती आपल्या मैत्रिणीबरोबर फिरत फिरत च्यवनाच्या वारुळाजवळ आली. वारुळांत चमकत असलेली कांहीं गंमत असावी, अशा बुद्धीनें तिनें कांट्यानें वारुळांत टोचिलें. त्यायोगें च्यवनाचे डोळे फुटले, नंतर च्यवनाला क्रोध आला व त्यानें तेथील सर्व प्राण्यांच्या मलमूत्राचा अवरोध केला. त्यामुळें येथील प्राणी भयंकर रोगानें व्याकूळ झाले व भगवान् च्यवनाचा कोणी अपराध केला कीं काय ! ह्याचा शोध करूं लागले. त्याचा कांहीं पत्ता लागेना तेव्हां राजा आपल्या मंडळींत ह्याचा शोध करूं लागला. सर्व सैन्य मरणोन्मुख झालेले व बाप दुःखी झालेला पाहून सुकन्या शर्यातीला म्हणाली; वारुळांत कांहीं चमकलेलें मी पाहिलें व तें कांट्यानें टोंचिलें. हें ऐकतांच शर्याति वारुळाजवळ आला व त्यानें तपोवृद्ध च्यवनाला पाहिलें. त्यानें सर्वांच्या प्राणरक्षणाकरितां च्यवनाची प्रार्थना केली कीं, माझ्या अज्ञ मुलीनें आपला अपराध केला; आपण क्षमा करा. च्यवन म्हणाला, रूप मोठेपणा, लोभ आणि अज्ञान ह्यानें चढलेल्या तुझ्या मुलीचा अपराध तिला माझ्या स्वाधीन केली असतां मी क्षमा करीन. हें ऐकतांच शर्यातीनें आपली सुकन्या च्यवनाला दिली. च्यवनानें सुकन्येचा स्वीकार करतांच सर्व रोगमुक्त होऊन सुख पावले. राजा सर्वांसह नगराला गेला. सुकन्या च्यवनाची अनन्य भावानें सेवा करूं लागली. अग्नीची, अतिथींची व च्यवनाची मनःपूर्वक सेवा करणाऱ्या तिला च्यवन प्रसन्न झाले. नंतर कांहीं दिवसांनीं न्हालीमाखलेली सुकन्या अश्विनीकुमारांच्या दृष्टी पडली. ते तिला म्हणाले; तूं कोण व ह्या अरण्यांत काय करतेस हें सांग. तेव्हां सुकन्या आड उभी राहून मर्यादेनें म्हणाली, मी शर्यातीची मुलगी च्यवनाची स्त्री आहें. ते हंसून म्हणाले; तुझ्या बापानें असल्या तपस्वी म्हाताऱ्याला तुला कशी दिली. आम्हां दोघांतून तुला वाटेल त्याला तूं आनंदानें वर. असल्या ह्या तपस्वाच्या नादानें आपलें तारुण्य व्यर्थ दवडूं नकोस. हें ऐकून ती त्यांना म्हणाली, तुम्ही असली शंका घेऊंच नका. माझी च्यवनावर अत्यंत निष्ठा आहे. तेव्हां ते म्हणाले; आम्ही देववैद्य आहोंत. तुझ्या नवऱ्याला तारुण्यरूपसंपन्न करितों. नंतर तूं च्यवन किंवा आम्ही दोघांपैकीं वाटेल तो ह्या कोणालाही वर. तें जाऊन तिनें च्यवनाला सांगितलें. तो म्हणाला ठीक आहे, तूं तें कबूल कर. ती त्यांना म्हणाली ठीक आहे, असें करा. तेव्हां ते म्हणाले; च्यवनानें ह्या तीर्थांत स्नान करावें. असें म्हणतांच च्यवनानें व अश्विनीकुमारांनींही त्या तीर्थांत स्नान केलें; आणि ते तिघेहि बाहेर पडले, तों सारखे रूपयौवनसंपन्न दिव्य मूर्ति झाले. ते तिला म्हणाले; आतां आम्हां तिघांपैकीं तुला वाटेल त्याला तूं वर. तिनें निश्चयानें ओळखून च्यवनालाच वरलें. नंतर च्यवन आनंदित होत्साता अश्विनीकुमारांना म्हणाला;

तुम्ही रूप, यौवन व स्त्री ह्यावर समयोग प्राप्त केलात, तरी मी तुमचें काय प्रिय करावें. तें म्हणाले आम्हांला इंद्र सोम देत नाहीं; म्हणून तूं आम्हांला सोमाचे सममागी कर. तें च्यवनानें कबूल केलें. नंतर अश्विनीकुमार स्वर्गीं गेले; व च्यवन आणि सुकन्या आनंदविलास उपभोगूं लागलीं.

## अध्याय २८२ ते २८४ वा.

### च्यवनेश्वर व सुकन्यासरोवराचें माहात्म्य.

हें वर्तमान ऐकून वलभी नामक नगरींत राज्य करीत असलेल्या शर्यातीला अतिशय आनंद झाला; व तो आपल्या सर्व परिवारासह च्यवनाला भेटण्याकरितां भार्गवाश्रमाला गेला. च्यवनानें त्यांचें फार सन्मानपूर्वक आदरातिथ्य केलें. नंतर ते सुखानें गोष्टी बोलूं लागले तेव्हां च्यवन शर्यातीचें सान्तवन करून म्हणाला; मी तुजकडून यज्ञ करवितों, तूं सामान तयार कर. शर्यातीनें त्याचें आदरयुक्त भाषण ग्रहण केलें व पुढें सुमुहूर्तावर भव्य यज्ञमंडप तयार करविला. च्यवनानें शर्यतीकडन यज्ञ करविला त्यांत सर्वच गोष्टी विलक्षण होत्या. च्यवनानें अश्विनीकुमारांना अवदान दिलें. त्याला इन्द्रानें प्रतिबंध केला असतां तो म्हणाला; हे देवांचे वैद्य असल्यानें यज्ञभागाला अयोग्य आहेत. च्यवन ह्मणाला; ज्यांनीं मला देवाप्रमाणें रूपद्रव्यतेजानें युक्त केलें त्यांविषयीं असें ह्मणूं नकोस. तूं ही भेददृष्टि कां ठेवतोस, देवांहून त्यांचें कोणतें भिन्नत्व आहे. इन्द्र म्हणाला; ते इच्छित रूप धारण करून मृत्युलोकीं फिरतात व चिकित्सा कर्म करतात म्हणून ते यज्ञभागाला योग्य नाहींत. शंकर म्हणाले; हे पार्वती ! जेव्हां इंद्र फिरून फिरून हेंच बोलूं लागला तेव्हां त्याला न जुमानतां च्यवनानें अश्विनीकुमारांना अवदान दिलें. अश्विनीकुमार हविर्ग्रहण करीत आहेत असें पाहून इंद्र च्यवनाला म्हणाला तूं जर ह्यांना अवदान देशील तर मी तुजवर वज्र मारीन. लागलींच च्यवनानें अवदाम देण्याला हात वर केला त्याबरोबर इन्द्रानें च्यवनावर वज्र फेंकलें. च्यवनानें इन्द्राचा हात स्तंभित केला; व खुशाल अवदान दिलें. तें अवदान इन्द्राचा नाश करावा ह्या उद्देशानें दिलें असल्यानें लागलींच कुंडातून एक अतिशय विशाल असा मदनामक महासुर उत्पन्न झाला त्याच्या जबड्याचा खालचा ओंठ जमिनीला व वरचा स्वर्गाला लागला होता. शंभर योजनें लांबीचे चार सुळे चोहोंकडे पसरले होते. त्याचें सर्व रूप इतकें विशाल व अक्राळविक्राळ होतें कीं, त्याचें बरोबर वर्णन करणें अशक्य

आहे. तो भयंकर टाळा पसरून जिभोळ्या चाटीत इन्द्राच्या अंगावर चालून गेला व इतकी भयंकर किंकाळी फोडली कीं, त्यासरशा सर्वांच्या कानटाळ्या बसून गेल्या. त्याला अंगावर येत असलेला पाहून घाबरलेला इन्द्र च्यवनाला म्हणाला; हे अश्विनीकुमार यज्ञभागाला योग्य आहेत. हे महर्षे! आपण कराल तें कधींही खोटें असणार नाहीं. आज अश्विनीकुमारांना यज्ञभाग दिल्यानें आपली कीर्ति झालीच आहे, परंतु शर्यातीच्या संबंधांत तुझ्या कीर्तींत अतिशय भर पडेल. तूं मजवर कृपा कर. हें ऐकून च्यवनाचा कोप शांत झाला व त्यानें महासुराचे दोन भाग करून मद्यपान व स्त्री ह्या दोहोंच्या ठिकाणीं त्याची स्थापना केली; इन्द्राला हविर्भाग देऊन संतुष्ट केलें. यथाविधि शर्यातीचा यज्ञ समाप्त करून आपलें वीर्य प्रकट करणारा च्यवन सुकन्येसह आनंद भोगीत राहिला. तेथें च्यवनानें लिंग स्थापन केलें, त्याला च्यवनेश्वर म्हणतात. त्याची पूजा करणाराला अश्वमेधाचें फळ मिळतें. म्हणूनच वालखिल्य व वैखानस ऋषी च्यवनेश्वराजवळ तीर्थावर रहातात. येथें अश्विनी पौर्णिमेला श्राद्ध केलें असतां कोटितीर्थाचें फळ मिळतें. ह्या कथा ऐकल्यानें जन्मांतल्या सर्व पातकाचा नाश होतो. नंतर अश्विनीकुमार व च्यवन ह्यांनीं स्नान केलेल्या सुकन्या सरोवराला जावें. त्या सरोवरापासून सुकन्येला कामसुख लाभलें म्हणून त्याला सुकन्यासरोवर म्हणतात. तेथें स्नान करणाऱ्या स्त्रीचें घर सात हजार जन्म पावेतों नांदतें रहातें. व तिचा नवरा कधींही आंधळा, दरिद्री अवयवानें कमी होत नाहीं.

---

## अध्याय २८६ ते २८९ वा.

### न्यंकुमतीश्वरीप्रमुखस्थानमाहात्म्य.

नंतर फिरून न्यंकुमतीला जावें. तेथें गोष्पदतीर्थावर गयाश्राद्ध करावें. तेथून वराहाचें दर्शन करून हरिगृहक्षेत्राला जावें. तेथें समुद्रसंगमावर स्नान करून मातृपूजन करावें. तेथून पूर्वेला अगस्त्याचा क्षुधाहर नामक आश्रम आहे. तेथें पूर्वी अगस्त्यानें इल्वल व वातापि ह्यांचा नाश करून तें स्थान ब्राह्मणांना दिलें. हा अगस्त्याश्रम फार सुंदर व सर्व पातकाचा नाश करणारा आहे. पार्वती म्हणाली; तो वातापि इतका बलिष्ठ कसा झाला व अगस्त्याला राग येऊन त्यानें त्याचा नाश कसा केला. शंकर म्हणतात; मणिमती नगरींत इल्वल नांवाचा दैत्य राज्य करीत असे. वातापि हा त्याचा धाकटा भाऊ होता. तो एका तपस्वी

ब्राह्मणाला म्हणाला कीं, मला एक इंद्रासारखा पराक्रमी मुलगा व्हावा. त्या ब्राह्मणाची त्याला तसा मुलगा देण्याची इच्छा नव्हती, म्हणून ब्राह्मण त्याजवर रागावला. तेव्हां इल्वल आपल्या भावासह प्रभासास आला. त्यांना इच्छिलें रूप धारण करतां येत असे. वातापि मेंढ्याचें रूप धारण करी, इल्वल त्याचें पक्वान्न तयार करून ब्राह्मणाला भोजन घाली. फिरून हांक मारतांच ब्राह्मणाचें पोट विदारण करून वातापि बाहेर येत असे. असा त्यांनीं तडाखा चालविला, तेव्हां भयभीत झालेले ब्राह्मण अगस्त्याकडे गेले व त्यांनीं हें वर्तमान अगस्त्याला सांगितलें व ते म्हणाले; ह्या संकटांतून तूं आमचें रक्षण कर. अगस्त्य प्रभासास आला व त्यानें हें सर्व पाहिलें. तेव्हां इल्वलानें वातापीला मेंढा करून त्याचें उत्तम अन्न तयार केलें होतें. अगस्त्यानें भोजन मागितलें व तो अघोरमंत्राचा जप करून आसनावर बसला. त्याच्यापुढें इल्वलानें शंभर हात प्रमाणाचा अन्नाचा ढीग केला. अगस्त्यानें समुद्रप्राशनाच्या वेळेप्रमाणें विशालरूप धारण केलें व त्या अन्नाचे दोनच घास केले. नंतर इल्वलानें रोजच्याप्रमाणें वातापीला बोलावलें, परंतु अगस्त्यानें त्याचें पचन केलें होतें. नंतर इल्वलाचेंही अगस्त्यानें भस्म करून टाकलें. तेव्हां हाहाकार करीत बाकीचे दैत्य पळून गेले. अगस्त्यानें तें द्रव्य सांचविलेलें स्थल ब्राह्मणांना दिलें. तेथें दैत्यांनीं अगस्त्याची क्षुधा शांत केली; म्हणून त्या स्थळाचें नांव क्षुधाहर पडलें. त्याच्या पश्चिमेकडे जवळच गंगेनें स्थापिलेला गंगेश्वर आहे. पूर्वीं अगस्त्यानें वातापीला खाल्ल्यानें झालेलें पातक क्षालन करण्याकरितां गंगेला बोलविलें. तेव्हां गंगेनें येऊन अगस्त्यमुनीचें पाप क्षालन केलें व ती तेथेंच राहिली. गंगेचें स्नान, दान, जप व गंगेश्वराचें दर्शन केल्यानें अभक्ष्यभक्षणापासून लागलेलें पातक नष्ट होतें. नंतर अगस्त्याश्रमाच्या उत्तरेस जवळच असलेल्या पापनाशक बालार्कांला जावें. सूर्यानें बाल्यावस्थेंत तेथें तप केलें म्हणून त्याला बालार्क म्हणतात. रविवारीं बालार्काचें दर्शन केल्यानें कुष्ठरोग नष्ट होतो; व मुलांना रोग होत नाहीं. नंतर पूर्वेकडे जवळच असलेल्या अजापालेश्वरीला जावें. रघुवंशांत उत्पन्न झालेल्या अजापाल नामक राजानें पापरोगनाशक अशा देवीचें तेथें आराधन केलें; व अजरूप रोगांचा नाश केला. त्यानें तेथें देवीची स्थापना करून तिचें नांव अजापालेश्वरी ठेविलें; जो तिचें तृतीयेला यथाविधि पूजन करितो त्याला बल, बुद्धि, कीर्ति, विद्या व सौभाग्य प्राप्त होतात. नंतर अगस्त्यस्थानापासून पूर्वेस चार कोस असलेल्या बालादित्याला जावें. त्याच्या दक्षिणेला दोन कोस सपाटक्षेत्र बालार्क ह्या नांवानें प्रसिद्ध आहे. तेथें विश्वामित्रानें तीन शिवलिंगें व एका सूर्याची स्थापना करून आराधन केलें, त्यानें विद्येचें आराधन केलें व त्याला सिद्धि झाली. त्या सूर्याला बालादित्य असें म्हणतात. पापनाशक

अशा त्या सूर्याचें दर्शन घेतल्यानें मरणापर्यंत दारिद्र्य येत नाहीं, त्याच्या दक्षिणेला दोन कोसांवर पातालगंगा आहे. तिला विश्वामित्रानें स्नानाकरितां आणिली, तिजमध्यें स्नान केल्यानें सर्व पातक नष्ट होतें, तेथें विश्वामित्रेश्वर, वालेश्वर व गंगेश्वर ह्यांचें दर्शन केल्यानें सर्व हेतु पूर्ण होतात.

---

## अध्याय २९० वा.

---

### कुबेरेश्वरमाहात्म्य.

नंतर कुबेरस्थानाला जावें. येथें पूर्वी कुबेराला सिद्धि झाली व कुबेर सर्व द्रव्याचा धनी झाला. तेथें एक चोरटा ब्राह्मण रहात असे. तो माझ्या भक्तीनें धनद झाला. पार्वती म्हणाली; तो ब्राह्मण असून चोरटा कसा झाला, व कुबेरत्व कसें पावला, तें सर्व शिवमाहात्म्य तुला सांगतों. प्रभासक्षेत्रांत न्यंकुमतीच्या तीरीं देवशर्मा नांवाचा ब्राह्मण प्रसिद्ध होता. तो घरदार, बायकोपोरें ह्यांतच निमग्न असे. एकदां त्याला धनलोभ उत्पन्न झाला; व तो कुटुंब सोडून पैशाकरितां पृथ्वीवर भटकूं लागला. त्याची बायको घरांतून निघून कामचारिणी झाली. तिला शूद्रापासून एक मुलगा झाला. तो अतिशय दुष्ट व उच्छृंखल झाला. त्याचें नांव दुःसह, तो अतिशय व्यसनी झाला, तेव्हां बंधुजनांनीं त्याचा त्याग केला. त्यानें ऐकेदिवशीं सायंकाळीं शंकराच्या देवळांत प्रदोषपूजेकरितां ठेविलेलें सामान पाहिलें; व तें चोरून नेण्याकरितां तो देवळांत शिरला. देवळांतला दिवा मालवावयाच्या बेतांत आला होता; म्हणून त्यानें द्रव्य शोधण्याकरितां त्या दिव्यावर वात घातली. इतक्यांत देवपूजा करणारा जागा झाला; व हा कोण शिरला आहे असें म्हणून परिघ घेऊन त्याच्या अंगावर गेला. तो मरणाच्या भयानें तेथून पळाला पण त्याला आपल्या जन्मकर्माविषयीं फार दुःख झालें. तो पळून जात असतां गस्तवाल्यांनीं त्याला ठार केलें. तो गांधारदेशांत दुर्मुख नांवानें प्रसिद्ध राजा झाला. तो नेहमीं नाचतमाशांत व वेश्यासंगतींत निमग्न असे. त्याचें वर्तन अतिशय अधर्मी व प्रजेला उपद्रव करणारें असे; परंतु तो त्या देशांतल्या राजांनीं पुजलेल्या शिवलिंगाची यथाविधि पूजा करीत असे; व पुष्कळ देवळांत दिवे लावी. तो एकदां शिकारीच्या नादानें प्रभासक्षेत्राला गेला. येथें न्यंकुमतीच्या तीरीं शत्रूंनीं त्याचा नाश केला. त्याला शिवपूजा घडल्यानें त्याचें पातक नष्ट झालें व तो विश्रव्याच्या पोटीं प्रसिद्ध असा पुत्र झाला. तो सर्व यज्ञांचा मालक व उत्तम शीलवान् झाला. त्यानें उत्तम स्तोत्रानें शंकराची आराधना केली. त्याला शंकर प्रसन्न झाला व

त्यानें त्याला तीन वर दिले. ते तीन वर हे शंकराचें सख्य, दिक्पालत्व, व धनाधिपत्व असे होते. शंकर कुबेराला, म्हणाले तूं ह्या त्र्यंकुमतीच्या कांठीं माझें लिंग स्थापून आराधन केलेंस, म्हणून ह्या रम्य शहराचें नांव कुबेरनगर. व लिंगाचें नांव सोमनाथ असें पडेल.

---

## अध्याय २९१ ते २९६ वा.

### भद्रकालीप्रमुखदेवतामाहात्म्य.

कुबेरनगराच्या उत्तरेला वांछितार्थ देणारी भद्रकाली देवी आहे. दक्षयज्ञाचा विध्वंस झाल्यावर वीरभद्रासह देवी तेथें राहिली. चैत्र शुक्ल तृतीयेला ह्या भद्रकालीची पूजा केल्यानें नव कोटि चामुंडांच्या पूजेचें पुण्य मिळतें व सौभाग्य, संपत्ति आणि विजय प्राप्त होतो. कुबेरनगराच्या उत्तरेला भद्रकालीनें सूर्याची स्थापना केली आहे. सप्तमीचे दिवशीं तांबड्या फुलांनीं त्याची पूजा केली असतां कोटियज्ञांचें फळ मिळतें; व पूजा करणारा वातपित्तजन्य रोगांपासून मुक्त होतो. तेथें यात्रा पुरी होण्याकरितां घोडा दान द्यावा. कुबेरनगराच्या नैर्ऋत्येला सर्व दारिद्र्य नाश करणारा कुबेर आहे. त्याच्याजवळ मरकादिक नवनिधि आहेत. त्याची पंचमीच्या दिवशीं षोडशोपचार पूजा केल्यानें द्रव्यनिधि प्राप्त होतो. नंतर कुबेराच्या पूर्वेकडे दहा कोसांवर पुष्कर आहे तेथें जावें. तेथें कैवर्ताला सिद्धि झाली. त्याला सिद्धि कशी झाली तें सविस्तर सांगा, अशी पार्वतीनें प्रार्थना केली असतां शंकर म्हणाले. ही स्वारोचिष मन्वंतरांतली हकीकत तुला सांगतों. कोणी एक दुराचारी मासे मारणारा कोळी होता, तो एकदां पुष्कराला गेला. तेथें त्यानें सुंदर प्रदेशांत एक शिवलिंग पाहिलें. त्याचें जाळें भिजून जड झालें होतें; व थंडीनें कुडकुडला होता, म्हणून उन्ह खाण्याकरितां देवळावर चढला. त्यानें आपलें जाळें सुकण्याकरितां देवाच्या विशाळ काठीवर टाकलें. तो तेथून धडधडला व शिवक्षेत्रीं त्याला मृत्यु आला. त्याच्या जाळ्याचा देवळावर ध्वज लागला त्या पुण्यानें तो पुढल्या जन्मीं राजा झाला. त्याचें नांव ऋतध्वज असें होतें. त्यानें अनेक सुखोपभोग भोगले; परंतु देवळावर ध्वज लावण्यापेक्षां दुसरें कोणतेंही पुण्यकर्म केलें नाहीं. त्याला पूर्वजन्मीची आठवण होती. तो प्रभासाला आला व तेथें त्यानें देवळावर जाळ्याचें निशाण पाहिलें. त्यानें अजोगंध नांवाचें देवळ बांधलें व त्याला पुष्कळ सरंजाम करून दिला. तो

त्या लिंगाची नेहमीं पूजा करीत असे. त्यानें दहा हजार वर्षें राज्यसुख भोगलें व तो कैलासाला गेला; म्हणून पुष्करांत स्नान करून त्या लिंगाची पूजा करावी. ज्याठिकाणीं ब्रह्मदेवानें सर्व तीर्थें पुष्करांत आणली व पूर्ण दक्षणा देऊन मोठें यज्ञ केले, त्याच्याजवळ अजोगंधाची स्थापना केलेली आहे. तेथें सोन्याचें कमळ ब्राह्मणाला दान द्यावें. अजोगंधाची यथाविधि पूजा केल्यानें सात जन्मांतलें पातक नष्ट होतें. त्याच्या ईशान्येला दहा कोसावर इन्द्रस्थान आहे. त्याच्या उत्तरेस चंद्रसरोवर आहे. त्याचें पाणी म्हातारपण व दारिद्र्य यांचा नाश करतें. त्याचें पाणी पौर्णिमेला वाढतें व अमावास्येला नाश पावतें. पापयुगांतसुद्धां हा चमत्कार दिसतो. पूर्वी अहिल्येच्या प्रसंगानें घडलेलें पाप व गौतमाचा शाप ह्यांना भ्यालेला इन्द्र येथें आला व त्यानें येथें इंद्रेश्वर नामक लिंग स्थापन करून मोठमोठ्या दक्षिणा देऊन अनेक यज्ञ केले. चंद्रतीर्थांत स्नान करून पितृतर्पण करावें व इन्द्रेश्वराचें पूजन करावें, म्हणजे प्राणी सर्व पातकांतून मुक्त होतो. तेथून आग्नेयेला चौदा कोसांवर देवकुल स्थान आहे. पूर्वी लिंगपतन झालें असतां तेथें ऋषींचा व देवांचा संगम झाला म्हणून त्याला देवकुल म्हणतात. त्याच्या पश्चिमेला सर्व-पापनाशक ऋषितोया नदी आहे. ती ऋषींना फार प्रिय आहे. तिच्यांत स्नान करून पितृतर्पण करावें. त्यानें पितरांचीं हजारों वर्षेंपर्यंत तृप्ति होते. आषाढी अमावास्येला तेथें जें सोनें, कृष्णाजिन, धोंगडी वगैरे दान केलें जातें त्याचें फल पौर्णिमेपर्यंत सोळापट मिळतें व सात जन्मांतलें पातक नष्ट होतें.

---

## अध्याय २९७ वा.

—:0:—

### गुप्तप्रयागमाहात्म्य.

पार्वती म्हणाली; तिला ऋषितोया हें नांव कसें मिळालें; व ती देवदारुवनांत फिरून कशी आली, हें सर्व माहात्म्य मला सविस्तर सांगा. शंकर म्हणाले, देव-दारुवनांत हजारों महातपस्वी ऋषि रहातात. ते रहात असतां त्यांची संतति पुष्कळ वाढली व काळही फार लोटला. त्यांची वस्ती दारुकाच्या भोंवती असे. त्या सर्वांचा असा विचार झाला कीं, चांगली समुद्राला मिळणारी नदी असल्याशिवाय आपलीं नित्यकर्में प्रशस्त होणार नाहींत; म्हणून आपण ब्रह्मदेवाकडे जाऊन त्याची प्रार्थना करावी. असा विचार ठरवून ते ब्रह्मदेवाकडे गेले; व त्यांनीं ब्रह्मदेवाची स्तुति केली. स्तोत्र श्रवण करून ब्रह्मदेव प्रसन्न

झाला; व त्यांचा सत्कार करून म्हणाला; मी प्रसन्न आहें, तुम्ही वर मागा. ऋषि म्हणाले; आम्हांला स्नानाकरितां पुण्यकारक नदी पाहिजे, तरी ती आपण आम्हांला द्या. ब्रह्मदेवानें पाहिलें तों त्याजपुढें सर्व नद्या मूर्तिमंत होत्या. त्या सर्वांना पृथ्वीवर जाण्याविषयीं उत्कंठित पाहून ब्रह्मदेवानें त्या सर्वांना आपल्या कमंडलूंत ठेविलें; व म्हणाला; ऋषीकरितां तुम्ही सर्वही पृथ्वीवर जा. एक पाठविल्यानें बाकीच्यांना रुसायला नको; म्हणून मी सर्वांनाच पाठवितों. शंकर म्हणतात; ह्याप्रमाणें सर्वांना सांगून ब्रह्मदेव ऋषींना म्हणाला; ह्या सर्वांना घेऊन जा व ह्या नदीचें नांव ऋषितोया असें ठेवा. ऋषींनीं आनंदोत्सवानें तिला आणिली व ती पूर्वसमुद्राला मिळणारी झाली. हिचें उदकपान करणारे धन्य आहेत. तिच्यांत टाकलेल्या अस्थि सहा महिन्यांत लीन होतात, ती प्रातःकाळीं गंगा, सायंकाळीं यमुना व दोनप्रहरीं हजारो नद्यांनीं युक्त अशी सरस्वती असते. असें जाणून स्नान व श्राद्ध करणाराला त्याचें फळ मिळतें. ऋषितोयेच्या पश्चिमेला दोन कोसांवर संगालेश्वर आहे. येथें गुप्तप्रयाग असून त्रिवेणी-संगम आहे. तेथें दुसरीही तीर्थें आहेत. तेथें स्नान केल्यानें सर्व पातकांतून मुक्तता होते. पार्वती म्हणाली; तेथें संगालेश्वराजवळ गंगादि नद्या, तीर्थराज प्रयाग व अन्यहीं तीर्थें कशीं आलीं व त्या लिंगाचें संगालेश्वर हें नांव कसें पडलें. शंकर म्हणतात; पूर्वीं लिंगपतनसमयीं साडेतीन कोटि तीर्थें व तीर्थराज हे आले. सर्व तीर्थांमध्यें प्रयाग लपून राहिला. तेथें सर्व देवही आले; व त्यांनीं तीर्थांत लपलेल्या प्रयागाला जाणिलें. लिंगपतन झालेलें ऐकून देव अति दुःखी झाले. इतक्यांत आनंद नष्ट झालेला रुद्रही येथें आला; व म्हणाला; ब्रह्मादिक देवहो! ऋषिशापानें माझें उत्तम लिंग पतन पावलें आहे; म्हणून मनोरथ पूर्ण होण्याकरितां तुम्ही लिंगाची पूजा करा. असें म्हणून महादेव येथेंच राहिला. तेथें ब्रह्मादि देवांचीं तीन कुंडें आहेत. चवथें कुंड नदीसंगम नांवाचें आहे. त्यांत सर्व नद्यांचा संगम आहे ब्रह्मकुंडांत गंगा, यमुना, सरस्वती व एक कोटि तीर्थें आहेत. विष्णुकुंडांतही एक कोटि तीर्थें आहेत, आणि बाकीचीं दीड कोटि तीर्थें रुद्रकुंडांत आहेत. पश्चिमेला ब्रह्मकुंड, पूर्वेला विष्णुकुंड व मध्यें रुद्रकुंड आहे. या दोन कुंडांतून निघून गंगा यमुनेला मिळाली आहे. त्याला त्रिसंगम म्हणतात. ह्या दोन कुंडांच्यामध्यें जेथें सरस्वती गुप्त आहे, त्या ठिकाणीं नेहमीं प्रयागाचें वास्तव्य आहे. जो मनुष्य माघ महिन्यांत मकरराशीला सूर्य आला असतां येथें सूर्योदयीं स्नान करतो त्याचें एका स्नानानें मानसिक पाप नष्ट होतें. दुसऱ्या स्नानानें वाणीनें घडलेलें व तिसऱ्या स्नानानें शरीरानें घडलेलें पाप नाश पावतें. चवथ्या स्नानानें सांसर्गिक

व पांचव्यानें एकांतांतील पाप तसेंच सहाव्यानें उपपातकें नष्ट होतात. सात स्नानांनीं सर्वही महापातकांचा नाश होतो. जो गुप्तप्रयागीं महिनाभर स्नान करतो त्याचें पुण्य ब्रह्मदेवसुद्धां वर्णन करूं शकत नाहीं. प्रभासांतील सर्व तीर्थांत हें श्रेष्ठ आहे. त्या तीर्थाच्या रक्षणाकरितां तेथें वद्य चतुर्दशीला प्रेत, भूत व मातृका यांसह माझी पूजा करावी. ह्या तीर्थांत स्नान करणाराचें ब्रह्महत्येपासून घडणारें पातक नष्ट होतें. येथें श्राद्ध करणाराचे पितर उद्धरून जातात. तेथें यात्रा सफल होण्याकरितां बैल दान द्यावा. अशी यात्रा करणाराला मिळणारें फळ अनंत असतें. हें तुला गुप्तप्रयागाचें महात्म्य सांगितलें. हें श्रद्धापूर्वक ऐकणाराला शिवलोकप्राप्ती होतें.

---

## अध्याय २९८ ते ३०३ वा.

### माधवादिमाहात्म्य.

त्याच्या दक्षिणेस जवळच शंखादि आयुधें धारण केलेला माधव आहे. शुक्ल एकादशीस जितेंद्रिय राहून उपवास करावा व माधवाची षोडशोपचारें पूजा करावी, त्यानें पुनर्भव चुकणारें मोक्षपद मिळतें. ह्याविषयीं पूर्वीं ब्रह्मदेवानें असें ह्मटलें आहे कीं, जो विष्णुकुंडांत स्नान करून माधवाचें पूजन करतो, त्याला वैकुंठप्राप्ती होते. हें विष्णूचें सर्व मनोरथ पूर्ण करणारें माहात्म्य तुला सांगितलें. ह्याच्याच उत्तरेला किंचित् वायव्येकडे संगालेश्वर नामक लिंग आहे. त्याची ब्रह्मदेव, विष्णु, इंद्र, वरुण, कुबेर, यमधर्म, अग्नि, आदित्य वसु, लोकपाल ह्या सर्वांनीं आराधना केली आहे. त्या सर्वांनीं त्याची पूजा करून असें माहात्म्य गाइलें किं, देवसमूहांनीं आनंदित होऊन ह्याची स्थापना केली; ह्मणून ह्याचें नांव संगालेश्वर असें आहे, ह्याची पूजा करणाराच्या कुळांत कधींही निर्धन पुरुष होणार नाहींत. कुरुक्षेत्रांत हजार गाई दान केल्यानें मिळणारें फल संगालेश्वराच्या दर्शनानें मिळतें. जो अमावास्येला संगालेश्वरीं नियमस्थ राहून यथाविधि-श्राद्ध करतो त्याचे पितर प्रलयकाळापर्यंत तृप्ति पावतात. हें पापनाशक व कामपूरक क्षेत्र अर्धकोश विस्तृत आहे. ह्या क्षेत्रांत कोणताही प्राणी मृत्यु पावला असतां सद्गतीला जातो. जें येथें अनशन व्रत धारण करून प्राण सोडतात ते परमात्म्यांत लीन होतात. कोणत्याही अपघातानें मेलेल्या प्राण्याचीं येथें सोळा-श्राद्धें करून वृषोत्सर्ग व ब्राह्मणभोजन केलें असतां तो मुक्त होतो. असें ह्मणून देव स्वर्गाला गेलें. हें संक्षेपानें सांगितलेलें संगालेश्वराचें माहात्म्य दुःख-

शोकाचें नाशक आहे. नंतर त्याच्या पूर्वेकडे जवळच असलेल्या श्रेष्ठ अशा सिद्धेश्वराला जावें. जेव्हां देवांनीं संगालेश्वराची स्थापना केली तेव्हांच सिद्धांनीं सिद्धेश्वर स्थापिला. सिद्धांनीं अनेक स्तोत्रांनीं महादेवाची प्रार्थना केली; तेव्हां तो प्रसन्न होऊन ह्मणाला मी तुह्माला; प्रसन्न आहे; वाटेल तो वर मागा. सिद्ध ह्मणाले, जो ह्या ठिकाणी यथाविधि स्नान करून सिद्धिनाथाचें पूजन करील व शतरुद्रीय, अघोर मंत्र अथवा गायत्रीमंत्र ह्यांचें अनुष्ठान करील त्याला सहा-महिन्यांत सिद्धि व्हावी. शंकर ह्मणतात; असा वर देऊन महादेव अन्तर्धान पावला. जो आश्विन कृष्ण चतुर्दशीला मध्यरात्रीं धैर्यानें अघोरमंत्राचा जप करतो त्याला सिद्धि होते. हें सिद्धेश्वराचें माहात्म्य सांगितलें. नंतर त्याच्याच उत्तरेला वीस हातांवर असलेल्या गंधर्वेश्वराला जावें. त्याचें दर्शन करणारा सुस्वरूप होतो. स्नान करून गंधर्वेश्वराची पूजा करणाराचे सर्व हेतु पूर्ण होतात; व आवाज मधुर होतो, नंतर पापनाशक उत्तरेश्वराला जावें. त्याच्या पश्चिमेला बारा हातांवर शेषादिनागांनीं स्थापन केलेलें लिंग आहे त्याचें पूजन करणाराला सर्व जन्मांत सापाचें विष बाधत नाहीं. त्याला सर्प प्रसन्न रहातात, व चावत नाहींत ह्मणून त्याची पूजा करावीं. तेथें पुण्यक्षेत्र अशा गंगातीरीं ऋषींनीं अनेक लिंगें स्थापन केलीं आहेत. त्याच्या दर्शनानें सर्व पाप नष्ट होऊन हजार अश्वमेधाचें फळ मिळतें.

---

## अध्याय ३०४ वा.

### संगालेश्वरगंगामाहात्म्य.

नंतर संगालेश्वराच्या ईशान्येला अठ्ठावास हातांवर असलेल्या गंगेला जावें. त्या तीर्थांत अद्यापि तीन डोळ्यांचे मासे आहेत. तेथें स्नान केल्यानें पंच-महापातकांचा नाश होतो. सूत म्हणताल; हें ऐकून आश्चर्यचकित झालेली पार्वती शंकराला म्हणाली; येथें गंगा कां आली व तेथल्या माशांना तीन डोळे कां आहेत ? हें मला विस्तारानें सांगा. शंकर ह्मणाले; आस्तिकांना श्रद्धा असते. जेव्हां अज्ञानांध ऋषींनीं कांहीं कारणानें रागावून महादेवाला शाप दिला, तेव्हां महादेवाच्या शापानें सर्व जग आनंदरहित झालेलें पाहून त्यांनीं शंकराची आराधना केली; व त्याला आनंदित केले. शंकर जरी प्रसन्न झाले तरी आपण महादेवाचा मोठा द्रोह केला आहे, असें ऋषींना वाटलें; म्हणून त्यांनीं संगालेश्वरीं येऊन तप आरंभिलें. भृगु, अत्रि, मार्कं, कश्यप, कण्व,

गौतम, कौशिक, कुश, महातपा, शूकर, भरद्वाज, भार्गवी, जातूकर्ण्य, वसिष्ठ, सावर्णि, पराशर, शांडिल्य, पुलस्त्य, वत्स इत्यादिक मोठमोठे असंख्य ऋषि संगालेश्वरीं लिंग स्थापन करून तप करूं लागले. त्यांना शंकर प्रसन्न न होतां त्या प्रत्येकाला एकेक तिसरा डोळा उत्पन्न झाला; व ते एकमेकांकडे शंकराच्या शंकेनें पाहूं लागले. त्यांनीं स्तोत्रें गाऊन शंकराची आराधना चालविली. अशी अतिशय उपासना घडल्यावर शंकर प्रसन्न झाले व म्हणाले; मी तुम्हाला प्रसन्न आहें. इच्छित वर मागा. ऋषि म्हणाले; आपण प्रसन्न होऊन आम्हांला वर देतां तर स्नानाकरितां गंगा द्या. तिच्या स्नानानें आम्हीं आपणाशीं केलेल्या द्रोहानें घडलेल्या पातकांतून मुक्त होऊं. महादेव म्हणाला; तुम्ही पवित्रच आहांत तरी तुमच्या संतोषाकरितां मी गंगा आणितों. तुम्हीं पवित्र झाल्यानेंच तुम्हांला त्रिनेत्रत्व प्राप्त झालें आहे. असें म्हणून शंकरानें गंगेचें चिंतन केलें. स्मरण करितांच गंगा मीनादिजलचरांसह पृथ्वीचें विदारण करून खळखळ वाहूं लागली. ऋषींनीं गंगेचें दर्शन करण्याबरोबर गंगेतले मासे त्रिनेत्र झाले, महादेव ऋषींना म्हणाले; तुमचें दर्शन झाल्याबरोबर गंगेंतले मासे त्रिनेत्र झाले हें सर्व लोकांना प्रदर्शन घडलें. ऋषि म्हणाले; आपल्या कृपेनें ह्या कुंडांतल्या माशांची संतति नेहमीं त्रिनेत्र व्हावी. जो अमावास्येला ह्या कुंडांत स्नान करून सोनें, गाय व वस्त्र दान देईल तो त्रिनेत्र व्हावा. बरें तसें होईल, असें म्हणून शंकर अंतर्धान पावले; व ब्राह्मण संतुष्ट होऊन आनंद पावले.

---

## अध्याय ३०६ वा.

### नारदादित्यमाहात्म्य.

नंतर गंगेच्या पूर्वेकडील म्हातारपण व दारिद्र्य नष्ट करणाऱ्या नारदादित्याला जावें. मूलचंडीशाच्या पश्चिमेकडे बाराशें हातावर नारदाला सूर्याच्या आराधनानें सिद्धी झाली; व तो जरेंतून मुक्त झाला. पार्वती म्हणाली; नारदाला वार्धक्य कां प्राप्त झालें; व त्यानें सूर्याची आराधना कशी केली हें मला सांगा. शंकर म्हणाले, जेव्हां नारद द्वारकेला आला तेव्हां त्यानें कृष्णाचे सर्व बलवान् पुत्र पाहिले. मुलगे राजवाड्यांत खेळत होते, त्यांनीं नारदाला येत असलेला पाहून लवून नमस्कार केला, पण फक्त सांबानें नमस्कार केला नाहीं. तेव्हां नारदानें सांबाला शाप दिला कीं, तूं शरीरमदानें उन्मत्त आहेस म्हणून तुला लवकर भयंकर शाप

होईल. सांब म्हणाला, ऋषींना नमस्कार कशाला पाहिजे. उलट आशीर्वाद दिल्यानें त्यांच्या तपाची हानी मात्र होते. नारदा! ऋषींचा स्वभाव तुझ्यामध्यें बिलकुल नाहीं. तूं ब्रह्मपुत्र आहेस दुसरें काय सांगावें. तुला नाहीं बायको ना पोर, नाहीं गाई नी वासरें, ना घर ना दार. ब्रह्मदेवाला मानसिक पुत्र झालास; आणि ब्रह्मचारीच राहिलास. असो. परंतु असले चाळे तुला कसे आठवतात. तुला युद्ध उपस्थित केल्याशिवाय व तंटा लावल्याशिवाय चैनच पडत नाहीं. नेहेमी तुझ्या कानीं कसलें तरी भांडण पाहिजे. स्नान, संध्या, जप, होम, देवपितृतर्पण हीं ब्राह्मणांचीं कर्में निराळीं व नारदाचीं निराळींच. पोरपणासून गर्विष्ठ असलेला तूं जर मला शाप देतोस तर तूंही अतिशय म्हातारा होशील. सांबानें असा शापिलेला नारद कंटकास्थिवर्जित निर्मळस्थानीं कृष्णाजिन हातरून ऋषितोयेच्या कांठीं बसला. त्यानें सूर्याची सुंदर प्रतिमा स्थापन केली व अनेक स्तोत्रांनीं आराधन चालविलें. सूर्य प्रसन्न होऊन त्यानें नारदाला प्रत्यक्ष दर्शन दिलें व म्हणाला; नारदा! मी तुला प्रसन्न आहे, तुला वाटेल तो वर माग. दुर्लभ असला तरी तो मी देईन. नारद म्हणाला, हे भानो! जर आपण मला प्रसन्न झालांत तर माझें वृद्धत्व जाऊन माझें शरीर तरुण झालें पाहिजे. हे भगवान्! रविवारीं सप्तमी आली असतां त्या दिवशीं जे तुझे दर्शन घेतील त्यांना रोगोपद्रव होऊं नये. तसें होईल; असें म्हणून सूर्य अन्तर्धान पावला. हे पार्वती! नारदादीत्याची कथा अशी आहे.

---

## अध्याय ३०६ व ३०७ वा.

### सबांादित्यमाहात्म्य व अपरनारायणमाहात्म्य.

नंतर त्याच्या उत्तरेकडील पापनाशक सांबादित्याला जावें. तेथें सांबानें सूर्याचें आराधान केलें व सूर्यप्रसादानें सांबाचें शरीर उत्तम झालें. जेव्हां सांबाला विष्णूचा शाप झाला तेव्हां त्यानें त्याची प्रार्थना केली. तेव्हां विष्णु त्याला म्हणाला, तूं ऋषींनीं वसती केलेल्या सुंदर अशा प्रभासक्षेत्राला जा. तेथें ऋषितोयेच्या कांठीं मी सूर्यरूपानें प्रसन्न होऊन तुला वर देईन. असे सांगितल्यावर सांब प्रभासाला गेला. त्यानें सूर्याची स्थापना करून आराधन मांडिलें. सूर्य प्रसन्न होऊन सांबाला म्हणाला, तूं ऋषितोयेच्या तीरीं जा. हें ऐकून सांब जेथें नारद तप करीत होते त्या ऋषितोयेच्या कांठीं आला. तेथें जे श्रेष्ठ ब्राह्मण होते त्यांना सांब म्हणाला; प्रभासक्षेत्रांतलें हें ब्रह्मस्थान आहे, म्हणून

येथील ब्राह्मण श्रेष्ठ आहेत. मी तुमच्या अनुमतीनें येथें सूर्याचें आराधन करतों. मला कृष्णानें हें स्थान दाखविलें आहे. तूं आराधन कर त्यावेळीं तुला सिद्धि होईल; असें ब्राह्मण म्हणाले. सांबानें अनुष्ठान सुरू केलें, सांबाला तपासक्त जाणून विष्णूनें असा विचार केला कीं, जसा ऐश्वर्य देणारा रुद्र, मुक्ति देणारा विष्णु, स्वर्ग देणारा इंद्र, शुद्ध करणारें उदक व अग्नि, विघ्ननाशक गणनायक, कवित्व देणारी सरस्वती तसा सूर्य ह्याच आरोग्य देणारा आहे. परंतु इतकें आराधन करीत असतांही सूर्य जो साम्बाला प्रसन्न होत नाहीं तो माझ्याच शापास्तव, असा विचार करून विष्णूनेंच सूर्याचें रूप धारण करून सांबाला दर्शन दिलें; व म्हणाला सांबा, तूं क्लेश करूं नकोस, मी तुला प्रसन्न आहे, इच्छित वर माग. सांब म्हणाला; हे आकाशभूषणा देवाधिदेवा! तुझ्या कृपेनें माझें शरीर कुष्ठरोगापासून मुक्त व्हावें, व तूं ह्या स्थळीं नित्य वास करावास. सूर्यरूपी विष्णु म्हणाला; सांबा तुझें शरीर स्वच्छ होईल व जो कोणी येथें येऊन रविवारीं सप्तमी आली असतां उपवास करून रात्रीं जागरण करील त्याचीं अठराही कुष्ठें समूळ नष्ट होतील, व त्याच्या कुळांत कोणालाही कुष्ठरोग होणार नाहीं. रविवारीं सप्तमीला जो स्नान करून सांबादित्याचें पूजन करतो; व जितेंद्रिय रहातो तो रोगमुक्त व पुत्रवान् होतो. त्याच्या पूर्वेस किंचित् ईशान्येला स्वच्छ उदककुंड आहे. त्याचें यथाविधि स्नान करून जो सांबादित्याचें पूजन व ब्राह्मणभोजन करतो, त्याला सर्व समृद्धि प्राप्त होतात व त्याची सूर्य लोकीं कीर्ति होते. सांबादित्याच्या पूर्वेस थोड्या अंतरावर अग्नेयेकडे अपरनारायण आहे. ह्यापेक्षां श्रेष्ठ दुसरा देव नाहीं. सांबाला सूर्यरूपानें वरदाता विष्णु तोच होय. म्हणूनच त्याला अपरनारायण हें नांव पडलें. फाल्गुन शुक्ल एकादशीला अपरनारायणाचें पूजन करणारा मुक्त होतो व त्याचे मनोरथ पूर्ण होतात.

---

## अध्याय ३०८ वा.

### मूलचंडीशोत्पत्तिमाहात्म्य.

अपरनारायणाच्या पूर्वेकडे किंचित् ईशान्येला मूलचंडीश नांवाचें शिवलिंग आहे. हे पार्वति! ज्या ठिकाणीं ऋषींच्या शापानें माझें लिंग पतन पावलें तेंच मूलचंडीश नांवानें प्रसिद्ध झालें. पार्वती म्हणाली; ऋषींना इतका राग कां आला? तें ऐकण्याची मला फार इच्छा आहे. शंकर म्हणाले; पूर्वीं मी डिंडिरूप घेऊन दारुक वनांतील ऋषींच्या पुण्याश्रमांत नग्न राहून भिक्षावृत्तीने राहिलों.

मला तशा स्थितींत पाहून ऋषींच्या स्त्रिया काममोहित झाल्या; व त्यांनीं ऋषींचा त्याग केला. तेव्हां ते ऋषि म्हणाले; कीं, ह्या डिंडीनें आमच्या सर्व स्त्रिया बिघडविल्या; म्हणून आम्ही ह्याला शाप देणार. ते म्हणाले; ह्याचें लिंग नेहमीं उत्थित असतें तें खालीं पडो, असें म्हणून त्यांनीं शापोदक सोडिलें. त्याबरोबर लिंग पतन पावलें तेंच मूलचंडीश नांवानें प्रसिद्ध झालें. ईश्वर म्हणाला; देवी-चंडी आहे, तिचा ईश मी आहें व माझें मूळ लिंग तें ह्या ठिकाणीं पतन पावलें म्हणून हें स्थळ मूलचंडीश ह्या नांवानें प्रसिद्धि पावेल. शेंकडों तलाव व विहिरी धर्मार्थ बांधल्यानें लागणारें पुण्य ह्या लिंगाच्या दर्शनानें मिळेल. किंवा सर्व ब्रह्माण्ड दान केल्यानें मिळणारें फळ मूलचंडीशाच्या दर्शनानें मिळेल. येथें सोळा दानें करावीं; म्हणजे मी सांगितल्याप्रमाणें सर्व फल प्राप्त होईल. तुम्ही दारुवनाला जा. ह्याप्रमाणें माझें वचन ग्रहण करून मुनि दारुवनाला गेले व पूर्वीप्रमाणें तप संपादन करूं लागले. ह्याकरितां हे पार्वति ! अर्धचंद्रानें सुशोभित हें मूलचंडीशलिंग पापनाशक आहे. तूं गोरसानें जेथें ऋषींना शांत केलेस, तेथें तप्तोदकनामक कुंड आहे. जो ऋषितोयेंत स्नान करून मूलचंडीशाचें पूजन करील; तो प्रचंड राज्यपद मिळवील. हें मूलचंडीशाचें माहात्म्य तुला सांगितलें.

---

# अध्याय ३०९ ते ३१६ वा.

## चतुर्मुखविनायकप्रभृतिस्थानमाहात्म्य.

नंतर मूलचंडीशाच्या उत्तरेकडील चतुर्मुखविनायकाला जावें. तें स्थान थोडें ईशान्येकडे सोळाहातावर आहे चतुर्थीला त्याची षोडशोपचार पूजा केली असतां सर्व विघ्नें नष्ट होऊन कार्यसिद्धि होते. विनायकाच्या वायव्येला आठ हातांवर सर्व पापनाशक कलंबेश्वर आहे. सोमवती अमावास्येला त्याचें पूजन केलें असतां सर्व पाप नष्ट होतें. चांगल्या फळाची इच्छा करणारानें तेथें ब्राह्मणांना भोजन घालावें. नंतर चंडीशाच्या पूर्वेकडे ऐंशीं हातांवर असलेल्या सर्व-पापनाशक व दारिद्र्यहारक गोपालस्वामीला जावें. त्यांची माघ महिन्यांत पूजा व जागरण केलें असतां परमपद प्राप्त होतें. त्यांच्या उत्तरेकडे बत्तीस हातांवर बकुलस्वामी आहे. तेथें रविवारीं सप्तमीला त्याचें दर्शन घेऊन तेथें जागरण केल्यानें सूर्यलोकीं मान्यता मिळते. त्याच्या वायव्येला चौसष्ट हातांवर उत्तरार्क आहे. तेथें निंबसप्तमी करणारा सर्वरोगांतून मुक्त होतो. देवकुलाच्या आग्नेयेला दोन कोसांवर समुद्रतीरीं सुंदर ऋषितीर्थ आहे, तेथें अद्यापि ऋषि पाषाणरूपानें आहेत. तेथें जेष्ठी अमावास्येला श्राद्ध व पिंडदान करावें. ऋषितोयेच्या संगमावर

स्नान दुर्घट आहे. तेथें दिलेलें गोप्रदान ऋषींना अति प्रिय आहे. यथाशक्ति ब्राह्मणभोजन येथें घालावें. त्यांच्या पश्चिमेकडे अर्ध्या अर्ध्या कोसावर महाप्रभा, मरुद्दार्यी देवी आहे. तिचें देवांनीं पूजन केलें म्हणून तिचें नांव मरुद्दार्या पडलें, महानवमीला व सप्तमीला मरुद्दार्येचें यथाविधि षोडशोपचार पूजन करावें. देवकुलाच्या पूर्वेला दहा कोसांवर शंबरस्थान आहे, तेथें क्षेमादित्यनामक सूर्य प्रसिद्ध आहे, त्याच्या दर्शनानें मनुष्याचें कल्याण व अर्थसिद्धि होते. रविवारीं सप्तमीला त्याचें पूजन केलें असतां सर्व हेतु पूर्ण होतात.

---

# अध्याय ३१७ ते ३१८ वा.

## कंटकशोषणीमाहात्म्य व ब्रह्मेश्वरमाहात्म्य.

नंतर देवकुलाच्या दक्षिणेकडे व उन्नताच्या उत्तरेकडे असलेल्या कंटकशोषिणी देवीला जावें. तिची उत्पत्तीची कथा अशी आहे. पूर्वीं भृगु, अत्रि, मरीचि, भरद्वाज, कश्यप, कण्व, मंकि, सावर्णि, जातूकर्ण्य, वत्स, वसिष्ठ, पुलस्त्य, पुलह, क्रतु, मनु, यम, अंगिरा, विष्णु, शातातप, पराशर, शांडिल्य, कौशिक, गौतम, गार्ग्य, दाल्भ्य, शौनक, शाकल्य, गालव, जाबालि, मुद्गल, ऋष्यशृंग, विभांडक, विश्वामित्र, शतानन्द, जह्नु, विश्वावसु इत्यादिक आणखी ही पुष्कळ ऋषि उन्नताच्या दक्षिणेकडे यज्ञ करीत होते. तें ऋषितीर्थाचें तीर देवगंधर्वांच्या गायनवादनानें व ऋषींच्या वेदघोषानें दुमदुमून गेलें होतें. चतुर्वेदपारंगत ऋषिवर्यांनीं दिलेल्या दानांनीं उत्पन्न होणाऱ्या धुराच्या सुगंधि लोटांनीं यज्ञप्रदेश दुरूनच शोभित होत होता. अशा स्थितींत यज्ञाचा विध्वंस करण्याच्या हेतूनें मायावी महाबलिष्ठ दैत्य समुद्रांतून बाहेर पडले. ते अकाळ विकाळ विद्रूप दैत्य यज्ञमंडपांत आल्याबरोबर ऋषींपैकीं कांहींजण गर्भगलित होऊन जमिनीवर पडले. कोणी पत्नीशाळेंत शिरले व कोणी हविर्धानांत पळाले. ऋत्विज तोंडांतून शब्द न काढतां जागच्या जागींच स्थिर झाले. हे पार्वति! ऋषींची अशी धांदल झालेली पाहून अध्वर्यूनें न घाबरतां राक्षसांचा नाश करण्याकरितां अग्नीमध्यें मन्त्रोच्चारपूर्वक यथाविधि अवदान दिलें. आहुति पडण्याबरोबर होमकुंडांतून शक्ति, त्रिशूल, ढाल इत्यादि आयुधें धारण केलेली महोज्ज्वल शक्ति कुंडांतून बाहेर आली; व तिनें दैत्यांचा विध्वंस उडविला. ऋषींनीं अनेक स्तोत्रांनीं त्या दैत्य

संहत्रींची स्तुति केली तेव्हां ती ऋषींना म्हणाली; मीं प्रसन्न आहें, उत्तम वर मागा. ऋषि म्हणाले असुरांना संहारून यज्ञाचें रक्षण तूं पूर्वींच केलें आहेस तथापि तूं प्रसन्न आहेस करितां येथेंच रहा. तूं दैत्यरूपी कंटकांचें शोषण केलेंस म्हणून तुझें नांव कंटकशोषिणी असो. ठीक आहे, असें म्हणून देवी अन्तर्धान पावली. जो अष्टमीला अथवा नवमीला ह्या देवीचें पूजन करील त्याला राक्षस किंवा पिशाचांपासून कधींहि उपद्रव होणार नाहीं; व त्याला सर्व सिद्धि प्राप्त होतील. कंटकशोषणीच्या पूर्वेला जवळच ब्रह्मेश्वर नामक अतिप्रभावयुक्त व सर्वपापनाशक लिंग आहे. त्याची स्थापना ब्राह्मणांनीं केली आहे. ऋषि-तोयेंत स्नान करून ब्रह्मेश्वराचें पूजन करणारा बुद्धिवान् व वेदवेत्ता होईल.

---

# अध्याय ३१९ वा.

## उन्नतस्थानमाहात्म्य.

नंतर त्याच्या उत्तरेला ऋषितोयेच्या तीरीं असलेल्या उन्नतक्षेत्रीं जावें. चंडीच्या गणांनीं रक्षिलेलें हें स्थान, हे पार्वति! मी ब्राह्मणांना दिलें. हें सुंदर स्थान विश्वकर्म्यानें तयार केलें. ह्याच्या भोंवता शेंकडों उपनगरें व खेडीं आहेत. ह्याच्या भोंवतालच्या प्रदेशाला नग्नहर म्हणतात. ह्याची लांबी व रुंदी बत्तीस कोसांची आहे येथें ईश्वर नग्न होऊन भ्रमण करीत होता म्हणून ह्याचें नांव नग्नहर पडलें. ह्याच्या पूर्वेस शांकरी व आर्या पश्चिमेस त्र्यंकुमती उत्तरेस कनक-नंदा व दक्षिणेस समुद्र आहे. ह्या चतुःसीमेंमधलें क्षेत्र नग्नहर होय. ह्या नगराचा स्वीकार करून तुम्हीं आनंदानें रहा. येथें तुमचा उत्तम चरितार्थ चालून अन्तीं सद्गति लाभेल. हें ऐकून ब्राह्मण म्हणाले, आपली आज्ञा धर्माचाराला कधींही अमान्य नाहीं. परंतु येथें आमचें कलिकालांत रक्षण कोण करील? व आम्हाला आरोग्य कसें मिळेल? ईश्वर म्हणाले; मी महाकालेश्वररूपानें येथें राहून तुमचें रक्षण करीन. उन्नत नामक विघ्नराज तुमचीं विघ्नें दूर करील. ह्या गणनाथाच्या स्वरूपानें कुबेर राहिला आहे तो तुम्हांला द्रव्य पुरवील. दुर्गा-दित्य तुम्हांला आरोग्य देईल. हें महोदय तुम्हाला आनंददायक होईल. तुम्ही ब्रह्मदेवाचें आराधन करा, तो तुमचे सर्व मनोरथ पूर्ण करून अन्तीं मुक्ति देईल. ब्राह्मण म्हणाले; जर कलियुगांतसुद्धां सर्व तीर्थें संगालेश्वरीं व देवकुलीं राहून आम्हांला पावन करतील; तरच आमचें रहाणें होईल. ईश्वरानें तोही वर त्यांना दिला; आणि तें चांदण्याप्रमाणें शुभ्र अशा सात विशाल वाड्यांनीं व अनेक

उपनगरांनीं युक्त असें नगर ब्राह्मणांना दिलें; आणि त्यांनीं विश्वकर्म्याकडे पाहिलें. विश्वकर्मा हात जोडून म्हणाला, आपल्या कृपेनें मी हें नगर तयार केलें आहे; आपण सोन्याच्या उंच प्रदेशीं जाऊन पहावें. हें ऐकून, भगवान् ऋषींसह तेथें गेले व तेथून त्यांनीं सर्व नगराचें सौंदर्य अवलोकन केलें. तेथें सर्व ऋषींनीं ईश्वराची स्तुति केली; तेव्हां महादेव ऋषींना म्हणाले, तुम्हांला वाटेल तो वर मागा. ऋषि म्हणाले, जर आपण तुष्ट होऊन वर देतां तर स्थलकेश्वर असें नांव धारण करून आपण येथें नेहमीं रहावें. हें ऐकून, परमेश्वर स्थलकेश्वर असें नांव धारण करून तेथें राहिला. तें स्थळ कृतयुगांत रत्नखचित, त्रेतायुगांत सुवर्णमय, द्वापारयुगांत रौप्यमय व कलींत पाषाणमय झालें. त्या स्थलकेश्वराचें उन्नतक्षेत्रीं राहणारांनीं नित्य पूजन करावें. माघांतल्या चतुर्दशीला तेथें अवश्य जागर करावा. हें उन्नताचें महोदयाख्यान सर्व मनोरथ पूर्ण करणारें आहे.

---

# अध्याय ३२० ते ३२३ वा.

## ब्रह्माद्यनेकलिंगमाहात्म्य.

त्याच्या पूर्वेला व किंचित् आग्नेयेस विश्वकर्म्यानें स्थापिलेलीं दोन लिंगें आहेत. नगर रचण्याच्या आरंभीं एक व रचना पुरी झाल्यावर एक अशीं दोन लिंगें त्यानें स्थापन केलीं. कोणत्याही मांगलिककार्याच्या आरंभीं व शेवटीं त्या लिंगाचें पूजन करावें म्हणजे उत्तम कार्यसिद्धि होते. म्हणून यथाविधि त्या दोन लिंगांची पूजा करावी. आतां उन्नतस्थानांत वास करणारांचें सर्व पाप क्षालन करणारें उत्तम स्थान सांगतों. अव्यक्त जन्म अशा बालरूप ब्रह्मदेवाचें जें स्थान त्याच्या दर्शनानें प्राणी सर्व पातकांतून मुक्त होतात. पार्वती म्हणाली ब्रह्मदेव; हा पितामह असल्यानें तो सर्वत्र वृद्धरूप आहे. असें असतां उन्नतांत तो बालरूप कसा? तो तेथें कोठें आहे; तेथें कशाकरितां गेला, त्याची पूजा कधी व कशी करावी. ईश्वर सांगतात; ऋषितोयेच्या पश्चिमेला व स्थलकेश्वराच्या ईशान्येला ब्रह्मस्थान ब्रह्मलोकासारखें आहे. प्रभासांत तीनही देवांची पूजा करावी. ऋषितोयेच्या कांठीं ब्रह्मभागीं ब्रह्मा, रुद्रभागीं व अग्नितीर्थीं रुद्र व रैवतकावर दामोदर आहे. सोमानें प्रार्थना केली म्हणून वृद्ध असाही ब्रह्मदेव आठ वर्षांचा होऊन उन्नतांत आला. तेथें उत्तम ऋषि आहेत, असें पाहून तो तेथें राहिला. ब्रह्मासारखा देव, गुरु, ज्ञान किंवा तप नाहीं. जोंपावेतों मनुष्य

ब्रह्मदेवाची भक्ति करीत नाहींत तोंपर्यंतच ते दुःखानें व भयानें व्याप्त असतात. जसें प्राण्याचें चित्त संसारांत आसक्त आहे, तसें जर तें ब्रह्मांत लीन होईल. तर संसारांतून मुक्त कोण होणार नाहीं ? ब्रह्मदेव परमायु आहे. त्यापैकीं परार्ध उन्नतांत गेलें. दुसरें सुरु आहे. तेथें व ह्या आठ वर्षांचा होऊन आला म्हणून त्याला बालरूप म्हणतात. अन्यस्थानीं तो वृद्धरूपच आहे. हें उन्नत-स्थान त्याला अति प्रिय आहे. ब्रह्मकुंडांत स्नान करून बालरूप ब्रह्मदेवाचें पूजन करावें. नंतर त्याच्या दक्षिणेकडील पापनाशक अशा दुर्गादित्याला जावें. जेव्हां दुर्गा दुःखी झाली तेव्हां तिनें दुःखांतून मुक्त होण्याकरितां सूर्याची आराधना केली. पुष्कळ काळानें प्रसन्न होऊन आदित्य तेजःप्रतापशाली अशा दुर्गेला म्हणाला; हे दुर्गे ! तूं वर माग मी तुला प्रसन्न आहें. त्याला दुर्गा म्हणाली; तूं मला दुःखांतून मुक्त कर. तेव्हां सूर्य दुर्गेला म्हणाला; लौकरच भगवान् त्रिपुरांतकाला उन्नतक्षेत्रांत उत्तम लिंग प्राप्त होईल. येथें मी दुर्गादित्य ह्या नांवानें प्रसिद्ध होईन. असें म्हणून आदित्य अन्तर्धान पावला. रविवारीं सप्तमीला दुर्गादित्याचें पूजन करावें म्हणजे सर्व प्रकारचीं कुष्टें नाश पावतात. नंतर दक्षिणेकडे ऋषितोयेच्या कांठीं असलेल्या क्षेमेश्वराला जावें. पूर्वीं ह्याचें नांव भूतीश्वर होतें, तें कलियुगांत क्षेमेश्वर पडलें. त्याचें दर्शन व पूजन केल्यानें प्राणी सर्व पातकांतून मुक्त होतो. त्याच्या उत्तरेकडे किंचिद्वायव्येला असलेल्या सिद्धिविनायकाचें दर्शन घ्यावें. जो माझा मित्र कुबेर म्हणून मी पूर्वीं सांगितला तोच लोकांना सिद्धि देण्याकरितां येथें सिद्धिविनायक झाला. मंगळवारीं चतुर्थीला ह्याची पूजा करून मोदकाचा नैवेद्य अर्पण करावा; म्हणजे सिद्धि प्राप्त होते. नंतर ऋषितोयेच्या कांठीं असलेल्या विघ्नविनाशक विनायकाला जावें. जो देवगणांचा स्वामी त्रिपुरांतक गजरूपानें उन्नतावर कोट्यावधि गणांसह होता. म्हणून यात्रेंत विघ्ननिवारणारितां गणनाथाचें पूजन करावें. तसेंच प्रत्येक चतुर्थीला नगरच्या लोकांनीं राष्ट्राच्या कल्याणाकारितां त्याचें पूजन करावें. नंतर त्याच्याच उत्तरेकडे असलेल्या सर्वरक्षक अशा महाकालेश्वराला जावें. रुद्ररूप धारण करणारा भैरव ह्या क्षेत्राची देवता आहे. दर पौर्णिमेला व अमावास्येला त्याची महापूजा करावी. महोदयपर्वात जो स्नान करून महाकालेश्वराची पूजा करतो तो सात जन्मपर्यंत धनाढ्य होतो. नंतर त्याच्या ईशान्येकडील महोदयतीर्थाला जावें व तेथें स्नान करून पितृतर्पण करणाराला प्रतिग्रहाचा दोष लागत नाहीं. जे प्रतिग्रह घेणारे व विषयासक्त आहेत त्यांना महोदय आनंददायक आहे; व अशांना मुक्ति देत असल्यानेंच त्याला महोदय हें नांव पडलें. महोदयाच्या रक्षणाकरितां महाकालाच्या उत्तरेला माता देवी आहेत. महोदयांत स्नान करून मातृकापूजन करावें. हें महोदय तीर्थ अर्धकोस

विस्तृत आहे. त्याचा मध्य सारभूत असून ऋषींना फार प्रिय आहे. त्याच्या वायव्येला पापनाशक संगमेश्वर आहे. तेथें पूर्वी ऋषि एकत्र झाले. त्याच्या पूर्वेला कुंडिका आहे. तिच्यांत वडवानलासह सरस्वती आली आहे. कुंडिकेंत स्नान करूस संगमेश्वराचें पूजन करणाराचा लक्ष्मी, पुत्र व प्रिय ह्यांजबरोबरचा संगम तुटत नाहीं. आणि तो जन्मल्यापासून मरणापर्यंतच्या पातकांतून मुक्त होतो. देवकुलाच्या उत्तरेला दोन कोसांवर उत्तमनामक प्रसिद्ध स्थान आहे. त्याच्या उत्तरेला अठ्ठेचाळीस हातांवर सर्व विघ्नहर्ता उत्तरविघ्नराज आहे. त्याची चतुर्थीला सुगंध, फल व मोदकांनीं पूजा करणाराचे सर्व मनोरथ पूर्ण होतात. उन्नताच्या उत्तरेला बारा कोसांवर तप्तोदकाचा स्वामी तलनामक आहे. पूर्वी पराक्रमी अशा विष्णूनें शंभर वर्षें युद्ध करून तलनाचा दैत्याधिप मारला व विष्णु तलस्वामी झाला. तप्तकुंडांत स्नान करून तलस्वामीचें पूजन व पिंडदान करावें, त्यानें कोटियात्रांचें फळ मिळतें. नंतर त्याच्या पूर्वेकडील क्षेत्रसंरक्षक लिंगरूप अशा कालमेघाला जावें. त्याची अष्टमीला व चतुर्दशीला पूजा करावी. तो कलियुगांत वांछित देण्याविषयीं केवळ कल्पवृक्ष आहे. त्याच्या दक्षिणेला वीस हातांवर ऊन्ह पाण्यांचीं कुंडें आहेत. कुंडाच्या पूर्वेला शंभर हातांवर पापनाशक रुक्मिणी देवी आहे. ऊन्हपाण्याच्या कुंडांत स्नान करून सोनें देणाऱ्या रुक्मिणीचें पूजन करावें. पूजा करणाऱ्या स्त्रियांचा सात जन्म गृहनाश होत नाहीं. बलभद्राच्या पूर्वेला मोठी नदी आहे. तेथें पापनाशक व सुखोत्पादक दुर्वासेश्वरनामक शिवलिंग आहे. तेथें अमावास्येला स्नान करून पिंडदान केलें असतां पितरांची कल्पकोटिशतांपर्यंत तृप्ति होते. दुर्वासेश्वराची यथाविधि पूजा केल्यानें कोटियज्ञाचें फळ मिळून सर्व हेतू पूर्ण होतात. तेथें ऋषींनीं अनेक लिंगें स्थापिलीं आहेत. त्यांचें दर्शन व पूजन केल्यानें सर्व पातकें नष्ट होतात. हीं भद्रेच्या पश्चिमेकडून पुर्वेकडलीं क्षेत्रें सांगितलीं. क्षेत्राच्या परिधीला मधुमती हें नांव आहे. तेथून नैर्ऋत्येला संङ्कटानांवाचें स्थान आहे. तेथें समुद्रकांठीं पिंगेश्वर आहे. तेथील सात कूपांत पितरांचे हात अद्याप पर्वणीला असतात. तेथें सोमवत्या अमावास्येला पिंडदान केल्यानें गयाश्रद्धाच्या कोटिपट पुण्य मिळतें. तेथें जवळच भद्रासंगम आहे. पूर्व व पश्चिम भद्रासंगमावर स्नान केल्यानें गंगा व समुद्र यांच्या संगमावर स्नान केल्याचें फळ मिळतें.

———

# अध्याय ३३४ ते ३३९ वा.

## शंखावर्तमाहात्म्य.

पार्वती म्हणाली,-हे शंकरा! जो तुम्हीं मला तलस्वामि महोदय सांगितला त्या तलाला मारण्याचें कारण काय? हें सर्व मला विस्तारपूर्वक सांगा. शंकर म्हणाले, हें चरित्र फार रहस्यमय आहे; तरी पण तें तुला सांगतों ऐक. कृतयुगांत जो गोविंद तोच त्रेतायुगांत वामन, द्वापारांत स्तुतिस्वामी व कलियुगांत तलस्वामि होय. तप्तोदक हेंहि त्याचेंच दुसरें नांव आहे. एक महेंद्रनामक मोठा भयंकर दानव होता. त्यानें पूर्वीं कोटि वर्षें तप केलें, त्यानें तपोबलानें इन्द्रादि देवांना जिंकिलें. तो देवांना जिंकून मजजवळ आला; व माझ्याशीं युद्ध कर असें मला म्हणाला. त्याचें माझें भयंकर युद्ध झालें; तेव्हां माझ्या शरीरांतून ज्वाळा निघाल्या त्यांतून तल उत्पन्न झाला. त्यानें गर्जना करणाऱ्या महेन्द्राला पाहिलें व त्याला म्हणाला माझ्याशीं युद्ध कर. नंतर तल व महेंद्र ह्या दोघांचें युद्ध झालें त्यांत तलानें महेंद्राला मारलें. महेंद्र मेलेला पाहून तलाला आनंद झाला; व तो नाचूं लागला. त्याच्या प्रभावानें पृथ्वी फार पीडित झाली. देव, दानव व मनुष्य अतिशय भयभीत झाले. तेव्हां सर्व देव रुद्राकडे गेले; व त्यांनीं झालेलें सर्व वृत्त रुद्राला सांगितलें. रुद्र देवांना म्हणाला; तल मला मुलासारखा आहे; म्हणून तो मला वध्य नाहीं; तर तुम्ही दुर्वासाच्या समोर प्रभासक्षेत्राच्या स्तुतिस्वामीकडे जा. प्रत्येक कल्पांत तोच त्या दानवाचा नाश करतो. असें ऐकतांच देव प्रभासाला आले; व तप्तोदकाधिपाजवळ जमले. देवानीं श्रद्धापूर्वक जनार्दनाची प्रार्थना केली. त्याचें भाषण ऐकून जनार्दनानें देवांच्या रक्षणाविषयीं निश्चय केला; व त्यानें तलाला युद्धाला बोलाविलें. त्यांचें भयंकर युद्ध जुंपलें. सर्व देवही युद्धाला सज्ज झाले. पर्वतासारख्या विशाल दैत्याला पाहून त्यांनीं त्याच्याशीं बाहुयुद्ध मागीतलें. तें ऐकतांच दैत्य अंतकाळीं यम धांवतो त्याप्रमाणें अंगावर चालून आला दोघांचें खडेजंगी बाहुयुद्ध झालें. तलाच्या बाहूंमध्यें आक्रांत झालेल्या विष्णुनें रुद्राचें स्मरण केलें त्यासरशीं शंभु येऊन पुढें उभा राहिला व काय म्हणणें आहे, असें म्हणाला. मी तलाशीं कुस्ती करून थकलों आहें, तो थकवा घालविण्याकरितां उष्ण पाणी तयार कर, नंतर तलाला मारतों. ईश्वर म्हणाला; पूर्वीं येथें उमेनें कृतयुगांत ऋषींचे श्रम निवारण करण्याकरितां उष्णोदकाचें कुंड केलें होतें तें दैत्याच्या पापकर्मानें फिरून थंड झालें तें फिरून कल्पांतीं तापविलें. असें म्हणून महेशानें विष्णूकडे पाहिलें त्या-

बरोबर महेशाच्या तृतीय नेत्रांतून ज्वाला निघून कुंडोदक उष्ण झालें. त्या उष्णोदकानें नारायणानें आपलें शरीर क्षालन केलें व तलाशीं युद्ध सुरू केलें. विष्णूनें तलाच्या मस्तकावर भयंकर मुष्टिप्रहार केला, व त्याला खालीं पाडून त्याच्या मानेवर पाय ठेवून तरवार टेकली. इतक्यांत दैत्य हंसला तेव्हां विष्णूनें त्याला हंसण्याचें कारण विचारिलें. तल म्हणाला; जें पद ऋषि यज्ञयागादि महाप्रयासानें साधतात, तें मला अनायासें लाभलें. तें ऐकून विष्णु दैत्याला वर देण्याला तयार झाला; व म्हणाला; तुला वाटेल तो वर माग. तें ऐकून तळ म्हणाला; माझी अखंड कीर्ति राहील असें कर व जो मार्गशीर्ष शुक्ल एकादशीला तुझें दर्शन घेईल त्याचें पाप नष्ट व्हावें. विष्णूनें तसा वर तलाला दिला, तेव्हां देवांनीं त्याजवर पुष्पवृष्टि केली; व सर्व लोक आनंद पावले. सर्वपापनाशक हें विष्णुमहातीर्थ आहे. तेथें नारायण व कालमेघस्वरूपानें कालमेघनामक शंकर प्रसिद्ध आहे. त्याचा यात्राविधि सांगतों. तेथें जाऊन विष्णूचें तलस्वामी ह्या नावानें स्मरण केलें आहे. 'इदं विष्णु' ह्या ऋचेनें स्तवन करावें. 'सहस्र शीर्षा' ह्या मंत्रानें तर्पणादिक करावें; व स्नान करून अर्घ्य द्यावें. गंध–पुष्प–वस्त्रानुलेपनांनीं पूजा करावी. मध, उंसाचा रस, व केशर याची उटी कापूर–कस्तुरी–युक्त लावावी. वस्त्र धारण करून नैवेद्य अर्पण करावा. रात्रौ धार्मिकरीतीनें जागरण करावें. बैल, सोनें व वस्त्रें हीं वेदवेत्त्या ब्राह्मणांना दान द्यावींत. त्या दिवशीं उपवास करावा. जनार्दनाचें दर्शन घेऊन नंतर रुक्मिणीचें दर्शन घ्यावें. असें केल्यानें सर्व यज्ञांचें व दानाचें फल मिळतें. सर्व व्रतांचें फळ मिळतें; व मातृपितृकुलाचा उद्धार होतो. संपूर्ण पातक नष्ट होतें. कधींही दारिद्र्य व दुर्गति प्राप्त होत नाहीं. वेदवेत्त्या ब्राह्मणाला हजार भार सुवर्ण दान दिल्याचें फळ त्या कुंडांत स्नान केल्यानें मिळतें. हें तलस्वामिचरित्र श्रद्धापूर्वक ऐकिल्यानें सर्व मनोरथ पूर्ण होतात. त्याच्या पश्चिमेला न्यंकुमतीच्या कांठीं दक्षिणेकडे शंखावर्ततीर्थ आहे. तेथें लालरंगाच्या चक्रांकित शिला सांपडतात; व ती फोडली असतां तिच्यांतून रक्त वहातें. तेथें पूर्वीं वेद हरण करणाऱ्या शंखासुराला विष्णूनें मारिलें; म्हणून हें विष्णुतीर्थ आहे. हें शंखोदकतीर्थ शंखाच्या आकाराचें आहे. त्या तीर्थांत स्नान केल्यानें ब्रह्महत्येचें पाप नष्ट होतें; व शूद्रालाही ब्राह्मण जन्म येतो. पूर्वीं तेथें जाऊन नंतर रुद्रगंगेला जावें; व यात्राफलाची इच्छा करणारानें गोदान द्यावें.

---

## अध्याय ३३[illegible] वा.

### गोष्पदतीर्थमाहात्म्य.

नंतर गोष्पदतीर्थाला जावें. तेथें श्राद्ध केल्यानें भाविकाला गयेंतील श्राद्धाच्या सातपट पुण्य मिळतें. येथेंच पृथुराजाचें श्राद्ध करून वेनाचा पापयोनींतून उद्धार केला. पार्वती म्हणाली, तें तीर्थ कोठें आहे. त्याची उत्पत्ति कशी झाली. वेनाचा उद्धार कसा झाला, तेथल्या श्राद्धाला गयेच्या सातपट फळ कसें, श्राद्धाला कसें असावें, मंत्र कोणते म्हणावें, हें सर्व मला सविस्तर सांगा. शंकर म्हणाले, तूं विचारलेला प्रश्न फार गोप्य आहे. तरी तुझ्या प्रेमास्तव सांगतों. न्यंकुमती नदी महासिद्धा आहे. ती मी ह्या क्षेत्राच्या मर्यादेकरितां आणिली. नारायणस्थानावळ पूर्णादित्याच्या दक्षिणेला ती पापनाशक नदी आहे. तिच्या मध्यभागीं कोटिपापनाशक गोष्पदनांवाचें प्रख्यात तीर्थ आहे. त्याच्या जवळ थोडक्याच अंतरावर अनंतनांवाचा सर्प विष्णूनें तीर्थाच्या रक्षणाकरितां ठेविला आहे. नरकाला भ्यालेले पितर पुत्रानें गोष्पदाला जावें असें इच्छितात. पुत्र गोष्पदाला गेलेला पाहून पितर आनंद पावतात. असा कोणी आमच्या कुलांत उत्पन्न होईल काय ! जो गयेंत व गोष्पदतीर्थीं जाऊन आम्हाला उदक देईल, अशी पितर नेहमीं इच्छा करीत असतात. आणखीही त्यांच्या इच्छा अशा असतात कीं, त्यानें खड्गमांसानें व कालशाकानें श्राद्ध करावें. गोष्पदीं दिवा लावावा; व अन्नदान करावें. तेथें एक वसती राहून पितरांना व स्वतःलाही पिंड द्यावा. जर कोणी गोष्पदाची यात्रा करील तर ब्रह्मज्ञान, योगाभ्यास, गोष्ठीं मरण किंवा कुरुक्षेत्रवास हे त्यापेक्षां अधिक नाहींत. हें तीर्थ अर्धकोश विस्तृत आहे. त्यांतला चतुर्थांश दुर्लभच आहे. ज्यानें गोष्पदांत श्राद्ध केलें तो पितरांच्या ऋणांतून मुक्त झाला. त्यांत प्रत्यक्ष पदावर पिंड दिल्यानें शंभर कुलांचा उद्धार होतो. गोष्पदाच्या यात्रेकरितां घरांतून निघाल्याबरोबर पितरांना स्वर्गावर चढण्याचा जिना तयार होऊं लागतो. गोष्पदावर सातू, बाजरी व अन्न, पीठ किंवा भात यांचे पिंड द्यावेत. गोप्रचारांत कर्णिकेच्या आकाराएवढी कंद, मूळ अथवा फळ यांचे पिंड दिल्यानें पितरांना स्वर्गप्राप्ति होते. गोष्पदांतल्या पिंडदानाचें फळ मी शंभर वर्षें वर्णन केलें तरी पुरें होणार नाहीं. आतां यात्रेचा विधि सांगतों, तो लक्षपूर्वक ऐक. जर गोष्पदयात्रेनें गयेच्या यात्रेचें फळ मिळावें, अशी इच्छा असेल तर त्यानें यथाविधि यात्रा केली पाहिजे.

पापनाशक प्रभास हें अशाप्रकारचें प्रभावशाली आहे कीं, तेथें कोट्यावधि तीर्थ येतात व देव राहतात. जो प्रभासाला जाऊन अन्यतीर्थांची अपेक्षा करतो, तो हातचें सोडून पळत्याच्या पाठीं लागला समजावा. पितरांची गाथा अशी आहे कीं, जर मुलगा गयेला जाण्यास असमर्थ असेल, तर त्यानें गोष्पदाला जावें. तेथें जें मिळेल त्याचे पिंड द्यावेत; तेथें विद्वान् ब्राह्मणांना श्राद्धीं बसवून श्राद्ध व पिंडदान करावें. तेथें जाणाराला पर्वाची जरूर नाहीं, फक्त श्रद्धा पाहिजे. तेथें अक्षय्यतृतीयेचें श्राद्ध फार पुण्यप्रद आहे. कार्तिकी व माघी सप्तमी, पद्मकयोग, पर्व ह्या पुण्यकालीं तेथें गाय, सोनें, वस्त्र, रुपें, तूप, तीळ ह्यांचें दान पितरांना उद्देशून द्यावें. दुष्टांला कधींही न सांगण्यासारखें हें उत्तम तीर्थ तुला सांगितलें. हें फक्त श्रद्धाळूलाच सांगावें. हें श्राद्धाचे वेळीं ऐकावें. त्यानें पितर संतोष पावतात. नरकाला भिणारांनीं हें भक्तीनें ऐकावें. येथें नुस्तें तिलोदक दिल्यानेंही पितर तृप्ति पावतात. हें अतिशय कीर्तिकारक, गोप्य, पितृप्रिय व पापहर आहे.

---

## अध्याय ३३७ व ३३८ वा.

### नारायणगृहमाहात्म्य व जालेश्वरमहात्म्य.

नंतर गोष्पदाच्या दक्षिणेस समुद्रतीरीं असलेल्या नारायणगृहास जावें. तेथें न्यंकुमतीच्या जवळ कल्पांतस्थायी केशव आहे. भगवान् विष्णु दैत्यांचा नाश करून तेथें विश्रांती घेतो. म्हणून त्याला नारायणगृह असें नांव आहे. कृतयुगांत विष्णूला जनार्दन, त्रेतायुगांत मधुसूदन, द्वापारांत पुंडरीकाक्ष व कलींत नारायण म्हणतात. प्रत्येक युगांत धर्मव्यवस्था करून भगवान् येथें विश्रान्ती घेतो. एकादशीला निराहार राहून जो नारायणाचें दर्शन घेतो तो मृत्यूनंतर विष्णुपद पावतो. तेथें यात्राफळ इच्छिणारानें ब्राह्मणांना पिंवळीं वस्त्रें दान द्यावींत; आणि स्नान व श्राद्ध करावें. हें भक्तीनें ऐकणारा सद्गति पावतो. नंतर देविकेच्या तीरीं असलेल्या जालेश्वराला जावें. चाक्षुषमन्वन्तरांतल्या द्वापरयुगांत जालेश्वराची उत्पत्ति आहे. त्याची पूजा नागकन्या करतात. तें मनुष्याला दिसणें शक्य नाहीं. त्याच्या स्मरणानें ब्रह्महत्येचें पाप नाश पावतें. देविकेंत स्नान करितेवेळीं कोळ्याच्या जाळ्यांत सांपडून नंतर कोळ्यांच्या प्रार्थनेवरून त्यांनीं तेथें शिवलिंग स्थापना केली; व तो येथें जाळ्यांत सांपडला म्हणून ह्याला जालकेश्वर हें नांव पडलें. तेथें स्नान केल्यानें व जालेश्वराचें पूजन केल्यानें आपस्तंब व कोळी स्वर्गाला गेले, हें देविकेचें माहात्म्य होय. तेथें चैत्र शुक्ल

त्रयोदशीला पिंडदान केल्याचें फळ अगणित आहे. येथें गोदान द्यावें; व जालकेश्वराचें दर्शन घ्यावें; आणि ह्याचें माहात्म्य ऐकावें.

# अध्याय ३३९ ते ३४२ वा.

## हुंकारकूपादितीर्थमाहात्म्य.

नंतर देविकेच्या कांठच्या त्रैलोक्यप्रसिद्ध हुंकारकूपाला जावें. तो कूप हुंकारानेंच भरतो व रिकामा होतो. पूर्वी तण्डी नामक ब्राह्मण शिवभक्तिपरायण होऊन देविकेच्या कांठीं तप करीत होता. तेथें एक म्हातारा आंधळा हरण आला व एका कोरड्या खड्यांत पडला. तें पाहून तण्डीनें दयेनें कळवळून हुंकार केला, त्याबरोबर तें खांचर पाण्यानें भरून वाहूं लागलें, व हरिण बाहेर निघाला. तो मनुष्यरूप होऊन तण्डीला म्हणाला; मी हरिणरूपानें कूपांत पडलों, पण बाहेर पडतांना मनुष्यरूप झालों, हें काय आश्चर्य असावें, हें त्या तीर्थीचें माहात्म्यच असलें पाहिजे, दुसरें कारण दिसत नाहीं. इतक्यांत सर्व पाणी जमिनींत मुरून गेलें. नंतर तण्डीनें फिरून हुंकार केला, त्याबरोबर तो कूप जलानें भरला. त्यानें तेथें स्नान व पितृतर्पण केलें, त्यानें त्याला उत्तम गति मिळाली. अद्यापही तेथें तण्डीनें हुंकार केल्याबरोबर कूप जलपूर्ण होतो. तेथें पापीहि मनुष्य भक्तिपूर्वक गेला असतां त्याला पुढें उत्तम मनुष्यजन्म येतो. तेथें स्नान करून श्राद्ध केल्यानें मनुष्य पातकांतून मुक्त होऊन पितृलोकीं पूज्य होतो; व पुढील आणि मागील सातें कुलांचा उद्धार होतो. नंतर तेथें असलेल्या पापनाशक अशा चण्डीश्वरनामक महालिंगाला जावें. कार्तिक शुक्ल चतुर्दशीला तेथें उपवास व जागर केला असतां त्याला शिवलोकप्राप्ती होते. नंतर चण्डीश्वराच्या वायव्येस असलेल्या आशापरक विघ्नराजाला जावें. भक्तांच्या आशा पूर्ण होत असल्यानें त्याला हें नांव मिळालें आहे. तेथें राम, लक्ष्मण व सीता यांनीं त्याचें आराधन करून आपले मनोरथ पूर्ण केले. चंद्रानें गणेश्वराचें आराधन करून आपली कुष्ठरोगांतून मुक्तता येथेंच केली. भाद्रपद शुक्ल चतुर्थीला गणाधिपाची पूजा करून ब्राह्मणांना मोदकांचें भोजन घालावें; म्हणजे विघ्नराज त्याचे हेतु पूर्ण करतो. मी त्या क्षेत्राच्या रक्षणाकरितां व यात्रेकरूंच्या दुःख निवारणाकरितां हे पार्वति गणाधिपाची तेथें स्थापना केली. तेथून दक्षिण व नैर्ऋत्य यांच्या कोंपऱ्यांत चंद्रानें स्थापन केलेलें लिंग आहे. तेथें अमृतकुंड आहे. कलाकुंडही

त्यालाच म्हणतात. कलाकुंडांत स्नान करून चंद्रेश्वराचें पूजन करणाराला हजारों वर्षें तप केल्याचें पुण्य लाभतें. चंद्रेश्वराच्या पूर्वपश्चिमकोपऱ्यांत चंद्रानें तलाव खोदला आहे. त्याचें मुक्तिदानादिक माहात्म्य तुला पूर्वींच सांगितलें आहे.

---

## अध्याय ३४३ वा.

### कपिलाषष्ठीव्रतविधानमाहात्म्य.

नंतर शशिभूषणाच्या पूर्वेस व कोटितीर्थाच्या पश्चिमेस असलेल्या कपिलेश्वराला जावें. जरद्गवेशाच्या दक्षिणेकडें व समुद्राच्या उत्तरेकडें हें क्षेत्र आहे. हें पाप्याला दुर्लभ आहे. तेथें कपिलानें पूर्वीं शिवलिंग स्थापन करून अयुत वर्षें तप केलें. तेथें आपल्या सामर्थ्यानें कपिलधारा महानदी आणिली; अद्यापि पुण्यात्म्यांना ती समुद्रांत दिसते. तेथें कपिलाषष्ठी पर्वाचे दिवशीं स्नान करून कपिलागाईचें दान केलें असतां कोटि गाई दान केल्याचें फळ मिळतें. हें पुण्यार्जन सर्व पापांचें क्षालन करणारें आहे. कपिलेश्वराचें पूजन केल्यानें कोटि कन्यादानाचें फळ मिळतें. पार्वति म्हणाली; आश्चर्यकारक कपिलाषष्ठीचें विधान दानमन्त्रपूर्वक ऐकण्याची मला फार इच्छा आहे. मनुष्याला सर्व जन्मांत जरी एकदां कपिलाषष्ठीचा योग घडला तरी तो धन्य आहे. भाद्रपद कृष्ण षष्ठीच्या दिवशीं मंगळवार रोहिणी व व्यतीपात योग असेल तर तें कपिलाषष्ठी पर्व समजावें. त्या पर्वणीला अंगाला तीळ व माती लावून उत्तम तीर्थावर स्नान करावें. जप करून सूर्याला अर्घ्य दिल्यावर रक्तचंदन कण्हेरीचीं फुलें व तीर्थोद ह्यानें सिद्ध केलेलें अर्घ्यपात्र मस्तकाइतकें उंच करून 'नमस्त्रैलोक्य' ह्या मन्त्रानें सूर्याला अर्घ्य द्यावें. नंतर सूर्याला प्रदक्षिणा घालून कपिलेश्वराचें पूजन करावें. ताजें सारवण घातलेल्या शुद्ध जागीं चंदनाच्या गंधानें सुगंधी केलेलें पाणी भरून कलश स्थापन करावा. त्यामध्यें पंचरत्नें, दूर्वा पुष्प व अक्षत टाकावे. त्याला बाहेरून दोन लाल वस्त्रें गुंडाळावीं. ह्या कलशावर तांब्याचें भांडें झांकण ठेवावें. सोन्याच्या रथांत सोन्याची चार तोळ्याची सूर्याची प्रतिमा बसवावी. तो रथ कलशावरील ताम्रपात्रांत ठेऊन त्याची पूजा करावी, होम करून कपिलेश्वराच्या मंडपांत सूर्याचें नाममंत्रांनीं पूजन करून प्रार्थना करावी. प्रार्थना करतांना 'नमो नमस्ते वरद' हा मंत्र म्हणावा. 'ब्रह्मणोत्पादिते' हा मंत्र म्हणून कपिलेचें पूजन करावें. तो सूर्यप्रतिमेसहित कुंभ विद्वान् ब्राह्मणाला दान द्यावा. चार तोळे सोनें दक्षिणा देऊन कपिला

गाय दान द्यावी. अशारीतीनें कपिलाषष्ठी व्रत करणाराला हजार अश्वमेध यज्ञ केल्याचें फळ मिळतें. सर्व दानांचें व सर्व तीर्थांचें जें फळ सांगितलें आहे तें सर्व कपिलाषष्ठीव्रतानें मिळतें. कपिलाव्रत करणारा गाईच्या अंगावरील केसांइतकीं वर्षें स्वर्गीं पूज्य होतो. हें व्रत सर्व अज्ञात व ज्ञात पातकांचा नाश करतें, असें कपिलमुनींनीं सांगितलें आहे.

## अध्याय ३४४ ते ३४६ वा.

### जरद्गवेश्वरादिलिंगमाहात्म्य.

हे पार्वति ! नंतर कपिलेश्वराच्या ईशान्य व उत्तर ह्यांचेमधील जरद्गवानें स्थापिलेल्या जरद्गवेश्वराला जावें. त्याच्या दर्शनानें ब्रह्महत्यादि पातकें नष्ट होतात. तेथें अंशुमती नदी आहे. तींत यथाविधि स्नान करून पिंडदान करावें. त्यानें कोटि वर्षें पितरांची तृप्ति होते. तेथें विद्वान् ब्राह्मणाला बैल दान द्यावा. नंतर जरद्गवेश्वराला पंचामृतस्नान घालून गुग्गुळाचा धूप घालावा. स्तुति करून साष्टांग नमस्कार घालावा; व अनेक पक्वान्नांचें ब्राह्मणांना भोजन घालावें. तेथें एका ब्राह्मणालाही भोजन घातल्यानें कोटि ब्राह्मणभोजनाचें पुण्य आहे. कृतयुगांत त्या तीर्थाला सिद्धोदक असें नांव होतें. कलियुगांत त्यालाच जरद्गवेश्वर म्हणतात. नंतर जरद्गवेश्वराच्या पूर्वेला सातशेंवीस हातावर हाटकेश्वर लिंग आहे. दमयन्तीसह नल राजा तेथें गेला तेव्हां हें उत्तम क्षेत्र पाहून तेथें त्यानें नलेश्वर नामक लिंग स्थापन केलें आहे. नलेश्वराचें दर्शन व यथाविधि पूजन केल्यानें मनुष्य कलीच्या दोषांतून मुक्त होतो व द्यूतांत विजय पावतो. त्याच्या आग्नेयला कर्कोटक नामक सूर्य आहे. तो पूर्व कल्पांतला आहे. त्याच्या दर्शनानें सर्व देव प्रसन्न होतात. रविवारीं सप्तमी आली असतां जो यथाविधि षोडशोपचार कर्कोटकाचें पूजन करतो तो सर्व पातकांतून मुक्त होतो.

## अध्याय ३४७ वा.

### हाटकेश्वरमाहात्म्य.

हे महादेवि ! नंतर नलेश्वराच्या पूर्वेकडे आठशें हातांवर असलेल्या हाटकेश्वराला जावें. तेथें चिंतामणीच्या पूर्व व ईशान्य कोपऱ्यांत अगस्त्य महर्षीचें

आम्रवन आहे. पूर्वी अगस्त्यानें तेथें तप केलें. पार्वती म्हणाली; हें केव्हां घडलें ! तें विस्तारानें सांगा. शंकर म्हणाले; पूर्वी त्रैलोक्याचा उच्छेद करणारे कालकेय-नामक दैत्य बलिष्ठ झाले. भगवान् विष्णूनें त्यांचा नाश केला. विष्णूनें व्याघ्ररूप धारण करून कालकेयांचा नाश केला, म्हणून प्रभासवासी विष्णूला दैत्यसूदन हें नांव पडलें. तें व्याघ्ररूप चक्रमुखी ह्या नांवानें प्रसिद्ध होतें. दैत्यसूदनाच्या तडाक्यांतून सुटलेले कांहीं कालकेय समुद्रांत पळून जाऊन विचार करूं लागले कीं, देवांचा छळ कसा करावा. त्यांनीं तप, वेदाध्ययन, यज्ञ, दान व धर्माचरण करणारांचा नाश करणें ही त्याजवर तोड योजिली. ते रात्रीं समुद्रांतून निघून पूर्वोक्त कर्मे करणारांचा संहार करूं लागले. त्यामुळें लोकांनीं यज्ञयाग करणें सोडलें. सर्व भूमंडळ यज्ञादिकर्मरहित झालें. पुष्कळ तपस्वी जवळ शस्त्रें घेऊन निजूं लागले. असा धर्मनाश झाल्यावर देवांना काळजी लागली व ते ब्रह्मदेवाला शरण गेले; आणि त्यांनीं सर्व वृत्तांत निवेदन केला. नंतर ब्रह्मदेव त्यांना म्हणाले कीं, कालेय नांवाचे अति भयंकर दानव समुद्रांत राह-तात, ते रात्रीं येऊन ऋषींचा नाश करतात. त्यांच्या नाशाचा यत्न करा, नाहीं तर तुमचा समूळ नाश होईल. तुम्ही प्रभासक्षेत्रांत जेथें अगस्त्यऋषि तप करीत आहे तेथें जा. तो समुद्र पिऊन टाकण्यास समर्थ आहे. तुम्ही त्याची समुद्र प्राशन करण्याकरितां प्रार्थना करा. त्यानें समुद्र शुष्क केल्यावर तुम्ही कालकेयांचा सहज नाश कराल. शंकर म्हणतात;-पार्वति ! ह्याप्रमाणें सांगून ब्रह्मदेवानें रवाना केलेले देव प्रभासक्षेत्रांत अगस्त्यऋषीला शरण गेले. ते अगस्त्याला म्हणाले कीं, आमचें तुम्ही रक्षण करा. समुद्राचा आश्रय करून राहिलेल्या कालकेय दानवांनीं त्रैलोक्याचा नाश करण्याचा प्रारंभ केला आहे. तुम्हीं आमच्याकरितां समुद्राचें शोषण करा. ही देवांनीं केलेली प्रार्थना ऐकून अगस्त्य देवांसह समुद्रतीरीं गेला; व अगस्त्यानें एका घोटासरशी सर्व समुद्र पिवून टाकिला. समुद्र कोरडा झाल्याबरोबर कावरेबावरे झालेले कालकेय दैत्य सैरावैरा पळूं लागले. त्या वेळीं देवांनीं त्यांचा फन्ना उडविला; व कांहीं पळून अरण्यांत गेले. नंतर देव अगस्त्याला म्हणाले; आमचें काम झालें; आतां समुद्र पूर्ववत् तयार करा. अगस्त्य म्हणाला. तें पाणी मी पचविलें आणि आतां तें अपवित्र झालें आहे. कांहीं दिवसांनीं इक्ष्वाकुवंशांत ' राजाच्या कुलांत भगीरथ नामक राजा होईल; व तो कांहीं कारणास्तव स्वर्गावरून गंगेला आणिल. त्या गंगेच्या प्रवाहानें समुद्र पुनः पहिल्याप्रमाणें भरेल. नंतर सर्व देवांसह अगस्त्य आपल्या आश्रमांत आले. नंतर देव अगस्त्याला म्हणाले; हे ऋषिवर्य आपल्या ह्या कृत्यानें आम्ही फार संतुष्ट झालों. आम्ही काय करावें ती आज्ञा करा. अगस्त्य म्हणाला; पंचवीस कोटि हजार ब्रह्मदेव होईपर्यंत मी विमानस्थ होऊन

आकाशांत दक्षिणेकडे रहाणार. जो कोणी ह्या माझ्या आश्रमांत येऊन हाटकेश्वराजवळ स्नान करील त्याला स्वर्गप्राप्ती व्हावी. पाताळांतून आलेलें जें हाटकेश्वर नांवाचें लिंग मी स्थापन केलें आहे, त्याचें पूजन करणाराला प्रत्येक दिवशीं शंभर गाई दान दिल्याचें फळ मिळावें. जो लोपामुद्रेसह माझें पूजन करून शरदृतूंत काशपुष्पयुक्त अर्घ्य देईल, त्याला सद्गति व्हावी. हाटकेश्वराजवळ लोपामुद्रेसह माझें पूजन उत्तरायणांत केल्यानें लक्ष गोदानाचें फळ मिळावें. ईश्वर म्हणतात; तें सर्व तसें होईल असें म्हणून देव आनंदानें आपपल्या स्थानीं गेले. म्हणून शरदृतूंत प्रभासक्षेत्रीं अगस्त्याश्रमांत जाऊन अगस्त्येश्वराचें पूजन करावें. जो कोणी भक्तियुक्त अंतःकरणानें हें अगस्त्यचरित्र श्रवण करील, तो दिवसरात्र घडलेल्या पातकांतून मुक्त होतो.

---

## अध्याय ३४८ ते ३५१ वा.

### नारदेश्वरीप्रमुखक्षेत्रमाहात्म्य,

नतर पश्चिमेकडे नारदेश्वराजवळ असलेल्या नारदेश्वरीला जावें. ती सर्व दुर्भाग्य नष्ट करते. जी स्त्री तृतीयेला नारदेश्वरीचें पूजन करिते तिच्या कुळांत कोणीही स्त्री दुर्दैवी होत नाहीं. नंतर भीमेश्वराजवळ सोमानें पूजिलेली मंत्रविभूषणा देवी आहे तिला जावें. श्रावण शुक्ल तृतीयेला जी स्त्री मंत्रविभूषणा गौरीचें यथाविधि पूजन करिते ती सर्व दुःखांतून मुक्त होते. नंतर भल्लतीर्थाच्या पूर्वेला व योगिनीचक्राच्या दक्षिणेला भीमानें आराधिलेला दुर्गकूट गणपति आहे त्याला जावें. फाल्गुन शुक्ल चतुर्थीला जो यथाविधि दुर्गकूटाचें पूजन करून मोदकांचा नैवेद्य समर्पण करतो त्याचीं सर्व कार्यें एक वर्षपर्यंत निर्विघ्न होतात. नंतर कौरवेश्वरीला जावें. ज्याच्या नांवानें कुरुक्षेत्र प्रसिद्धी पावलें, त्या पुरुषानें पूर्वीं तिचें अराधन केलें. भीमानें क्षेत्र संरक्षणाकरितां तिचें यथाविधि अराधन केलें. जो महानवमीच्या दिवशीं तिचें पूजन करतो त्याचें ती पुत्राप्रमाणें रक्षण करिते. तेथें मिष्टान्नानें मेहुण जेऊं घातल्यानें ती अति संतोष पावते. नंतर दुर्गकूटाच्या दक्षिणेला दोन हजार हतांवर असलेल्या सुपर्णेलानामक भैरवीमातेला जावें. पूर्वीं गरुडानें पाताळांतून अमृत आणिलें व तेथें ठेविलें. सुपर्णेलेनें त्या अमृताचें सर्पांपासून रक्षण केलें. तेव्हांपासून ती देवी सुपर्णेला ह्या नांवानें प्रसिद्ध झाली. इला हें पृथ्वीचें नांव आहे. गरुडानें तिला स्थापन केली, हें सुपर्णेला नांव पडण्याचें कारण आहे. तेथें सुपर्णकुंड

आहे. त्यांत स्नान करून सुपर्णेलेचें पूजन करावें. तेथें ब्राह्मणभोजन करावें. ही यात्रा करणाराला विपत्ति रहात नाहीं; व स्त्री आणि संतती जिवंत राहणारी होते.

---

## अध्याय ३५२ वा.



### भल्लतीर्थमाहात्म्य.

नंतर सुपर्णेलेच्या पश्चिमभागीं असलेल्या भल्लतीर्थाला जावें. तेथें भगवान् विष्णु चतुर्भुजमूर्ति आहे. त्या एक कोस मित्रवननामक सुंदर प्रदेशांत भगवान् विष्णूनें आपलें शरीर ठेविलें. प्रत्येक कल्पाचे शेवटीं विष्णू तेथेंच वास करितो. त्याशिवाय दुसरें स्थळ त्याला आवडत नाहीं; हें विष्णुक्षेत्रांत श्रेष्ठ असून साडेतीन कोटि श्रेष्ठ तीर्थें तेथें आहेत. तेथें विष्णूच्या पादप्रक्षालनाकरितां व सर्वांच्या हिताकरितां गंगा मूर्तिमंत आहे. गंगा, गया, कुरुक्षेत्र, नैमिषारण्य, पुष्कर किंवा द्वारका हीं सर्व सोडून भगवान् विष्णु येथेंच रहातो. हे पार्वति! भाद्रपदांतल्या द्वादशीला प्रत्येक युगांत तेथें जाऊन उत्तम ब्राह्मणांच्या अनुमतीनें अनेक दानें यथाविधि देऊन मी त्याचें और्ध्वदैहिक करितों. येथें द्वादशीयोग आला असतां, यथाविधि स्नान व भक्तिपूर्वक पितृतर्पण करणारा सर्व पातकांतून मुक्त होतो; आणि दीपादि दानांनीं तो कृतकृत्य होतो. ह्यासंबंधीं पूर्वीची कथा सांगतों. श्रीकृष्ण सर्व यादवांचा संहार करून दूर्वासानें त्याच्या पायाला पायसाचा लेप केल्यानें तो वज्रदेही झाला. नंतर सर्वव्यापी परमात्मा समुद्रतीराला जाऊन आसनविधि करता झाला. सर्व स्रोतांचा निरोध करून त्यानें प्राण ब्रह्मांडीं नेले. इतक्यांत तेथे हातांत धनुष्यबाण घेतलेल्या जरानामक त्या मत्स्यघातक काळ्या कोळ्यानें हा हरिण आहे, असें समजून परमात्म्यावर बाण टाकला. नंतर तो जवळ जाऊन पाहतों तो शंख, चक्र, गदा वगैरे आयुधें धारण केलेला हा चतुर्भुज वासुदेव आहे, असें त्याला समजलें. तो भीतीनें थरथर कांपत हात जोडून म्हणाला, हे भगवंता! मी तुला ओळखिलें नाहीं; म्हणून मजंकडून अशी गोष्ट घडली; तरी माझा अपराध आपण क्षमा करा. विष्णु म्हणाले; शापाचा असाच अंत व्हावयाचा होता, तो आज तुजकडून घडला. माझ्या

कृपेनें तूं स्वर्गाला जा. जे कोणी येथें येऊन माझें दर्शन करतील तेही वैकुंठाला जातील. तूं येथें पायाला 'भल्ल' भाला मारलास म्हणून हें तीर्थ भल्लतीर्थ ह्या नांवानें प्रसिद्धी पावले. ह्याला स्वायंभुवमन्वन्तरांत हरिक्षेत्र म्हणत असत. असें म्हणून कृष्ण अंतर्धान पावले. लुब्धकही स्वर्गाला गेला. येथें स्नान करणारे माझ्या कृपेनें वैकुंठी जातात. येथें श्राद्ध करणाराचे पितर तृप्ति पावतील. ह्या उत्तम क्षेत्राला येऊन भल्ल-तीर्थांत स्नान व चतुर्भुज भगवानाचें दर्शन करावें. जे शिवभक्त असा अभि-मान करून माझा प्रिय जो वासुदेव त्याला नमस्कार करीत नाहींत ते पापी समजावे. माझा भक्त असून जो एकादशीस भोजन करतो, तो पापी माझ्या लिंगाची पूजा करण्यास योग्य नाहीं. जी तिथि विष्णूला प्रिय ती मलाही प्रिय आहे. तिला उपोषण न करणारा अति पापिष्ठ समजावा. जी स्त्री अथवा पुरुष भल्लतीर्थाजवळ भक्तीनें माझी पूजा करतात त्यांचा कधींहि गृहभंग होणार नाहीं. हें पापनाशक वैष्णव भल्लतीर्थाचें माहात्म्य सांगितलें. विष्णूच्या जवळ वायव्येला जो उत्तम कुंभ आहे तें प्रसिद्ध भल्लतीर्थ जाणावें. यात्रेचें संपूर्ण फल इच्छिणारानें येथें विद्वान् ब्राह्मणांना वस्त्रें व गाई दान कराव्या.

---

## अध्याय ३५३ वा.

### कर्दमालमहात्म्य.

नंतर सर्व पापनाशक कर्दमालतीर्थाला जावें. प्रलयकालीं पृथ्वी रसा-तळाला जात असतां भगवान् विष्णूनें वराहावतार धारण करून आपल्या दंष्ट्राग्रानें तेथेंच पृथ्वीचें धारण केलें. पृथ्वीला स्थिर करून विष्णु म्हणाले; मी येथें उभें राहून तुला धारण केली म्हणून येथें मी नित्य वास करीन. जे कर्दमालतीर्थांत पितृतर्पण करतील त्यांचे पितर कल्पांतपर्यंत तृप्ती पावतील. येथें यथाशक्ति श्राद्ध करणाराला सर्व तीर्थांत श्राद्ध केल्याचें फळ मिळेल. येथें स्नान करणाऱ्या मनुष्याला व मृत्यु पावणाऱ्या प्राणिमात्राला द्वीपांतरांत उत्तम धनाढ्य कुलांत जन्म येतो. हे पृथ्वी ! माझ्या दाढेच्या प्रहारानें जो तुझ्या

शरीरांतून तीर्थप्रवाह निघाला, त्यांत स्नान करणाराला तिर्यग्योनींत जन्म येणार नाहीं. पार्वती! येथील एक जुनी कथा ऐक. हरिणांचा एक कळप पाठलाग करून पारध्यांनीं पिटाळला. तो धावऱ्या धावऱ्या येऊन कर्दमालांत शिरला. तीर्थांत शिरतांच ते सर्व हरिण मनुष्यरूप झाले. हें पाहतांच आश्चर्यचकित झालेले पाठलाग करणारे पारधी तेथल्या माणसांना म्हणाले; आम्हीं पिटाळीत आणलेले हरिण कोणीकडे गेले. ते म्हणाले तेच हरिण आम्हीं मनुष्यरूप पावलों आहों. हा सर्व ह्या तीर्थाचा प्रभाव आहे, त्याला दुसरें कांहींही कारण नाहीं. हें ऐकून पारध्यांनींही धनुष्यबाण फेंकून देऊन कर्दमतीर्थांत स्नान केलें; व ते सर्व पातकांतून मुक्त झाले. पार्वती म्हणाली; कर्दमालाची उत्पत्ति, विधान व क्षेत्र-सीमा इत्यादि मला सविस्तर सांगा. हे पार्वति! ह्या कर्दमालाचा एक गूढ महिमा तुला सांगतों, पण हा फार गूढ आहे. सहसा कोणाला सांगूं नये. पूर्वी महा-प्रलयकालीं सर्व स्थावरजंगमात्मक नष्ट होऊन जलमय झालें. चंद्र, सूर्य, वायु व नक्षत्रें लोपलीं. ब्रह्मदेवाला सर्व जग जलरूप दिसलें. पृथ्वी जलांत मग्न होऊन पाताळाला गेली. तेव्हां यज्ञवराहानें वराहरूप धरून दंष्ट्रेच्या अग्रानें पृथ्वी वर आणिली. वेद हे ज्याचे पाय, यज्ञस्तंभ ही दंष्ट्रा, यज्ञ हे दांत, स्रुची हें मुख, अग्नि ही जीभ, दर्भ हे रोम, ब्रह्म हें मस्तक, दिवस व रात्र हे डोळे, वेदांगें हीं ज्याचे कानांतील अलंकार, घृत हें ज्याचें नाक, स्रुव हें मुसकट, सामगायन हा ज्याचा शब्द, प्राग्वंश हा ज्याचा देह, दक्षिणा हें हृदय, महासत्र हा आनंद, उपाकर्म हे ओंठ, प्रवर्ग्य हें भूषण, अनेक छंद हा गमनमार्ग, ब्रह्मोक्तक्रम हा पादक्षेप असें रूप धारण करून यज्ञवराहानें पृथ्वी वर काढिली. पृथ्वीला उचलीत असतां त्याच्या दाढेचें टोंक जेथें चिखलानें भरलें त्या क्षेत्राला कर्दमाल म्हणतात. जेथें दाढ पूर्वीप्रमाणें झाली त्या क्षेत्राला दंडोद्भेद नांव पडलें. दाढेनें ज्या क्षेत्रांत दोन कोसपर्यंत पाणी उडविलें तें विष्णुक्षेत्र समजावें. कोणत्याही देशांतले ते रहिवासी असोत जे दंडोद्भेदांत मृत्यु पावतात त्यांना सहस्र कल्पपर्यंत विष्णुलोकप्राप्ती होते. जो कर्दमालांत वराहाचें दर्शन घेतो त्याचें कोट्यावधि हिंसांचें पातक नष्ट होतें. त्याच्या दर्शनानें दहा जन्मांतलें पातक नष्ट होते. हजारों जन्मांत घडलेलें पातक कर्द-मालांत यज्ञवराहदर्शनानें नष्ट होतें. सहस्रकोटि सुवर्ण व शतकोटि गाई दान

केल्याचें पुण्य यज्ञवराहाच्या दर्शनानें मिळतें. ह्या भयंकर कलियुगांत यज्ञवराहाशिवाय दुसरा कोणताही देव दर्शनानें मुक्ति देण्यास समर्थ नाहीं. हें संक्षेपानें कर्दमालाचें महात्म्य सांगितलें.

---

# अध्याय ३५४ ते ३५९ वा.

## गुप्तेश्वरादिलिंगमाहात्म्य.

नंतर चंद्रानें तप केलेल्या स्थळाच्या पश्चिम व वायव्य त्यांच्या मधील कोपऱ्यांत गुप्तेश्वर आहे, त्याला जावें. चंद्र कुष्ठरोगानें लज्जित होऊन प्रभासक्षेत्रांत देवांचीं हजार वर्षें तप करीत राहिला होता. नंतर शंकर त्याला प्रसन्न झाले. त्यांनीं त्याचा क्षयरोगही नष्ट केला. अशारीतीनें चंद्र क्षयरोगांतून मुक्त झाला. चंद्रानें येथें लिंग स्थापन करून गुप्त राहून तप केलें म्हणून ह्याला गुप्तेश्वर म्हणतात. ह्याच्या दर्शनानें व स्पर्शानें कुष्ठरोग नष्ट होतो. सोमवारीं गुप्तेश्वराचें पूजन भक्तिपूर्वक करणाराच्या कुलांत कधीं कुष्ठी पुरुष जन्मत नाहीं. नंतर हिरण्येच्या पूर्वेला बहुसुवर्णस्थळीं असलेल्या बहुसुवर्णेश्वराला जावें. धर्मपुत्रानें येथें बहुसुवर्णेश्वर नांवाचें लिंग स्थापन करून मोठा यज्ञ केला. हें लिंग भक्ताला सर्व यज्ञांचें फळ देत असल्यानें ह्याला सर्वेश्वरही म्हणतात. येथील लिंग सरस्वतीच्या जलानें बुडलेलें आहे. येथें पिंडदान करणाराच्या कुलाचा उद्धार होऊन तो रुद्रलोकाला जातो. ह्याची भक्तिपूर्वक षोडशोपचारें पूजा करणाराला कोटि पूजेचें फळ मिळतें. हे पार्वति! नंतर शुक्रस्थानाजवळ असलेल्या सर्व पापनाशक शृंगेश्वराला जावें. येथें स्नान करून यथाविधि शृंगेश्वराचें पूजन करणारा ऋष्यशृंगाप्रमाणें सर्व पातकांतून मुक्त होतो. नंतर क्षेत्राच्या ईशान्य भागांत व शृंगेश्वराच्या दक्षिणेस चार कोसांवर कोटिनगरांत कोटीश्वरनामक महालिंग आहे. त्याचें पूजन केल्यानें कोटियज्ञांचें फळ मिळतें. येथें यथाविधि स्नान करून जो कोटीश्वराचें पूजन करतो तो सर्व पातकांतून मुक्त होतो; व त्याला कोटियज्ञांचें फळ मिळतें. नंतर नारायणतीर्थाला जावें. त्याच्या ईशान्येला शांडिल्यतीर्थ नांवाची वापी

आहे. त्या वापींत स्नान करून शांडिल्याचें पूजन करावें. ऋषिपंचमीला जी स्त्री ह्याचें पूजन करिते ती स्त्री जाणून किंवा अजाणतां झालेल्या रजोदोषांतील स्पर्शास्पर्शांच्या पातकांतून मुक्त होते. नंतर शृंगसरनामक स्थानीं जावें. तेथें शृंगारेश्वर आहे. गोपीयुक्त कृष्णानें तेथें अनेक शृंगार केले, म्हणून ह्या लिंगाला शृंगारेश्वर हें नांव पडलें. शृंगारेश्वराचें यथाविधि पूजन करणाराला कधींहि दारिद्र्य अथवा दुःख भोगावें लागत नाहीं.

---

## अध्याय ३६० ते ३६५ वा.

### मार्कंडेश्वरादिलिंगमहात्म्य.

नंतर हिरण्येच्या तीरीं असलेल्या घटिकास्थानीं जावें. तेथें पूर्वी मार्कंडेय ऋषीला ध्यानयोगानें एका घटकेंत सिद्धि झाली. तेथें मार्कंडेयानें मार्कंडेश्वर नांवाचें लिंग स्थापन केलें आहे. त्याचें दर्शन व पूजन केल्यानें सर्व पाप शान्त होतें. हे पार्वति ! नंतर माण्डूक्यायनानें स्थापिलेल्या मण्डूकेश्वराला जावें. तेथें कोटिह्रद, कोटीश्वर व मातृगण हे सर्व मनोरथ पूर्ण करणारे आहेत. कोटिह्रदांत स्नान करून कोटीश्वर व मातृगण ह्यांची पूजा केल्यानें मनुष्य दुःख व शोक यांतून मुक्त होतो. त्याच्या पूर्वेला चार कोसांवर त्रितकूप आहे, त्यांत सर्व तीर्थें राहिलीं आहेत. शंकर म्हणतात; गोष्पदाच्या उत्तरेला चार कोसांवर वलाय नांवाचें क्षेत्र आहे. तेथें एकादश रुद्रांचीं अजैकपाद्, अहिर्बुध्न्य इत्यादि नांवानीं प्रसिद्ध अशीं लिंगें आहेत. त्यांचें पूजन केल्यानें सर्व पातकांतून मुक्तता होते. नंतर हिरण्येच्या तीरीं तुण्डपुर नांवाचें स्थान आहे तेथें जावें. तेथें घर्घर नांवाचा डोह आहे. तेथें कन्देश्वरनामक लिंग आहे. हे पार्वति ! मीं आपली जटा तेथें बांधली. घर्घर ह्रदांत स्नान करून कन्देश्वराचें पूजन करावें; म्हणजे पातकापासून मुक्तता होऊन शिवशासन घडतें. हे पार्वति ! नंतर इन्द्रेश्वराच्या पश्चिमेस व अर्कभास्कराच्या पूर्वेस संवर्तेश्वरनामक लिंग आहे, तेथें जावें. पुष्करिणींत स्नान करून संवर्तेश्वराचें पूजन केलें असतां दहा अश्वमेध यज्ञ केल्याचें पुण्य

लागतें. हे पार्वति ! हिरण्येच्या उत्तरेला सिद्धिस्थानें आहेत. महर्षि तेथेंच सिद्धि पावले. तेथें असंख्य लिंगें आहेत, त्यांचें वर्णन करणें शक्य नाहीं. परंतु त्यांत शंभरांपेक्षां जास्त लिंगें प्रसिद्ध आहेत. वजिणीच्या तीरीं एकोणतीस लिंगें आहेत. न्यंकुमतीच्या तीरीं बाराशें आहेत. कपिलेच्या कांठीं प्रसिद्ध अशीं साठ लिंगें आहेत. सरस्वतीच्या कांठच्या लिंगांची गणती होणें शक्य नाहीं ह्याप्रमाणें पंचमुखलिंगें येथें सुशोभित आहेत. प्रभासांत सरस्वती पांच प्रवाहांनीं वाहते; व त्यानें अठ्ठेचाळीस कोसाचें क्षेत्र व्यापिलें आहे. तेथील विहिरी व तळीं ह्या सर्वांत सरस्वतीचेंच उदक आहे; म्हणून तेथील उदक प्राशन करणारे धन्य आहेत. उत्तम भावना असली म्हणजे प्रभासांतील कोणत्याही उदकांत स्नान केलें तरी तें सरस्वतीचें स्नान घडतें. जें सोमेश्वर नांवाचें प्रभासांतलें प्रसिद्ध लिंग सांगितलें, तें कलापूर्ण ज्योतिर्लिंग आहे. प्रभासांतलें कोणतेंही लिंग सोमेश्वराच्या भावनेनें पूजिलें तरी सोमेशाच्या पूजेचें फळ मिळतें.

प्रभासक्षेत्रमाहात्म्य समाप्त. ॥ ७-१ ॥

# स्कंदपुराण.

## प्रभासखंड ७

## ( वस्त्रापथक्षेत्रमाहात्म्य २ ).

### अध्याय १ ला.

#### दामोदरमाहात्म्य.

शंकर म्हणतात, पार्वति ! आतां तुला वस्त्रापथक्षेत्राचें माहात्म्य सांगतों. ज्या गंगाकांठीं ऋषि, ब्राह्मण व देव मोठमोठे यज्ञ करितात, अशा पुण्यभूमीचे ठिकाणीं एक गज नांवाचा राजा रहात असे, त्यानें राज्योपभोगाचा त्याग केला असून तो नित्य गंगास्नान करीत असे. त्याची पतिव्रता स्त्रीहि त्याच्याच बरोबर येऊन नित्य स्नानदानादि करीत असे. ह्याप्रमाणें तो त्याचा हजार वर्षेपर्यंत एकसारखा क्रम चालू होता. एकदां त्यानें आपल्या घरीं गंगातीरनिवासी ब्राह्मणांना आमंत्रण देऊन त्याचा अन्नपानादिकांनीं सत्कार केला. नंतर तो गजराजा त्या ब्राह्मणांस ह्मणतो कीं, ज्यायोगें मनुष्याला मोक्षप्राप्ती होईल असा एकादा उपाय सांगा. ह्याप्रमाणें राजाचा प्रश्न ऐकून त्यांपैकीं एक भद्र नांवाचा ब्राह्मण राजाला म्हणतो कीं, राजा ! जेवढीं जगांत तीर्थे आहेत तीं सर्व जलरूप आहेत; व जेवढे जगांत देव आहेत तेवढे सर्व पाषाणमय आहेत; करितां प्रत्येकांनीं तीर्थे आणि देव यांचें स्वरूपध्यान आपल्या आत्म्याचेच ठिकाणीं करावें. जे आत्मावलोकन करीत नाहींत ते अज्ञानी समजावेत. आतां तुला जर बाह्यतीर्थांचें व देवतांचें ज्ञान पाहिजे असेल तर गंगा, यमुना, सरस्वती, दृषद्वती, गोमती, तापी, कावेरी वगैरे नद्यांचे कांठीं अनंत तीर्थें आहेत. तसेंच मत्स्यादि विष्णूचे अवतार, नरनारायण, दामोदर वगैरे जगांत मुख्य देवता आहेत. मार्गशीर्ष महिन्यांत कान्यकुब्ज क्षेत्रांत रहावें, ह्मणजे मुक्ति मिळते. पौषांतील पौर्णिमेला अर्बुदक्षेत्रीं वास करावा, ह्मणजे मोक्षप्राप्ति होते. माघांत गयेला जाऊन पितृश्राद्ध करावें, ह्मणजे पितृतृप्ति होते. फाल्गुनांत हिमालय पर्वतावर जाऊन रहावें ह्मणजे श्रेष्ठपदाची प्राप्ति होते.

चमांत प्रभासक्षेत्रीं व वैशाखांत अवंतिक्षेत्रीं राहावें; म्हणजे मोक्षप्राप्ति होते. ज्येष्ठी पौर्णिमेस ज्येष्ठा नक्षत्र आलें असतां त्रितकूपकतीर्थांत श्राद्ध केल्यानें तीन युगेंपर्यंत स्वर्गवास घडतो. यमुनातीरीं वृंदावनांत चवदा दिवस रहाणारा वैकुंठपदाला जातो. श्रावणांतील पौर्णिमेस पूर्वसमुद्रावर स्नान व श्राद्ध करणारा सर्व दुःखांतून मुक्त होतो. भाद्रपदांत प्रभासांत शिवालिंगार्चन देवत्व देतें. आश्विनांत चंद्रभागेंत स्नान व श्राद्ध करणारास सहस्र युगें स्वर्गवास घडतो. सर्वांत श्रेष्ठ प्रभासक्षेत्र असून त्याचें पर्व कार्तिक, ह्यांतही भीष्मपंचक, त्यांतही द्वादशी श्रेष्ठ आहे. गज म्हणाला; हें प्रभास तीर्थ मला विस्तारानें वर्णन करून सांगा. भद्र म्हणाला; काशी, प्रभास व प्रयाग हीं तीर्थें सर्वांत श्रेष्ठ आहेत. सोमनाथाच्या जवळ उदयज्ञपर्वताच्या पश्चिमेला रैवतक नांवाचा पर्वत आहे. त्याच्या अनेक धातुमंडित कड्यावरून नदी वहाते. त्या पर्वतावर संतान-नांवाचे वृक्ष आहेत. ते पुण्यवानांना सोन्याचे दिसतात. त्या पर्वतावर रसा-यनवेत्ते लोक रहातात. तेथील पक्षी व हिंसक पशुही क्षेत्रमाहात्म्यानें क्रूर कर्मं करीत नाहींत. तेथें मृत्यु पावलेले प्राणिमात्र व वायूनें गलित झालेलीं पत्रें पुष्पें सुद्धां नदीच्या जलस्पर्शानें मोक्ष पावतात. ती नदी पृथ्वीला विदा-रण करून पाताळांतून वर आली आहे. पूर्वीं वासुकी दामोदरतीर्थांत स्नान करण्याकरितां त्याच रस्त्यानें आला; व चंद्र यज्ञादिक कर्मांनीं रोगमुक्त होऊन त्याच रस्त्यानें गेला. बली, हरिश्चंद्र, नहुष, नल, नाभाग, अंबरीष इत्यादिकांनीं त्याच ठिकाणीं असंख्य दान, धर्म व अन्नदान करून विष्णुलोक मिळविला. येथें यथाशक्ति दान करणारा वैकुंठाला जातो. पुण्यमार्गांत अनेक विघ्नें येत असल्यानें मनुष्याचें तेथें जाणें होत नाहीं. रेवतीकुंडावर उत्तम फळ दान दिलें असतां स्त्रीला उत्तम पुत्र व संतति मिळते. पांच दगडांचें सुंदर शिवमंदिर बांधणारांला पांच हजार वर्षें स्वर्गवास होतो. पंचरंगी निशाण देवमंदिरावर लाविलें असतां त्यांतील सुतांच्या संख्ये इतकीं वर्षें स्वर्गवास घडतो. तेथें दोन कोस विस्ताराचें शिवक्षेत्र वस्त्रापथ नांवाचें आहे, त्याचें दर्शन व पूजन केल्यानें शिवलोक प्राप्त होतो. हें भद्रानें सांगितलेलें क्षेत्रमाहात्म्य ऐकून गजराजा चारीवर्णांचे असंख्य लोक बरोबर घेऊन कार्तिकांत दामोदराच्या दर्शनाकरितां आला. तेथें त्यांनीं पंचाग्निसाधन, जलशयन, गायत्रीजप, सावित्रीजप, सरस्वतीजप, सूक्तजप, द्वादशाक्षराचिंतन वगैरे मार्गांनीं बहुत काळ तपश्चर्या केली. कित्येकांनीं एकभक्त, नक्तोपवास, अयाचित वगैरे व्रतें केलीं; आणि शेवटीं प्राप्त झालेल्या उत्तम विमानांत बसून सर्वांसह गंधर्व, सिद्ध, चारण यांच्यासह मोक्षपदाला गेला. हें माहात्म्य नित्य पाठण करणारा ब्रह्मवेत्ता होतो.

## अध्याय २ ते ५ वा.

### भव, उन्नाविल व गंगेश्वरमाहात्म्य.

शंकर म्हणतात, तेथून वस्त्रापथाला जावें. तें प्रभासाचें नाभिस्थान आहे. तेथें असलेलें स्वयंभूलिंग भव या नांवानें प्रसिद्ध आहे. या भवलिंगाचें पूजन करणाराला केदारयात्रेचें फळ मिळतें. त्याचें चैत्रांत दर्शन घेतलें असतां प्राणी पुनर्जन्मांतून सुटतो. वैशाखांत दर्शन घेतलें असतां मुक्ति मिळते. भवाचें दर्शन करणारा प्रेतयोनि व नरकवास यांतून सुटतो. ज्यांचें भव-लिंगाचेठिकाणीं चित्त असेल ते अतिशय धन्य आहेत. तेथें गोदान ब्राह्मणभोजन व पिंडदान करावें. ह्या वस्त्रपथक्षेत्रांत अनेक तीर्थें आहेत. त्यांतून मुख्य सांगतों. दामोदरांतील नदीला स्वर्णरेखा असें ह्मणतात. तसेंच ब्रह्मकुंड, ब्रह्मेश्वर, कालमेघ, दामोदर व भव हीं स्थानें तेथून चार कोसांवर आहेत. तेथेंच इंद्रेश्वर, रैवतपर्वत, उज्जयंत, कुंभेश्वर, भीमेश्वर, महाप्रभक्षेत्र. तैलसा-रणिक हीं दहा कोसविस्ताराचीं क्षेत्रें आहेत; सर्वपापनाशक मृगीकुंड तेथेंच आहे. हे पार्वति! हीं वस्त्रापथक्षेत्रांतील तीर्थें तुला संक्षेपानें सांगितलीं. तेथून मंगल, स्थिलीच्या पश्चिमेस चार कोसांवर उन्नाविल नांवाचें क्षेत्र आहे. त्याठिकाणीं पूर्वीं भीमानें उन्नकाला खाऊन टाकलें. तेथून पाताळांत पोहोंचणारें एक भुयार आहे. त्यांत सिद्धस्थान नांवाचीं सोळा लिंगें आहेत. तेथें सोन्याचा प्रदेश होता. संपत्तीची इच्छा करणारानें त्याचें दर्शन करावें. तेथून मंगलाच्या पश्चिमेला गंगेचा प्रवाह व सुरार्क नांवाचें लिंग आहे. यात्रा सफल होण्याकरितां तेथें जाऊन पिंडदान व ब्राह्मण भोजन करावें. कलिजन्य पापाचा नाश करणारें हें उत्तम तीर्थ तुला सांगितलें. हें कधींही दुष्ट माणसाला सांगू नये.

## अध्याय ६ वा.

### मृगाननाभोजवृत्तांत.

तेथून मंगलाच्या पश्चिमेला जाऊन सिद्धेश्वराचें दर्शन घ्यावें. तेथें कोटि तीर्थस्नानाचें फल देणारें चक्रतीर्थ आणि लोकेश्वर व इंद्रेश्वर हीं स्थानें आहेत त्यांचें दर्शन करून यक्षवनाला जावें. मंगलाच्या पश्चिमेला सर्व इच्छा पूर्ण करणारी यक्षेश्वरी देवी आहे. तिचें पूजन करून पुनः वस्त्रापथाला जावें; व रैवतक पर्वताला जाऊन यथाविधि यात्रा करावी. तेथें मृगीकुंड आदिकरून

कोट्यावधि तीर्थें आहेत. मुक्तिशिखरावर सीमालिंग आहे. तेथें दहाकोटि तीर्थें आहेत. येथेंच पूर्वी यादव सिद्धि पावले. येथें शतार्बुद, सहस्रार्बुद, गजेंद्रपद, रसकूपिका, सप्तकुंडें, अंबिकादेवी, प्रद्युम्न, सांब, मृगीकुंड, कालमेघ, क्षेत्रपाल-स्वरूपानें महोदधि, दामोदर व भव हे आहेत. पार्वती म्हणाली; आपण मला अनेक पवित्र नद्या, तीर्थें, व क्षेत्रें, व ब्रह्मदेव हे सांगितलेत, तसेंच विष्णु व शंकर यांचीं व ऋषींचीं अनेक स्थानें, नगरें, दिव्य क्षेत्रें सागून शेवटीं सांगितलें किं, प्रभासक्षेत्र हें सर्वांत श्रेष्ठ आहे; परंतु त्याचें कारण सांगितलें नाहीं; म्हणून आतां त्या क्षेत्राचा प्रभाव, तें कोठें आहे? स्वयंभू रुद्र भवरूपानें तेथें कां राहिला? हें सर्व सांगा. असा पार्वतीनें प्रश्न केला असतां शंकर म्हणाले; बरें आहे, तुला पूर्वीं वस्त्रापथ-क्षेत्राचें माहात्म्य व नंतर भवलिंगाचें माहात्म्य सांगतों, ऐक. कान्यकुब्जदेशांत भोजनांवाचा सर्व राजचिन्हांनीं युक्त असा राजा उत्तमरीतीनें प्रजापालन करीत असे. त्याला अनेक चमत्कार पाहण्याची फार उत्कंठा असे. एके दिवशीं एका वनरक्षकानें येऊन भोजाला सांगितलें किं, मी वृक्षाच्छादित-पर्वतावर फिरत असतां तेथें हरिणींच्या कळपांत एक हरिणीसारखी सुंदर स्त्री पाहिली. ती हरिणाप्रमाणें क्रीडा करीत नेहेमीं तेथेंच असते. हें ऐकून राजानें त्याला उत्तम बक्षीस दिलें; आणि आपण उत्तम शृंगारलेल्या उमद्या घोड्यावर बसून मोठें निःशस्त्र सैन्य बरोबर घेऊन त्या पर्वतावर जावयास निघाला. त्यानें आपल्या सैन्याला असा हुकुम केला कीं, सर्वांनीं जाऊन त्या पर्वताला वेढा द्यावा, परंतु एकाही हरणाची शिकार कोणीही करतां कामां नये. सैन्यानें पर्वताला वेढा दिला व राजानें तो हरणांचा कळप पाहिला. त्यांत राजानें पाहिलें तों सर्व शरीराचा आकार स्त्रीसारखा असून तिचें तोंड मात्र हरिणीसारखें होतें. हरण पळूं लागले असतां सैनिकांनीं टाकलेल्या फासांत इतर हरणांबरोबर ती स्त्रीही सांपडली. राजानें आनंदित होऊन तिला आपल्या नगरांत नेली, नंतर तिला न्हाणें; धुणें व वस्त्रालंकार घालून अंतःपुरांत ठेवली. पुढें तूं कोण आहेस तुझें सर्व शरीर स्त्रीसारखें असून हरणाचें तोंड कां? वगैरे प्रश्न राजानें तिला केले; परंतु ती कांहीं बोलेना; व कांहीं खाई पीईना. राजाही अस्वस्थ झाला व त्यानें खाणें पिणें सोडलें. नंतर राजानें सुज्ञ, विद्वान्, सुशील, बुद्धिमंत ब्राह्मणांना बोलावून आणून विचारलें कीं, ही स्त्री असून हिचें तोंड हरणाचें कां? ही स्त्रीमुख होऊन भाषण वगैरे करण्याला काय इलाज करावा. ब्राह्मण म्हणाले; कुरुक्षेत्रांत सारस्वतनांवाचा ब्राह्मण आहे, त्यानें सांगितलें असतां ही मृगी स्वतःच आपलें चरित्र सांगेल. हें ऐकून राजा तिकडे गेला व सरस्वतींत स्नान करून जपध्यान करणाऱ्या त्या ब्राह्मणाला साष्टांग नमस्कार करून हात जोडून त्याजवळ बसला त्यावेळीं सारस्वत ब्राह्मण राजाला

म्हणाला; राजा! तुझ्या येण्याचें कारण मी समजलों. धरून आणलेल्या मृगाननेविषयीं कौतुक वाटून तूं आला आहेस, ठीक आहे. मी आज्ञा केली असतां मृगानना सर्व तुला सांगेल असें म्हणून लागलाच सारस्वत निघाला; व राजनगराला आला. मृगाननेनें सारस्वताला पाहिल्याबरोबर हा तपःपूत ब्राह्मण माझें सर्व जाणत आहे; व याजवर भवाची कृपा आहे, असें जाणिलें. नंतर सारस्वताच्या आज्ञेनें महयज्ञ केला व बोराएवढा पुरोडाश मृगाननेला दिला. मृगाननेनें तो भक्षण केल्यावर सुवर्णपात्रांत कलशोदक घेऊन तिला अभिषेक घालून मनुष्यवाणीचा उपदेश सारस्वतानें मृगाननेला केला असतां सारस्वताला नमस्कार करून मृगानना बोलूं लागली. ती म्हणाली; माझ्या सांगण्याचा खेद मानूं नकोस. यापूर्वीं सातव्या जन्मीं तूं कलिंगराजाचा मुलगा होतास. तूं लहान असतांच बाप निवर्तल्यानें मंत्र्यांनीं तुला राज्याभिषेक केला. मी वंगराजाची मुलगी, बापानें मला तुला दिली असतां मी अतिशय सुंदर होत्यें म्हणून तूं मला पट्टराणी केलीस. तूं अतिशय अधर्मी झालास तेव्हां जवळच्या राजांची स्वारी होऊन तुझें राज्य शत्रूनीं हरण केलें. तूं त्यांना शरण गेलास तरी ते दुष्ट असल्यानें त्यांनीं तुला मारिलें. मी तुजबरोबर सती गेल्यें. तूं पापी होतास तरी माझ्या पुण्यानें तुला ब्राह्मणाचा जन्म झाला. मी ब्राह्मणकन्या होऊन मालदेशांत तुझी स्त्री झाल्यें. तूं जरी धनिक होता तरी कांहींही दानधर्म तूं केलास नाहींस. कधीं पितरांचें श्राद्धही केलें नाहींस. मी तुलाच अनुसरणारी असल्यानें माझेही हातून दानधर्म घडला नाहीं. अतिशय द्रव्य सांचवून तूं मेलास. जवळ पुष्कळ द्रव्य असल्यानें मी सती गेलें नाहीं. पुढें माझ्या देखत तें सर्व द्रव्य भाऊबंदांनीं हरण केलें. पुढें मीही मृत्यु पावल्यें. तुला सर्पाचा जन्म आला. मी ब्राह्मणाची मुलगी झाल्यें. माझें आठवें वर्षीं ब्राह्मणाचे मुलाबरोबर माझें लग्न झालें. तूं दावा साधण्यासाठीं माझेच घरीं रहात होतास. एके रात्रीं तूं त्या माझ्या नवऱ्याला चावलास तेव्हां तो मृत्यु पावला. लोकांनीं तुलाही ठार केलें. आईबापांनीं अति दुःख करून मला सोंवळी केली. नंतर मी पातळें नेसून तीर्थयात्रा करीत असें. तूं मकरजन्म घेऊन गोदावरींतील शिवालयतीर्थांत राहिलास. मी भीमेश्वरच्या यात्रेंत शिवालयांत स्नानाला उतरलें. मकररूपानें राहिलेल्या त्वां मला ओढून नेलेंस. लोकांनीं तुला मारून मला सोडविलें; पण मी मरण पावल्यें. तेव्हां माझें दहन केलें व राख तीर्थांत टाकिली. तुला स्त्रीहत्या घडल्या व पारध्याचा जन्म प्राप्त झाला. मला मकरानें ओढून नेल्यानें क्रौंच पक्ष्याचा जन्म झाला. एक क्रौंच कामपीडित होऊन माझ्याशीं रतीलंपट झाला असतां व्याधरूपानें असणाऱ्या त्वां त्याला मारिलें, हें तुझें दुष्ट कृत्य पाहून ऋषीनें तुला सिंह होशील असा शाप दिला. तूं पायां पडून ऋषीची प्रार्थना केलीस, तेव्हां ऋषी म्हणाले; माझें वचन खोटें होणार नाहीं. पण तूं

रैवतकपर्वतावर सिंह होशील; व वस्त्रापथक्षेत्रांत तुला मुक्ति मिळेल. ह्या शापाच्या दुःखानें व्याध मृत्यु पावला. क्रौंचपक्षीण मृत्यु पावून रैवतकपर्वतावर हरिणी झाली. व्याधही त्या पर्वताच्या दरींत सिंहजन्म पावला. हरिणी कळपामध्यें आनंद पावत असे, परंतु सिंहत्व पावलेला व्याध तिला धरण्याला टपत होता. भवालिंगाच्या पश्चिमभागीं रैवतकपर्वतावर कळपांत आनंद पावणाऱ्या हरणीवर सिंहानें उडी घातली. हरिण पळून गेले. सिंह हरिणींच्या पाठीस लागला. हरिणीनें येऊन भवलिंगाच्या समोर नदींत उडी मारली. सिंह पाण्यांत बुडून मेला. हरिणीचें शरीर स्वर्णरेखेंत पडलें; परंतु मुखमात्र वेळवाला लटकून राहिलें. हें सर्व सारस्वत मुनींनीं पाहिलें आहे. स्वर्णरेखेंत शरीर पडल्यानें तूं कान्यकुब्ज देशांत भोज या नांवानें प्रसिद्ध राजा झालास. मी हरिणीच्या उदरीं जन्मास आलें. स्वर्णरेखेंत पडलेलें माझें सर्व शरीर मनुष्याकार पावलें; पण डोकें वेळवावर लटकल्यानें नदींत पडलें नसल्यानें तें हरिणाचेंच राहिलें.

---

## अध्याय ७ वा.

### मृगाननेचें भोजाशीं लग्न.

भोज म्हणाला; तूं हरिणीचे पोटीं मनुष्यरूप कशी झालीस ? तुला कोणी वाढविलें? मृगी म्हणाली; कन्यकावनांत उद्दालकनांवाचा ऋषि गंगातीरीं तपश्चर्या करीत असे. तो पहांटे उठून वनांत लघवीला बसला असतां तेथें त्याचा वीर्यबिंदु पडला. तेथें एक हरिणी चरत आली तिनें तो भक्षण केला. माझें वीर्य भक्षण केलेंस म्हणून तुला मुलगी होईल. तिचा आकार माझ्यासारखा व तोंड तुझ्यासारखें होईल. पुढें दैवयोगानें तिला ज्ञान होईल. असें उद्दालक बोलल्यावर मी हरिणीपोटीं जन्मलयें. तूं युद्धांत शत्रूला पाठ दाखवून पळालास म्हणून तुला असले पापयोनींत सात जन्म आले. मी पतिव्रताधर्मांप्रमाणें सहगमन केल्यानें तुझें पातक दग्ध केलें. तुझ्यावांचून दुसरा पति मला होऊं नये असें मी मागितलें असतां आकाशवाणीनें पूर्वीं मला पाप भोगण्याविषयीं सांगितलें. जर कोणी वस्त्रापथांत जाऊन हरिणीचें मस्तक स्वर्णरेखेच्या उदकांत टाकील, तर माझें मुख मनुष्याचें होईल. राजा ! तूं मला या विद्रूपस्थितींतून सोडीव. हा वृत्तांत सर्व लोकांनीं आनंदानें ऐकिला. राजानें सारस्वतऋषीकडे इंगितयुक्त दृष्टीनें पाहिलें. सारस्वतानें राजाला मृगाननेच्या सांगण्याप्रमाणें करण्याला आज्ञा दिली. राजानें आपला सेवक अरण्यांत पाठविला; व सारस्वताच्या शिष्यानें वेळूच्या जाळींत असलेलें हरिणीचें तोंड प्रतीहारीला दाखविलें. प्रतीहारीनें

तें स्वर्णरेखेंत टाकिलें व स्नान आणि भवलिंगाचें पूजन करून तो शिष्यांसह नगराला आला. सारस्वतानें मृगाननेकडून चांद्रायणव्रत करविलें. व्रत पूर्ण होतांच तिचें मुख उत्तम तेजःपुंज कमलगंधानें युक्त व मनोरम झालें; त्यायोगानें ती देवीप्रमाणें सुंदर दिसूं लागली. तिची पूर्वस्मृति नष्ट झाली. भोजराजानें तिच्याशीं विवाह करून तिला पट्टराणी केली. हे पार्वति ! हा देश सर्वांत श्रेष्ठ असून गंगादिक नद्या स्वर्णरेखेंत राहतात व ब्रह्मादिक देव ज्यापासून झाले तें भवलिंग येथें आहे, करितां हें क्षेत्र सर्वांत श्रेष्ठ आहे. जो स्वर्णरेखेंत स्नान व तर्पण करून भवलिंगाचें पूजन व शिवनामाचा स्तोत्रपाठ करतो, तो देवांना स्तुत्य असा शिवरूप होऊन स्वर्गाला जातो.

---

## अध्याय ८ ते ९ वा.

### भवोत्पत्ति.

भोजराजा म्हणाला,–हे मुने ! मी वस्त्रापथक्षेत्र, रैवतकपर्वत, व स्वर्णरेखेचें जल यांचें माहात्म्य ऐकिलें. मला तीर्थोत्पत्ति कथन करा. भव हा ब्रह्मादिकां- पैकीं कोणता ? स्वर्णरेखा ही कोण ? येथें ब्रह्मादिक कां आले ? भगवान् नारायण स्वतः कसा आला ? हिमालयाला सोडून भवानी व कार्तिकेय इंद्रा- दिकांसह कसे आले ? सारस्वत म्हणाला, सर्वपापनाशक हें सर्व तुला सांगतों. ब्रह्मदेवाचा दिवस संपल्यावर रुद्र सर्वांचा संहार करतो व तिनही देव एकरूप होतात. रात्र संपल्यावर फिरून तिघेही त्रिरूप होतात. ब्रह्मा रजोगुणी, विष्णु सत्त्वगुणी व रुद्र तमोगुणी आहे. ते अनुक्रमानें जगाची उत्पत्ति, पालन व संहार करतात. पूर्वी दक्षप्रजापतीला उत्पन्न करून सत्यलोकीं त्रिदेव त्रिरूप झाले; व सर्वदेवांसह कैलासपर्वतावर आले. मोठा कोण ? अशाविषयीं ब्रह्मदेव व रुद्र यांमध्यें वाद लागला; तेव्हां रुद्र ब्रह्मदेवाला मारायला धांवला. विष्णु मध्यें झाला व त्यानें ब्रह्मदेवाची समजूत घातली कीं, तुला वाद करणें योग्य नाहीं. जेव्हां तूं मी किंवा जग नव्हतें तेव्हां शंकर जळांत शयन करीत होता. त्यानें पूर्वी तुला उत्पन्न केलें व पुढें तूं मला उत्पन्न केलेंस. याच्याच कृपेनें मी कूर्मरूप धारण करून पृथ्वीचें धारण केलें. शंकराच्याच कृपेनें आपण अधिष्ठित आहोंत. तूं उत्पत्ति करतोस, मी पालन करतो व रुद्र उदा- सीन असून सर्वव्यापी आहे. शंकराच्या कृपेनें तुला पितामहत्व आलें आहे. हें ऐकून ब्रह्मदेवानें शंकराची प्रार्थना केली. शंकर म्हणाले; मी प्रसन्न आहें, वर माग. ब्रह्मदेव म्हणाला, मी त्रैलोक्य उत्पन्न केलें व भवदेवही उत्पन्न

केला; म्हणून मला पितामहमहत्व आलें पाहिजे. विष्णूनें अनुमोदन दिल्या-वरून रुद्रानें ब्रह्मदेवाला तसा वर दिला व तो अंतर्धान पावला. ब्रह्मदेव मेरु-पर्वतावर तपाचरण करूं लागला. ब्रह्मदेवानें अथर्ववेदाचा उच्चार करतांच त्याच्या मुखांतून संसारनाशक अर्धनारीनटेश्वर रुद्राची उत्पत्ति झाली. रुद्रानें आपलें स्त्रीरूप व पुरुषरूप निराळें केलें व पुरुषरूपाचे अकरा भाग केले. भवानी महादेवाच्या आज्ञेनें ब्रह्मदेवाकडे जाऊन ब्रह्मदेवाच्या आज्ञेनें दक्षाचें उदरीं सती नावानें उत्पन्न झाली. ब्रह्मदेवाच्या आज्ञेनें दक्षानें ती रुद्राला दिली. रुद्रा! सृष्टि कर; असें ब्रह्मदेव रुद्राला म्हणाला असतां रुद्र म्हणाला तें माझें कर्तव्य नव्हे; तूं उत्पत्ति कर. विष्णु पालन करील व मी संहार करीन. सत्वरजतमोमय लोक तूं उत्पन्न कर. जेव्हां तुला जरूर लागेल तेव्हां राजस, तामस व सात्त्विक रूपें तूंच घे. असें ब्रह्मदेवाला सांगून रुद्र सतीला घेऊन कैलासावर राहिला. नंतर एकदां दक्ष कैलासपर्वतवर गेला असतां रुद्रानें त्याची उत्तम पूजा करून बहुमान दिला; परंतु त्यानें दक्षाचा संतोष झाला नाहीं. पुढें कांहीं दिवसांनीं सती दक्षाकडे आली असतां दक्षानें सतीची व रुद्राची अति निंदा केली, हें सतीला सहन न होऊन तिनें श्वेतवस्त्र परिधान केलें आणि देह दग्ध केला व रुद्रच मला पुढें भर्ता व्हावा; आणि हिमालय व मेना यांचे उदरीं जन्म व्हावा; अशी याचना केली. हिमालयानें तप करून रुद्राला प्रसन्न केलें. सती तुझी कन्या होईल; व देवकार्याकरितां मी तिला वरीन, असा रुद्रानें हिमाचलाला वर दिला. नंतर सती हिमाचलाचे घरीं पार्वती या नांवानें अवतीर्ण झाली. पुढें तिनें शंकरालाच वरिलें. एकदां शंकर आनंदानें कैलासीं बसले असतां पार्वती म्हणाली. आपला संतोष कोणता? दान, तप, नियम, कर्म, मंत्र, स्नान, धूप, पुष्प, पत्र, स्तुति, साहस, नैवेद्य, होम, कष्ट, अर्घ्य, हीं आपणांस कशीं आवडतात; व तीं कशीं करा-वीत? ह्या माझ्या सोळा प्रश्नांचा उलगडा करा. शिव म्हणाले; गुरूच्या आज्ञेनें केलेला पूजाप्रकार मला आवडतो व ह्यानेंच त्याला संतोष होतो. प्राण्याला अभय देणें हें माझें आवडतें दान आहे. परस्त्री वर्ज्य करणें हें माझें आवडतें तप आहे. लोकरंजन हा नियम, 'ॐ नमः शिवाय' हा मंत्र, पापत्याग हें स्नान, गुग्गुळाचा धूप, धोतऱ्याचें फूल, बेलाचें पान, 'शिव शिवाय' ही स्तुति, युद्धांतलें साहस, गाईचा हंतकार हा नैवेद्य, पूर्णाहुति होम, यतींची शुश्रूषा हे कष्ट व सूर्याला त्रिकाल अर्घ्यदान हीं मला अत्यंत प्रिय आहेत. दया, सत्य, करुणा, अस्तेय व दंभपिशुनतावर्जित यत्किंचितही दान मला फार प्रिय आहे. इतकें बोलत आहेत इतक्यांत तेथें विष्णु आले. विष्णु म्हणाले; आपण वर देतां व मग दैत्य उन्मत्त होतात. आपण पत्रमात्रानें तुष्ट होतां मग कष्टदायक भक्ति करणार कोण? कोणी यज्ञयागादिक करीत नाहींत,

देवांना हविर्भाग मिळत नाहींत. अशारीतीनें मी त्रैलोक्य पालन करण्यास समर्थ नाहीं. रुद्र म्हणाला; मला इंद्राशीं किंवा ब्रह्मदेवाशीं काय कर्तव्य आहे? माझी देवांनीं वर देण्यांत योजना केली. माझा स्वभाव पालटणार कसा? पाहिजे तर मी देवीला सोडून आतां चालता होतों. असें म्हणून शिव अंतर्धान पावला. उमा म्हणाली; आतां मी काय करावें? जमलेला सर्व मेळा ब्रह्मादिकांबरोबर विचार करूं लागला, आतां कसें होईल? विष्णु म्हणाला कीं, कसेंही करून शंभूची समजूत करा. चला. त्याच्या प्रसादानें लोक स्वर्गाला गेले तरी चालतील. मनुष्यांचें ब्रह्मलोकीं जाणें व देवांचा मृत्युलोकीं वास ही आपण कांहीं दिवस सहन करूं; व शिव तुष्ट झाल्यावर मग मी व्यवस्था करीन. वेदमार्गानें न वागणारांना नरकीं टाकीन. इकडे शिव जों निघाला तों वस्त्रें व गजाजिन टाकून पाताळांत स्थाणुरूप होऊन बसला. देव शंकराला शोधूं लागल, पण पत्ता लागेना; तेव्हां पंचमहभूतांनीं त्याचा मार्ग दाखविला व सर्वही देव आपापल्या वाहनांवर बसून शंकर असलेल्या जागीं गेले; व वाहनांवरून उतरून रुद्राची स्तुति करूं लागले. पातालांतून शेष व पर्वतांचें विदारण करून नद्याही तेथें आल्या. शंकरांनीं त्यांस प्रत्यक्ष दर्शन दिलें; तेव्हां कैलासावर चला असें देवी शंकराला म्हणाली; तेव्हां शंकर म्हणाले; जर सर्व देव आनंदित झाले आहेत तर सर्व नद्यांनीं येथेंच रहावें. तो सर्व प्रवाह सोन्याचा होता; म्हणून तिला स्वर्णरेखा हें नांव दिलें. संपूर्ण उपभोग व मोक्ष देणारें हें क्षेत्र वस्त्रापथ ह्या नांवानें प्रसिद्ध होईल. या नदींत स्नान करणारे स्त्रीपुरुष सर्व पातकांतून मुक्त होतील. असें म्हणून भवदेवामध्यें आपला अंश ठेवून शंकर कैलासाला निघून गेले. पार्वती ही आपली कला जी अंबा या नांवानें तेथें राहिली. नारायण स्वतः रैवतक पर्वतावर राहिला व आपली नरसिंह व वराहमूर्ति स्थपित केली. पूर्वीं पृथु येथें आला व त्यानें देवाची पूजा करून जपमाळा धारण केली; आणि देवमूर्तीचें नांव दामोदर असें ठेविलें. याप्रमाणें तीर्थांचे रक्षक क्षेत्राधिप भवलिंगाच्या समीप स्थापित झाले. हे राजा! ही वस्त्रापथक्षेत्राची उत्पत्ति तुला सांगितली. आतां तुला काय ऐकण्याची इच्छा आहे? जो ही कथा भावनायुक्त अंतःकरणानें ऐकतो तो सर्व पातकापासून मुक्त होऊन स्वर्गलोकीं पूज्य होतो. स्वर्णरेखेंत स्नान करणारे महापातकांतूनही मुक्त होतात; व जलांत मृत्यु पावलेले किडेही मुक्ति पावतात. स्वर्णरेखेंत स्नान करून जो श्राद्ध व भवदेवाचें पूजन करतो तो ब्रह्मलोकाला जातो.

---

## अध्याय १० वा.



### सारस्वतानें भोजाला केलेला उपदेश.

पार्वती म्हणाली; शंकरा! आपण मला रैवतक पर्वत, वस्त्रापथ क्षेत्र, गंगादिक नद्या ज्या जलांत एकवटलेल्या आहेत, अशी स्वर्णरेखा नदी, या सर्वांचें माहात्म्य व ब्रह्मविष्णुमहेशांचा तेथें वास, हें सर्व कथन केलें; परंतु मृगी प्राप्त झाल्यावर भोजराजानें व सारस्वत मुनीनें काय केलें? हें कृपा करून सांगा. शंकर म्हणाले; रूपवती, गुणवती, उदार, शांतवृत्ति; व सर्वांशीं प्रेमानें वागणाऱ्या मृगीला पट्टराणी करून भोजराजा आनंद पावला; व सारस्वत ऋषींची स्तुति करून म्हणाला; आपण तपाचरणानें ब्रह्मा, विष्णु व महेश हे तीनही देव संतोषित केले आहेत; व आपण माझें परम दैवत आई, बाप व गुरु यांजसमान आहांत. आपण माझा पूर्वजन्मांतला संपूर्ण वृत्तांत कथन केला. सुराष्ट्रदेशांतील प्रसिद्ध रैवतक पर्वत, वस्त्रापथक्षेत्र, तेथील स्वयंभू भवलिंग, उज्जयंतपर्वताचे शिखरावर कल्पपर्यंत वास करणारे गौरीगणेश व कार्तिकेय, बलीला पाताळीं घालून रैवतकपर्वतावर सिद्धेश्वर नगर स्थापून राहिलेले वामन हे सर्व जर जिवंतपणीं दृष्टीला पडत आहेत, तर मी मुलाला राज्यावर बसवून या क्षेत्राची यात्रा आपल्या कृपेनें करीन व सूर्यलोक, सोमलोक, इंद्रलोक; व ब्रह्मलोक यांचें अतिक्रमण करून मी शिवलोकाला जाईन. हें भोजराजाचें भाषण ऐकून सारस्वत मुनीला आनंद झाला; परंतु राजाचें सर्व तत्त्व जाणूं इच्छिणाऱ्या ऋषीनें यात्रेला जाणाऱ्या राजाचा निषेध केला. तो म्हणाला आपल्या घरींही; सर्व तीर्थें, देव, दर्भ तिल आहेत, तूं तीर्थयात्रेची प्रवृत्ति करूं नकोस.

---

## अध्याय ११ व १२ वा.



### वस्त्रापथाच्या यात्रेचा विधि.

ईश्वर म्हणाले; सारस्वताचें भाषण ऐकून भोजराजाला वाईट वाटलें. तो म्हणाला; यात्रेला जाण्याविषयीं आपण मला निषेध करूं नये; व यात्रा उत्तम फलदायक कशी होईल, तो विधि सांगा. यात्रेंत काय घ्यावें काय घेऊं नये, कोणतीं दानें द्यावींत कोणतीं देऊं नयेत. तीर्थावर उपवास, स्नान, संध्या, पूजा, जप, निद्रा यांचा विधि कसा आहे? हें सर्व मला संक्षेपानें सांगा. सारस्वत ऋषि म्हणाले; रैव-

तकाच्या यात्रेचा विधि तुला सांगतों, लक्ष दे. यात्रेला गुरुबल अवश्य असलें पाहिजे. निर्दोष अशा सुमुहूर्तावर जन्मराशीपासून बलवान् ग्रहांनीं युक्त अशा उत्तम लग्नीं शुभशकुनावर निघावें. स्नान, दान व जपपूजेला सर्वही मास व तिथि योग्य आहेत. अष्टमी, चतुर्दशी, पौर्णिमा, संक्रांत व ग्रहण हीं भवपूजेला उत्तम पर्वें आहेत. वैशाखशुक्ल पौर्णिमेच्या दिवशीं भवलिंग, व स्वर्णरेखा नदी यांची उत्पत्ति झाली व ब्रह्मादिक देव आणि गंगा आदिकरून नद्या ह्या महाक्षेत्रांत येऊन राहिल्या. शंकरांनीं टाकलेलीं वस्त्रें व भूषणें जेवढ्या जागेंत पडलीं त्या स्थानाला वस्त्रापथ क्षेत्र म्हणतात. त्याच्या उत्तरेस भद्रानदी, दक्षिणेस आठ कोसांवर बलीचें स्थान, नदीला अनुलक्षून उज्जयन्त पर्वत व पश्चिमेला वामनाच्या नगराच्या पलीकडे दोन नद्यांचा संगम ही वस्त्रापथक्षेत्राची मर्यादा आहे. याचा विस्तार सोळा कोसांचा आहे वैशाखपौर्णिमेला भवपूजन करणारास कल्पपर्यंत शिवलोकीं वास घडतो. तूं वसंतऋतूंत शुचिर्भूत व इंद्रियनिग्रही होऊन यात्रेला निघ. वाहनांत न बसतां पायीं ही यात्रा करणाराला पुष्पकविमानांत बसून शिवलोकीं गति मिळते. एकभुक्त, नक्तभोजन, अयाचित भोजन, मिताऩ्न, जलाहार, फलाहार, उपवास, कृच्छ्रोपवास किंवा शाकाहार, करून यात्रा करणाराला अप्सरा वारा घालित स्वर्गावर नेतात. मलस्नान न करितां, पायाला तेल न लावतां, मौन धरून, जितेंद्रिय राहून व थंडी, पाऊस, ऊन यांचें न निवारण करतां शिवस्मरण करीत यात्रा करणारा सूर्यमंडलाचा भेद करून नरकांत असलेल्याही आपल्या सात पिढ्यापर्यंतच्या पितरांना कैलासीं नेतो. जो मृगचर्म पांघरून लोटांगण घालीत शंकराकडे निघाला अशा रीतीनें जो यात्रा करितो त्याला पृथ्वीचें राज्य मिळतें. तीर्थाचे ठिकाणीं गेल्यावर ब्राह्मणाची आज्ञा घेऊन तीर्थविधि करावा. स्नान संध्यार्चनादि झाल्यावर दर्भांतिल व हविष्यान्न यानें श्रद्धापूर्वक श्राद्धविधि करावा. अगस्त्यपुष्प, माक्याचें पत्र, कमलपुष्प, कापूर, अगरु, चंदन, केशर, तुळशीपत्र, बेलफळाएवढे पिंड, तुपाच्या दिव्याचा प्रकाश, फल नैवेद्य तिलदर्भोदक इत्यादिकांनीं श्राद्ध केलें असतां पितरांना तें सहस्रपटीनें मिळतें. पितरांच्या ऋणांतून मुक्त होण्याकरितां अयन, संक्रांती, ग्रहण, दर्श, मृत्युतिथि, गजच्छाया, त्रयोदशी वगैरे दिवशीं श्राद्ध करावें. घरीं केलेल्या श्राद्धापेक्षा समुद्राला मिळणाऱ्या नदीवर केलेल्या श्राद्धाचें फळ शतपट आहे. प्रभास, पुष्कर, गंगानदी, प्रयागक्षेत्र, गोमतीनदी, वस्त्रापथ, नर्मदा आदीकरून नद्या ह्यांजवर श्राद्ध केल्यानें पितर पापमुक्त होऊन सद्गति पावतात; व कर्ता उत्तम संतति व संपत्ति भोगून शेवटीं स्वर्गाला जातो. जातकर्मादिक संस्कारांचे वेळीं, यज्ञारंभीं, देवप्रतिष्ठादिक कृत्यांत वृद्धिश्राद्ध करावें, त्यानें देव व पितर हे तृप्त होतात; व

कर्त्यांचें कल्याण होतें. प्रयाग कुरुक्षेत्र, सरस्वती, समुद्र, गया, रुद्रगया, बद्रिकाश्रम, प्रभास, पुष्कर, कृष्णा, गोमती, पिंडारक, वस्त्रापथ, दैवतक, दामोदर, भीमेश्वर, नर्मदा, स्कंदतीर्थ. रामेश्वर, उज्जनी, महाकालेश्वर काशी, यमुना व मथुरा या तीर्थक्षेत्रांचें सेवन केलें असतां मनुष्य पापमुक्त होतो.

---

## अध्याय १३ वा.

### श्राद्धदानादिमाहात्म्यवर्णन.

सारस्वतमुनि म्हणतात,—कर्मत्यागपूर्वक मोक्षसेवनाचा ज्यांचा अधिकार नसेल, अशांनीं स्नानादिक कर्में करून; हरिहरांचें पूजन करावें. सत्यभाषण; व शक्तीप्रमाणें दान करावें. परनिंदा व परस्त्रीसेवन करूं नये; सोनें व भूमि यांची चोरी, ब्रह्मस्व आणि देवस्व हीं वर्ज्य करावींत. ब्राह्मण, स्त्री,राजा, बालक, वृद्ध, तपस्वी, पिता, माता व गुरु यांना न आवडणारें मनानेंही चिंतूं नये. देशकाल यांना जाणून पात्रापात्राचा विचार करावा; मनुष्याला पडच्छाया दाखवूं नये. ताक, अग्नि, सर्पण, कांजी, औषध व भाजी यांनीं शक्तीप्रमाणें याचक तृप्त करावे. एकादशी, पौर्णिमा, चतुर्दशी, अमावास्या, अंवस, व्यतीपात, संक्रांत. ग्रहण वैधृति, आईबापांची मृत्युतिथि, युगादि व मन्वादि या पर्वांना घरीं उत्साह करावा. तीर्थास गेलें असतां त्यांचें फल शतपट आहे; इंद्रियनिग्रह करावा, मद्य व द्यूत वर्ज्य करावें, विवाद, प्रवास व युद्ध गृहस्थानें टाळावें. स्नान, दान, जप, होम, देवपूजा, व ब्राह्मणांची पूजा यथाविधि केली असतां अक्षय फल देतात. वासरूं असलेली व वस्त्रालंकारांनीं भूषित अशी एक तरी गाय दान करावी, त्या योगानें दाता सर्व पातकांपासून मुक्त होतो व स्वर्गाला जातो. नांगर ओढण्यासारखा मजबूत तरुण असा बैल उत्तम पर्वणीस सत्पात्रब्राह्मणाला दान देणारा त्या बैलावर आरोहण करून गोलोकीं जातो. खोगीर व लगाम यांसह घोडा दान करणारास कल्पपर्यंत स्वर्गवास घडतो. गजदानानें नंदनवनप्राप्ती, पृथ्वीदानानें राज्यप्राप्ती, सामानासह घर दिल्यानें विमानप्राप्ती, देवांना आनंद देणाऱ्या सुवर्णदानानें सूर्य असेंपर्यंत सुंदर विमानप्राप्ती, पितरांना आवडतें रौप्य दान दिल्यानें ऋषींचा ध्रुवाशीं वास असेंपर्यंत सोमलोकप्राप्ती, चंदन व कापूरयुक्त तांबूल, व रत्नें, फळें, पुष्पें, व वस्त्रें दान केल्यानें चंद्रलोकप्राप्ती, ताक, पाणी, तेल, तूप, दूध, उंसाचा रस, मध, खजूर, खडीसाखर, द्राक्षें, बदाम, अंजीर, दर्भ, अक्षत, माती, गोमय, दूर्वा, जानवीं, तिळ व मृगाजिन

दिल्यानें स्वर्गांत प्राप्ति होते. आपल्या आहाराच्या चतुर्थांश अन्नाला हंतकार म्हणतात, त्याचें दान केल्यानें भुवलोकप्राप्ती होते. आपल्या आहाराइतकें अन्न गाईला दिल्यानें स्वर्गलोक मिळतो. कांडणें, दळणें, चूल पेटविणें व झाडणें ह्यांत घडलेल्या कीटकादिप्राण्यांच्या हत्येचें पातक भिक्षेकऱ्यांना भिक्षा घातल्यानें नष्ट होतें. एक घांसभर तरी भिक्षा द्यावी. ती ज्या घरांतून दिली जात नाहीं, तें घर श्मशानासारखें आहे. पाणी भरलेले कुंभ, सिद्धान्न, छत्र, जोडा, कमंडलु, आंगठी व वस्त्रें दान केल्यानें स्वर्गप्राप्ती होते. चालून थकलेल्याला जोडे, तहानेल्याला पाणी, भुकेल्याला अन्न दिल्यानें अप्सरांसह स्वर्गप्राप्ती होते. प्राण्यांचे प्राण अन्नावर अवलंबून असल्यानें अन्नदान सर्वांत श्रेष्ठ आहे. वरकडही सर्व दानांनीं उत्तम कल्याण व शिवलोकप्राप्ती होते. श्राद्धीं बसवावयाचे ब्राह्मण वैदिक, कुलीन, गृहस्थ, राग नसलेले, स्नानादिक; सदाचारतत्पर, निरोगी व निर्लोभी असावेत, ग्रामोपाध्ये नसावेत. त्यांना यथाविधि आमंत्रण करून श्रद्धापूर्वक श्राद्ध व पिंडदान करावें. श्रद्धा नसेल तर तें करणें व्यर्थ होतें. कोणतेंही कर्म करीत असतां; क्रोध नसावा. वानप्रस्थ, ब्रह्मचारी, यात्रेकरू व वैश्वदेवाचे वेळीं आलेला पाहुणा हेही श्राद्धाला योग्य आहेत. गृहस्थांनीं नेहमीं यतिपूजन करावें. आतां यात्रेचा विधि सांगतों.

---

## अध्याय १४ वा.

### सोमेश्वरोत्पत्तिवर्णन.

एकदां वसिष्ठऋषि वस्त्रापथांत आले; आणि त्यानें स्वर्णरेखेंत स्नान करून शिवाचें ध्यान केलें असतां शंकर प्रसन्न होऊन वशिष्ठास ‘ वर माग ’ असें बोलले. वशिष्ठ म्हणतात; शंकरा ! आपण अक्षय येथेंच राहावें व जे तुझी पूजा करतील त्यांना शिवलोक मिळावा; असा मला वर द्या. नंतर शंकर त्याप्रमाणें वर देऊन अदृश्य झाले. येथेंच नरसिंहानें हिरण्यकशिपूला ठार मारून त्रैलोक्य इंद्राला दिलें; आणि आपण कालरुद्राला गेला. एकदां विष्णु वामनरूप धारण करून, तीर्थयात्रा करीत वस्त्रापथक्षेत्रांत गेला. पूर्वी सोमेश्वराचें दर्शन करावें का भवाचें करावें, असा विचार करीत वामनानें क्षेत्रमाहात्म्य वाढविण्याकरितां सोमेश्वराचें दर्शन करण्याचा निश्चय केला. भूमीचें भेदन करून तेथें सोमेश्वर म्हणाला; माझ्या कृपेनें तुझें कार्य सिद्ध होईल. वामन म्हणाला जर आपण प्रसन्न आहां तर येथें लिंगांत नित्य वास

करावा, व माझें नगर सुंदर व्हावें. ह्या लिंगाचें दर्शन करणारा महापातकीही पापमुक्त व्हावा, व निष्पाप असेल तर अप्सरा त्याच्या दासी होऊन दिव्य विमानांतून त्यानें ब्रह्मलोकांचें अतिक्रमण करून शिवलोकाला जावें. तसें होईल असें म्हणून सोमनाथ अदृश्य झाला. वामनानें सोमनाथाचें दर्शन करून भवाचें दर्शन घेतलें. गंगादिक पवित्र नद्या स्वर्णरेखेंत राहिल्या. ही सोमेश्वरोत्पत्ति श्रवण केली असतां सर्व पाप नष्ट होतें.

## अध्याय १५ वा.



### दामोदरमाहात्म्यवर्णन.

सारस्वत म्हणाला; ज्ञान प्राप्त झालेला वामन रैवतकाद्रिच्या अरण्यांत गेला. वामन पुढें रैवतकपर्वतावर गेला असतां काळे, भयंकर, दुरांत व अनीत असलेले पांच पुरुष पर्वतशिखरावर त्याचे दृष्टीस पडले. हे क्षेत्ररक्षक शंकराचे पांच पुरुष असें जाणून त्यानें त्यांची स्तुति केली. त्यांनीं प्रसन्न होऊन एकपाद, गिरिदारुण, मेघनाद, सिंहनाद व कालमेघ अशीं आपलीं नांवें सांगितलीं; व तुझें आम्हीं काय कार्य करावें; असा प्रश्न केला. नंतर वामन म्हणाला; जर तुम्ही प्रसन्न आहांत तर मी स्थापना करीन त्या जागीं प्रलयकालपर्यंत रहा. त्याप्रमाणें ते पांच पुरुष अनुक्रमें पर्वताच्या कड्यावर एकपाद, पर्वतावर गिरिदारुण, उज्जयंतपर्वतावर मेघनाद, भवानीशंकरावर सिंहनाद; आणि स्वर्णरेखानदीच्या तीरीं कालमेघ जाऊन राहिले, वामनानें जाऊन त्या क्षेत्रपालांची पूजा केली. युगारंभीं सर्व देव तेथें गेले; व त्यांनीं विष्णूचें नांव दामोदर असें ठेवून जयमाळा त्याचे गळ्यांत घातली. कार्तिक शुक्ल प्रतिपदेचे दिवशीं उपोषण करून देवांनीं तें तीर्थ ठरविलें. कार्तिकमासांत यात्रेकरूंनीं दामोदरक्षेत्रीं अवश्य येऊन रहावें; त्यांतही भीष्मपंचक व द्वादशी यांचें माहात्म्य जास्त आहे. मिष्टान्न, हविष्यान्न, सोनें, रुपें, वस्त्र, पाणी, अन्न, फळें, गाय, तीळ, फुलें हीं दानें कार्तिकांत करावींत. सर्व दानें, यज्ञ व पिंडदान यांचें फल दामोदराचे दर्शनानें मिळतें. एकादशीला स्नान करून षोडशोपचारयुक्त पंचामृतस्नान दामोदराला घालावें. षोडशोपचार समर्पण करून ध्वजादिकांनीं प्रासादपूजा करावी. वासरासह गाय दान द्यावी. नंतर गीत, वाद्य, स्तोत्रपाठ, वेदपाठ, पुराणश्रवणादिकांनीं हरिजागर करावा. दीपयुक्त सात धान्याचे सात पर्वत करावे. विष्णुकथा श्रवण करावी. सूर्योदयीं उठून स्नान, संध्या; व तर्पण करून पितरांना उद्देशून श्राद्ध करावें. द्वादशीला ब्राह्मणभोजन घालून पारणें करावें. आंधळे,

पांगळे, थोटे यांना अन्न द्यावें. याप्रमाणें यात्रा करणारा सर्वही पातकांपासून मुक्त होतो. हें पुराण ऐकणारा व सांगणारा विष्णुरूप होऊन वैकुंठाला जातो.

---

## अध्याय १६ वा.

—:०:—

### शिवरात्रिमाहात्म्य.

राजा म्हणतो; नंतर वामनानें त्या निबिड अरण्यांत राहून काय केलें? नंतर सारस्वत म्हणतो; राजा! वामन रैवतकपर्वतावर गेला. नंतर स्वर्णरेखेंत स्नान करून षोडशोपचारांनीं त्यानें देवपूजन केलें आणि हात जोडून प्रार्थना करीत देवासमोर उभा राहिला. त्याला भ्यालेला पाहून त्याचे रक्षणाकरितां नरसिंह तेथें आला; व पुढें उभा राहून म्हणाला, भिऊं नकोस. तुझा मी किंकर आहे आज्ञा कर. वामन म्हणाला, जर तूं मला प्रसन्न आहेस तर येथेंच देवांचें अग्रभागीं नेहमीं राहून यात्रेकरूंचें रक्षण कर. नरसिंह तेथें राहिल्यानें तें सर्व अरण्य निर्भय झालें. वामन कार्तिकद्वादशीला तेथील यात्रा उरकून भवाच्या दर्शनाला गेला. चतुर्दशीला भवाचें पूजन करून त्यानें पाप नष्ट केलें, व कालमेघाचें पूजन करून तो वस्त्रापथाला गेला. भवाची षोडशोपचारें पूजा व शंभर प्रदक्षिणा करून वामन पुढें निघाला तों सुराष्ट्रदेशांतला प्रसिद्ध उज्जयंत पर्वत त्याचे दृष्टीस पडला. पर्वत पाहिल्याबरोबर जेथून ऐरावताच्या पायानें पर्वत दबल्यानें जलप्रवाह उसळत होता तेथून तो वर चढूं लागला. जसजसें पर्वतावर चढावें तसतसा पापनाश होतो, या भावनेनें तो वर चढत होता. वर जाऊन त्यानें अंबेचें दर्शन घेतलें; व पूजन केलें. नंतर त्यानें कालनियामक सूर्याचें व जटाधारी अशा शंकराचें दर्शन घेतलें असतां शंकर म्हणाला–वामना! मी तुला प्रसन्न आहें, त्रैलोक्यांत व्यापणारी अशी तुझी वृद्धि होईल. तुला सर्व वेद व गीतनृत्यही येईल; आणि असाध्यही कार्य साध्य करण्याची तुजमध्यें शक्ति येईल. मात्र तूं वस्त्रापथांत जाऊन तीर्थदर्शन कर. वामन; म्हणाला वस्त्रापथांतील तीर्थें व देव आपण कृपा करून मला सांगा. नंतर शंकर म्हणतात; वामना! तुला वस्त्रापथांतील तीर्थें सांगतों, ऐक. वस्त्रापथांच्या वायव्य भागीं एक सुंदर सरोवर आहे. त्याच्या पश्चिमेला एक अरगच पल्लव असलेली बेलाची जाळी असून त्यांत मातीचें शिवलिंग आहे. तेथेंच पूर्वी पारवी मुक्त होऊन कैलासीं गेला. त्याच्या दर्शनानें ब्रह्महत्येचें पातक नष्ट होतें. वृत्रासुराला मारल्यानें घडलेल्या ब्रह्महत्येचें इंद्रानें तेथेंच निरसन केलें. त्याच्या उत्तरेला

कुबेरानें स्थापिलेलें लिंग व त्रिशूलिनी देवी आहे. भवाच्या नैर्ऋत्येला हेरंब नांवाचा गणपति आहे. तेथें चित्रगुप्तानें जें लिंग स्थापन केलें त्याचें नांव चित्रगुप्तेश्वर आहे. रैवतकावर पश्चिमबाजूला प्रजापतीनें स्थापन केलेलें केदार नांवाचें लिंग आहे. ह्याप्रमाणें शंकराचें भाषण ऐकून नंतर वामनानें तीर्थस्नान करून तेथें नेमिनाथनामक लिंगाची स्थापना केली. भवाच्या पश्चिमभागीं वामनानें आश्रम करून भवाची आराधना केली, त्यायोगानें त्याचे इच्छित हेतूंची सिद्धि झाली. शिवाच्या आज्ञेनें अन्यांची तीर्थें षड्गुण झालीं; परंतु हें तीर्थ मात्र प्रत्येक वर्षीं एक एक यव ह्यामानानें वाढत असतें. ही कथा ऐकून शिवरात्रिव्रत कसें करावें? असा प्रश्न राजानें केला असतां सारस्वत म्हणाला. हे व्रत एकदां करणारालाही इहलोकीं भोग व परत्रमोक्ष लाभतो. नेहेमीं केलेल्या व्रताचें फल अनंत आहे. बारा वर्षेपर्यंत महाशिवरात्र व्रत करावें. किंवा माघांत आरंभ करून पौषापर्यंत प्रत्येक महिन्यास हें व्रत करावें. जरी मध्यें विघ्न येऊनें व्रत झालें नाहीं तरी व्रतभंग होणार नाहीं. पुढें बारा व्रतें होईपर्यंत व्रत चालवावें. तें अशारीतीनें करावें. वद्य चतुर्दशीला नित्य कर्म झाल्यावर व्रतसंकल्प करावा. नदींत अथवा तलावांत स्नान करावें. अंगाला किंवा डोक्याला त्या दिवशीं तेल लावूं नये. हें व्रत कोणत्या तरी स्वयंभूलिंगाजवळ करावें. लिंगसांनिध्य नसेल तर वाळू माती, इत्यादिकांचें लिंग करून पूजन करावें. व्रताचें दिवशीं ब्रह्मचर्यानें रहावें. रात्रीं देवाजवळ धान्याचे सात पर्वत करून त्यांची पक्वान्न, फल, तांबूलादिक, उपचारांनीं पूजा करावी. नेहमीं देवालयांत तुपाचा दिवा लावावा. शक्य त्यानें नंदादीप लावावा. रात्रीं शिवरात्रिव्रताची कथा ऐकावी; व जागरण करावें. दुसरें दिवशीं सकाळीं स्नान करून शिवपूजन करावें अन्नवस्त्रादिकांनीं यतिपूजा करावी. तपस्वी व बैरागी यांना भोजन घालावें. शक्तीप्रमाणें बारा, आठ अथवा एका तरी ब्राह्मणाला भोजन घालावें. आप्तवर्गाला जेवण घालून अपण क्षारलवणवर्ज्य अशा अन्नानें पत्रावळीवर पारणें सोडावें. ह्याप्रमाणें बारा शिवरात्रि करून, बारा तिळपात्रें विद्वान् ब्राह्मणांना दान द्यावीत. व्रताचे शेवटीं वासरासह कपिला गाय द्यावी. आंगठी, वस्त्रें, पागोटें, छत्री, जोडा, कमंडलु गुरूला द्यावींत. ब्राह्मणांना शक्तीप्रमाणें दक्षणा द्यावी, तपस्व्यांना भोजन घालावें; सर्वांना मिष्टान्न भोजन घालून विसर्जन करावें. ह्याप्रमाणें व्रत करणाराचें पाप नष्ट होतें व त्याला उत्तम संतति होते. इहलोकीं अनेक सुखोपभोग भोगून अंतीं तो शिवलोकाला जातो; हें तुला शिवरात्रिव्रत सांगितलें.

---

# अध्याय १७ वा.

## बलियज्ञप्रभाववर्णन.

राजा म्हणाला,—हे ऋषे! आपल्या कृपेनें हें उत्तम आख्यान मला ऐकायला मिळालें; पण विष्णूला मंदराचलावर पाहिल्यावर नारदानें काय केलें, ती कथा मला आपण विस्तारानें सांगा. मी संसारानें पीडला गेलों असल्यानें असल्या कथा ऐकण्याची मला फार उत्कंठा आहे. नंतर सारस्वत म्हणाला, ब्राह्मणाचा व पूर्वी भृगूचा शाप विष्णूला झालेला पाहून नारदाला वाटलें कीं, शापाप्रमाणें विष्णु वामनरूप धारण करून बलीला पाताळांत घालील; परंतु आपल्याला युद्धावांचून कसें करमावें. मी युद्धाचा घाट घातला असतांही बृहस्पतीनें तें टाळलें. गुरु मलाही पूज्य आहे; नाहीं तर मी त्यालासुद्धां शापिला असता. असो. आतां मी बलीकडे जाऊन युद्ध उपस्थित करतों; असा विचार ठरवून नारद बलीकडे गेला. लागलीच बलीनें उठून त्याचें स्वागत केलें व तो नारदास म्हणाला; हा सर्व माझा परिवार सेवेस तयार आहे. आज्ञा व्हावी. नारद म्हणाला; अलीकडे देव तुझा फार हेवा करतात. तूं केलेल्या आदरानें इंद्राला संतोष वाटत नाहीं. देवांना तुझें पृथ्वीवरील राज्य बिलकूल पाहवत नाहीं. माझ्यानें तें अगदीं सहन होईना; म्हणून जें होतें तें तुला विदित केलें. जो युद्धाला पहिल्यानें उठतो तोच क्षत्रिय, जय त्यालाच मिळतो, व उत्कर्ष त्याचाच होतो. तू जर स्वस्थ बसलास तर तुझ्या राज्याची वाताहत होईल. यानंतर तुझी इच्छा. बलि म्हणाला; राजा ज्या गुणांनीं राज्य संपादन करतो ते गुण मला वर्णन करून सांगा; व दान सत्पात्रीं योग्य आहे, तरी सत्पात्र कोणतें तें ही सांगा. नारद म्हणाला; कोणालाही न दुखवितां धर्माचरण करणें, उदासीनाशीं झटकून राहणें, दुसऱ्याला न बुडवितां द्रव्य संपादणें, उद्धटपणा न करतां वागणें, प्रियभाषणासह उदारता, शौर्य असून घमेंड न करणें, न सतावतां दातृत्व, दयायुक्त पोक्तपणा, दुर्जनसंगती टाळणें, बंधुद्वेष नसणें, खरें भाषण करणारे हेर ठेवणें, न दुखवितां कार्य साधणें, विपत्काळीं उठाठेव न करणें, गुणांची शेखी न मिरविणें लोकाग्रणींपासून न घेणें, दुर्जनसंगति न करणें, योग्य विचाराखेरीज दंड न करणें विचार गुप्त राखणें, हावऱ्यांना न देणें, शत्रूचा विश्वास न करणें, स्त्रियांचें रक्षण विश्वाकडून करणें, संकटांत पडलेल्याचा सांभाळ करणें, स्त्रीलंपट न होणें, जिभेला लुब्ध न राहणें, न लुबाडतां योग्यांचा सत्कार करणें, गुरूशीं निष्कपट रहाणें, दांभिक पूजा न करणें, अनिंद्य संपत्ती इच्छिणें, प्रेमयुक्त

संगति करणें, हुषारीनें रहाणें, कालानुरोध करणें, शांततेनें भाषण करणें, दया केली तरी आक्षेप घेऊं नये, ब्राह्मणाला दंड न करणें, शत्रूंचा नाश उडविल्यावर शेष न ठेवणें, एकदम क्रोध न करणें, शत्रूशीं मृदुपणा न धरणें, हे नियम बाळगणारा जो राजा तोच चिरकाल सुख भोगतो. पूर्वी पर्वतांना पंख होते, परंतु ब्रह्मदेवानें पुढें त्यांना निश्चल केलें. जे निश्चल राहीनात त्यांचे पंख इंद्रानें तोडले. मेरुपर्वताच्या दक्षिण शिखरावर कुमुद्वान नांवाचा एक पर्वत सोन्याच्या वृक्षांनीं आच्छादित असून, तेथें विष्णुनें एक शहर वसविलें आहे. त्याच्या मधील मंदिरांत नेहमीं लक्ष्मी वास करते. मेरुशिखरावर एक नगर आहे तेथें भव व भवानी नित्य रहातात. तेथें महेशाची सभा आहे. विष्णु ब्रह्मादिकांसह महेशदर्शनाकरितां नेहमीं येतो. सुवर्णकमलांनीं तो पर्वत सुशोभित असल्यानें देवांनीं त्याला कुमुद्वान् हें नांव दिलें आहे. तेथें एकदां शंकर व पार्वती लक्ष्मीनारायणाच्या दर्शनाला गेलीं असतां महेश विष्णुला म्हणाला, हें नगर तूं वसविलेंस याचें कारण फक्त मलाच माहीत आहे. तें तूं मला विचारूं नकोस; परंतु तें तसें होणार. तेथें कुमुद त्याच्या दर्शनाला गेला असतां शिव–विष्णु त्याला म्हणाले, आम्ही प्रसन्न आहों; एकादा वर माग. आपण उभयतांही चिरकाल येथें रहावें असा त्यानें वर मागितला असतां, त्यांनीं तेथें वास स्वीकारला. पांचव्या रैवतकमनूच्या उत्पत्तीविषयीं कुमुदाच्या समक्ष घडलेली हकीकत सांगतों ऐक. पूर्वी ऋतवान नांवाचा एक ऋषि प्रसिद्ध होता, त्याला फार दिवसांनीं एक पुत्र झाला. तो पुत्र अतिशय दुःशील निपजला. रात्रंदिवस पुत्रचरित्रानें पोळलेल्या त्या ऋषीनें वृद्ध गर्गऋषीला विचारिलें, मी यथाविधि वेदाध्ययन संपवून श्रोतादिक क्रियेकरितां यथाशास्त्र विवाह केला. यथाविधि गृह्याग्निक्रिया व श्रौतकर्म करून पुंनामक नरकांतून मुक्ततेकरितां पुत्र उत्पन्न केला. असें असतां हा दुराचारी व उद्दंड निपजण्याचें काय बरें कारण ! नंतर गर्ग म्हणाला ह्याच्या दुष्टत्वाला तें कांहींही कारण नाहीं. ह्याचा जन्म रेवतीच्या शेवटीं गंडांतांत झाल्यानें हा असा निपजला. रेवती आणि अश्विनी, आश्लेषा व मघा, ज्येष्ठा आणि मूळ ह्यांच्या संधींत गंडांत योग असतो. ह्या तिन्ही गंडांतांत जन्मलेला मनुष्य, स्त्री, अथवा पशु कोणीही फारदिवस घरांत टिकत नाहींत. हें ऐकून ऋतवानाला फार राग आला व तो म्हणाला; मला एकच मुलगा असून तो रेवतीच्या शेवटीं जन्मावा आणि रेवतीला हें समजूं नये किं ऋषी मला शापील, रेवतीची राख होऊन पडो. नारद म्हणाला; असें म्हटल्याबरोबर सर्वलोकांच्या समोर रेवती नक्षत्र कोसळून पर्वतावर पडलें व हा सुराष्ट्र देशांत उज्जयन्त नांवाचा हिमालयाचा पुत्र झाला. कुमुदाची व त्याची फार प्रीति जडली व दोघांनीं संनिध राहण्याचा त्यांनीं

निश्चय केला. कुमुदाद्रीवर रेवती पडल्यानें कुमुदाला रैवतक नांव पडलें; नंतर रैवतकाला एक मुलगी झाली. तिचें मुख व कांति थेट रेवतीसारखी होती. गंगा, यमुना व सरस्वती ह्या तीनही तीर्थांचें उदक एकत्र असलेल्या रेवतीकुंडांत ती जन्मली होती. प्रमुंचनावाच्या राजानें तिला पाहिली. रैवतकांत तिचा जन्म असल्यानें ती रेवतीनांवानेंच प्रसिद्धि पावली. प्रमुंचानें तिचें पालन केलें असतां ती वयांत आली.प्रमुंचाला काळजी पडली कीं, हिला नवरा कोण मिळेल. प्रमुंचानें होम करून व अग्नीची प्रार्थना करून प्रश्न केला कीं, रेवतीला कोण भर्ता मिळेल ? अग्नि म्हणाला; प्रियव्रतराजाच्या वंशांतला महापराक्रमी कालिंदीच्या उदरीं जन्मलेला दुर्दम राजा हिला वरील इतक्यांत दुर्दम शिकार करीत तेथें आला, व हे प्रिये ! ऋषि प्रमुंच कोठें आहेत; असा त्यानें रेवतीला प्रश्न केला. राजानें हें दिलेले संबोधन प्रमुंचानें होमशाळेंतून ऐकिलें. त्याला अतिशय आनंद झाला; व त्यानें अतिथिपूजेकरितां एका शिष्याला पूजासाहित्य आणावयास सांगितलें. प्रमुंचानें राजाचा योग्य सत्कार व पूजा करून कुशल विचारिलें. नंतर तो म्हणाला; ही रेवती तुझी मुख्य स्त्री असून तूं तिला कसा ओळखत नाहींस ? ती अत्यंत रमणीय आहे. राजा म्हणाला; सुभद्रा, शांतपापा, कावेरीतनया, सुरात्मजा, अनुजाता, कदंबा, विपाठा व नंदिनी ह्या माझ्या अंतःपुरचारिणी आहेत, रेवतीला मी जाणत नाहीं. प्रमुंच म्हणाला; आतांच प्रिये ह्या शब्दानें तूं जिला संबोधिलेंस ती तुझी भार्याच होय, तें खोटें कसें होईल ? राजा म्हणाला; तसें सहज तोंडांतून निघालें; परंतु माझा तसा अभिप्राय नव्हता. ऋषि म्हणाला; त्यांत तुझा दोष नाहीं. अग्नीनेंच रेवती तुजकरितां योजिली आहे. राजानें तें मान्य केलें; व तिच्याशीं विवाह लाविला; व ऋषीनें जांवयाला पुष्कळ आंदण दिलें; नंतर ऋषि म्हणाला; रेवती रेवताकुंडांत स्नान करून महाबलिष्ठ व पराक्रमी पुत्राला प्रसवेल. नंतर ऋषिवाक्याप्रमाणें तिजला मुलगा झाला, त्याचें नांव रेवंतक ठेविलें. ऋषीने ह्या कुंडांत स्नान करणाऱ्या स्त्रियांना पराक्रमी मुलगे होतील; व कदापिही त्यास दुःख व दरिद्र येणार नाहीं, असा वर दिला. रेवतीनें विष्णूची आराधना केली असतां विष्णु प्रसन्न होऊन म्हणाला; ब्राह्मणवचनानें तुझा चंद्राशीं योग होईल. तुझी इच्छा असेल तो आणखी वर माग. रेवती म्हणाली; आपण नेहमीं रैवतकावर रहावें, आणि मी स्नान केलेल्या ह्या कुंडांत स्नान करणाराला वैकुंठवास व्हावा. त्याप्रमाणें वर देऊन विष्णु चार हातांची दामोदरमूर्ति धारण करून तेथें राहिला; आणि रुद्र व सर्व तीर्थेंही तेथें राहिलीं. समुद्रमंथनाचे वेळीं एक वृक्ष उत्पन्न झाला, त्या वृक्षाला शिवालक्ष्मी हें नांव पडलें. सर्वांनीं एकमतानें तो वृक्ष रैवतकपर्वतावर स्थापन केला. फाल्गुन शुक्ल एकादशीला जे ह्या वृक्षाची

यात्रा करतील त्यांना गुणवान् संतती होऊन शेवटीं वैकुंठप्राप्ती होईल. ह्याप्रमाणें सांगून नारद रैवतकावर निघून गेला. नंतर बळी आपल्या मंत्र्यांना म्हणाला; आतां कसें करावें. देवांशीं वैर करणें मला बरें दिसत नाहीं. मंत्री म्हणाले; त्यांजवर स्वारी न केली तर ते फारच वरचढ होतात. हें ऐकतांच लागलीच बलीनें युद्धाचा नगारा वाजविला, व चतुरंग सेना घेऊन तो सज्ज झाला. दोघांचें युद्ध मेरुपर्वताच्या पूर्वभागीं झालें. त्या युद्धांत देवांचा पराजय होऊन बली विजयी झाला. नंतर देवाच्या प्रार्थनेवरून विष्णूनें बलिनाशार्थ वामनावतार घेतला. वामनाचा अवतार होताच बलीच्या राज्यांत अपशकुन होऊं लागले, तेव्हां बली विद्वान् ब्राह्मणांना त्याचें कारण विचारून शुक्राला म्हणाला; हें सर्व मला विपरीत दिसतें. नारदानें जें सांगितलें तेंच सत्य होणार, असें दिसतें. आपण ह्याचा विचार करून शांतीचा उपाय केला पाहिजे. शुक्राचार्य म्हणाले; बारा वर्षांत पुरा होणारा सर्वस्वदक्षिण यज्ञ आपण करा. नगराच्या पूर्वभागीं मंडप उभारून ब्राह्मण, ऋषि, ब्रह्मचारी यांना निमंत्रण करा. ज्याला जें आवडेल तें दान करण्याचा संकल्प धरून बलीनें यज्ञ आरंभिला. चोहींकडून समुदाय एकवटला. मांडलिक राजे अनेक नजराणे घेऊन हजर झाले. वेदध्वनि व वाद्यगजर यानें सर्व नगर दुमदुमून गेलें. भोजनाच्छादनानें सर्व तृप्त झाले. सोनें, रत्नें, घोडे, हत्ती, घरें, गांवें, प्रदेश यांचीं अनेक दानें याचकतृप्तीपर्यंत दिलीं. नृत्य गानादिकांनीं चोहींकडे आनंदीआनंद झाला. बलीची, शुक्राचार्याची व ऋत्विजांची वाहवा होऊं लागली. बली सर्वस्वदान करून पाताळांत जाईल, असें ब्रह्मवाक्य दैत्य चकित मुद्रेनें ऐकूं लागले.

---

## अध्याय १८ वा.

### कलिनिग्रहवृत्तांत.

वामनानें वस्त्रापथांत आल्यानंतर काय केलें, तें सर्व मला विस्तारानें सांगा, असा राजाचा प्रश्न ऐकून सारस्वत म्हणाला; वामनानें स्वर्णरेखेंत स्नान करून भवाचें पूजन केलें. नंतर त्यानें एकांतस्थळीं आसनावर बसून व कृष्णाजिन परिधान करून सर्व चिंता व वैष्णवी माया यांचा त्याग केला. तेव्हां नारद म्हणाला; बलीनें सर्व देवांचा नाश केला आहे; व सर्व सत्कर्मांचा विध्वंस केला आहे; बलीनें हल्लीं सर्वस्वदक्षिण यज्ञास प्रारंभ केला असून जो जें कांहीं मागेल तें त्यांस देण्याची प्रतिज्ञा केली आहे. त्यानें नउशें नव्याण्णव यज्ञ केले; हें ऐकून वामनानें नारदाला निरोप दिला व आपण देवकार्य उद्देशून बलीचा यज्ञ

पहाण्याकरितां निघाला. वामन बलीचें नगर पहात निघाला असतां. वामनमूर्तीला पहाण्याकरितां पुष्कळ लोक जागोजागीं जमा होत. वामन चारी वेदांचें सतत अध्ययन करी. सर्व बटूंनीं वामनाला यज्ञमंडपांत नेलें; व वामनाला म्हटलें कीं, आपण एखादें निश्चित मठस्थान बलीपाशीं मागून घेतलें असतां आमचें, देशाचें व शहराचें एक मोठें कार्य होईल. नंतर वामन यज्ञमंडपाचे दाराशीं येतांच वामन आल्याची द्वारपालांनीं बलीला वर्दी दिली; व वामन निरिच्छ आणि वेदपारंगत आहे, असें त्यांनीं त्याचें वर्णन केलें. बली म्हणाला; त्याला घेऊन या, व तो मागेल तें देऊन मी त्याची पूजा करीन. हें ऐकून शुक्राचार्यांनें बलीचें निवारण केलें. तो म्हणाला; त्याची पाहिजे तर दरवजांत पूजा कर. बली म्हणाला; आचार्यमहाराज! आपण निषेध करूं नका, वेदाध्ययन करणारा ब्राह्मण मी विष्णुरूप समजतों. वामन जर विमुख जाईल तर हा माझा यज्ञ व्यर्थ होईल. इतक्यांत द्वारपालांनीं आणिलेल्या वामनाला बलीनें पाहिलें. जो विष्णुसारखा तेजस्वी व सूर्यासारखा पिंवळा होता. नंतर बलीनें वामनाला वेदीमध्यें आसनावर बसविलें; व त्याची पाद्यादि पूजा करून मधुपर्क व गोनिवेदन केलें; व म्हटलें कीं, तुला काय पाहिजे? नंतर वामनानें तीन पाउलें पृथ्वी मागितली असतां बलीनें वामनाच्या हातावर पृथ्वीदानाचें उदक सोडलें. वामनानें पृथ्वी आक्रमण करण्याकरितां विशाल रूप धारण केलें. वामनानें दोन पावलांनीं स्वर्ग व मृत्यु ह्या दोनही लोकांचें आक्रमण केलें. तिसऱ्या पावलाला स्थळच मिळालें नाहीं. त्या विष्णुचरणाचें हा काय नक्षत्ररूपी चक्राचा अक्ष आहे, का दुष्टांचें नियम करणारा धर्मदंड आहे. कां गंगारूप कीर्तिपताकेचा दंड आहे, अशा उत्प्रेक्षांनीं लोकांनीं वर्णन केलें. अशारीतीनें फलद्रूप झालेल्या विष्णुचरणाचा भेद होऊन त्यांतून शंकरानें मस्तकावर धारण केलेली स्वर्गांत जिला स्वर्धुनी, मृत्युलोकीं गंगा व पाताळांत त्रिपथगा म्हणतात, त्या गंगेची उत्पत्ति झाली. जो गंगास्नान व हरिहराचें पूजन करतो तो मुक्त होतो.

---

## अध्याय १९ वा.



### वामनाचा बलीला वर.

यज्ञ पूर्ण झाल्यावर वामन बलीला म्हणाला; तूं मला एक पाउल पृथ्वी दिली पाहिजे. हें वामनाचें शब्द ऐकून बलीचा मुलगा पुढें होऊन

म्हणाला; तूं मागतांना लहान होतास मग विशाल होऊन पृथ्वी अपुरी केलीस; आणि आतां तिसरें पाऊल पुरें करून मागतोस हें कसें? जर तुला तिसरें पाऊल भरून घ्यावयाचें आहे तर पहिल्यासारखा वामनमूर्ती हो; म्हणजे बली तुला तीन पाऊलें भरून देईल. असें बलिपुत्राचें वाक्य ऐकून वामन म्हणाला; तूं जर पोरकटपणानें बडबडत आहेस तर ऐक. बलीनें त्रिपाद भूमी मला दिली व तो पुरीही करील. त्याला काय माझें प्रमाण माहीत नाहीं. वास्तविक मींही तुमच्या कल्याणाकरितांच केलें. बलीनें जें दान दिलें त्यानेंच तुम्हांला कल्पपर्यंत पातालांत स्थान मिळेल. आणि पुढील सावर्णिक मन्वन्तरांत बली इंद्र होईल. असें बोलून वामन बलीला म्हणाला; दक्षिणा अपुरी झाल्यानें तुझा याग अपुरा राहीला म्हणून तूं पाताळांत जा. बली म्हणाला; तेथें राहिल्यावर मग मला तुझें दर्शन कसें घडेल. वामन म्हणाला; तुझें अंतःकरण मजकडे आहे; म्हणून मी नित्य तुजजवळ राहीन. दिवाळीच्या प्रतिपदेला लोक तुझा मोठा उत्साह करतील. तुझा उत्सव करणारे सुखी होतील. जसा तुझ्या राज्यांत नेहमीं महोत्सव आहे, तसाच उत्साह दीपप्रतीपदेला लोक करतील. असें म्हणून वामनानें बलीला कुटुंबासहीत पाताळांत घालविलें; व आपण देवसभेंत बसलेल्या इंद्राजवळ गेला. त्यानें इंद्राला स्वर्ग दिला; व देवांना यज्ञभागी केलें. बलीचें पृथ्वीवरील राज्य मनुपुत्राला दिलें व वामन अंतर्धान पावला. दैत्यांना अन्यद्वीपांत हांकून दिलें. सर्व देव आनंद पावले; व वामन आपल्या नगरांत राहिला. सारस्वत म्हणाले; ज्याच्या स्मरणानें पापाचा नाश व पुण्यप्राप्ती होत्ये, त्या वामनाची उत्पत्ति तुला सांगितली. ईश्वर म्हणतात; ह्याप्रमाणें सारस्वातानें सांगीतलेली कथा ऐकून भोजराजानें सारस्वताची आदरपूर्वक पूजा केली. नंतर भोजानें यथाविधि वस्त्रापथक्षेत्रयात्रा केली; व तो मृत्यूनंतर उत्तम पद पावला. ह्याप्रमाणें प्रभासखंडांतील वस्त्रापथक्षेत्राचें महात्म्य सांगीतलें, हें भक्तियुक्त अंतःकरणानें पठण करणारा वैकुंठलोकाला जातो. जसें गंगोदक तसेंच पुराणश्रवण पापनाश करणारें आहे. हें गुह्य आहे. हें कोणाहीं भक्तिहीनाला, निंदकाला, गुरुभक्ति नसलेल्याला व दुर्बुद्धि जनाला सांगूं नये. ह्याचा नित्य नियमानें पाठ करणाऱ्याला शिव व विष्णूविषयीं भक्ति उत्पन्न होते. भक्तीनें संपूर्ण सुखें मिळतात. हें पुराण वाचणाराची भक्तियुक्त–अंतःकरणानें व कृपणपणा न करितां पूजा करावी. हें तीन वेळां वाचणाराचे व ऐकणाराचे सर्व हेतु पूर्ण होतात.

॥ वस्त्रापथक्षेत्रमाहात्म्य समाप्त. ॥

# स्कंदपुराण.

## प्रभासखंड ७.

## ( अर्बुदाचलमाहात्म्य ३ )

### अध्याय १ ला.

### गुहेंतील वृत्तांत.

ऋषि व्यासाला म्हणाले; आपण आम्हांला चंद्रसूर्यवंशाचा विस्तार सांगितला. आतां ह्या पृथ्वीवर जीं पुण्यकारक तीर्थें आहेत, त्यांचें माहात्म्य ऐकण्याची आम्हाला फार उत्कंठा आहे, करितां तें आपण आम्हाला विस्तारानें वर्णन करून सांगा. व्यास म्हणाले; तीर्थें अनंत आहेत. त्यांची साधारण संख्या साडे तीन कोटि आहे. क्षेत्रें, नद्या, व पर्वत ह्यांचें माहात्म्य ऋषींच्या तपःप्रभावानें वाढलेलें आहे. त्या सर्व तीर्थांत अर्बुदतीर्थ श्रेष्ठ आहे. वसिष्ठाच्या प्रभावानें कलिदोष त्याला स्पर्श करूं शकले नाहींत. अन्य तीर्थें स्नानदानांनीं पुनीत करतात; परंतु अर्बुदतीर्थ दर्शनानेंच पुनीत करतें. अर्बुदाचा विस्तार केवढा आहे. तें कोणत्या प्रदेशांत आहे. वसिष्ठऋषीनें तें प्रसिद्धीस कसें आणिलें. त्या पर्वतावर तीर्थें कोणतीं आहेत. असा ऋषींचा प्रश्न श्रवण करून व्यास म्हणाले. ब्रह्मदेवापासून उत्पन्न झालेल्या वसिष्ठनामक देवर्षीनें पृथ्वीवर अति तप केलें. त्यानें पाळलेली नंदिनीनांवाची कामधेनु गवताकरितां फिरत असतां एका अंधाऱ्या गुहेंत पडली. तिच्या दुधानें वसिष्ठ होम करीत असे. सायंकाळ झाली तरी गाय आली नाहीं, असें पाहून वसिष्ठ काळजींत पडला. होम चुकला असतां प्रायश्चित्त घडेल म्हणून वसिष्ठानें गाईचा फार शोध केला. तो त्या गुहेजवळ आल्याबरोबर त्याला तिचें हंबरणें ऐकूं आलें. ती म्हणाली, मी गवताकरितां ओणवल्यें म्हणून गुहेंत पडल्यें. मला ह्यांतून काढून रक्षण कर. वसिष्ठानें सरस्वतीचें ध्यान करितांच सरस्वतीनें आपल्या जलप्रवाहानें

गुहा भरून काढिली, तेव्हां नंदिनी बाहेर पडून वसिष्ठाबरोबर आश्रमास गेली. ती गुहा भरून काढण्याचा विचार करून, वसिष्ठ हिमाचलाकडे चालला. वसिष्ठ येत असलेला पाहून हिमाचल त्याला सामोरा गेला; व पाद्यादिकानें पूजोपचार समर्पण करून म्हणाला. महाराज ! आज्ञा व्हावी. आपण सांगाल तें करण्यास मी सिद्ध आहें. वसिष्ठ म्हणाला; माझ्या आश्रमाजवळ एक भयंकर गुहा आहे. माझी कामधेनु त्यांत पडली. तिला मी मोठ्या प्रयासानें बाहेर काढिलें. फिरून नंदिनी त्यांत पडेल म्हणून ती मला बुजविली पाहिजे. हिमाचल म्हणाला ती गुहा केवढी आहे, तें सांगा; म्हणजे त्या नावाचा पर्वत तिकडे पाठवितों. वसिष्ठ म्हणाला दोन हजार कोस त्याची लांबी रुंदी आहे, पण खोली बरोबर समजत नाहीं; पर्वत म्हणाला; एवढा खळगा पडला तरी कसा ? हें ऐकण्याची मला फार उत्कंठा आहे.

---

## अध्याय २ रा.

### उत्तंकचरित्र.

वसिष्ठ म्हणाला; पूर्वी गौतमनांवाचा महातपस्वी ऋषि होता. अहिल्यानामक त्याची धर्मपत्नी अत्यंत कीर्तिवंत होती. तो अनेक शिष्यांना विद्यासंपन्न करून पाठवीत असे. त्याच्या आश्रमांत एक उत्तंकनामक शिष्य अत्यंत बुद्धिमान् व गुरुभक्तिपूर्ण होता. तो वृद्धावस्था पावला तरी गौतम त्याला देशीं पाठवीना. उत्तंक सुशिष्य असल्यानें आपल्या अवस्थेकडे त्याचें लक्ष मुळींच नव्हतें. तो एकदां सर्पणाकरितां रानांत गेला; व लांकडांचा भारा आणून त्यानें जमिनीवर टाकला. लांकडांत गुंतलेला एक आपल्या डोक्याचा पांढरा शुभ्र केस त्याला दिसला. त्यायोगानें आपण इतके दिवस गृहस्थाश्रम न केल्याचा त्याला मोठा पस्तावा झाला. माझ्या बुद्धिमांद्यानें माझा कुलच्छेद होणार, ह्या विचारानें त्याचें तोंड उतरलेलें अहिल्येनें पाहिलें. तिनें लागलीच उत्तंकाची खिन्नता गौतमाला जाणविली. गौतमानें मृदुवाणीनें गृहस्थाश्रम करून गृह्याग्निकृत्यें करण्याविषयीं उत्तंकाला संमति दिली. तेव्हां उत्तंकानें गुरुदक्षिणा मागण्याविषयीं गौतमाची प्रार्थना केली. गौतम म्हणाला; तूं जी माझी नित्य सेवा केलीस, त्यानेंच मला दक्षिणा पूर्ण झाली आहे. उत्तंक म्हणाला; आपल्या कृपेनें मी विद्यापारंगत झालों; म्हणून आपण कांहीं तरी मागा; म्हणजे मला संतोष वाटेल. गौतम म्हणाला;

तुझ्या सेवेनेंच मला संतोष आहे. मी तुजपासून कांहींही मागूं इच्छित नाहीं. तेव्हां उत्तंक अहिल्येला म्हणाला; मातोश्री! आपण कांहींतरी मजपाशीं मागा. अहल्या म्हणाली; सौदासाच्या मदयंती नांवाच्या स्त्रीच्या कानांतलीं कुंडलें तूं मला आणून दे मीं चार दिवस वाट पाहून तीं न आणलींस तर पांचव्या दिवशीं तुला शाप देईन. लागलींच उत्तंक निघून सौदासाकडे गेला. सौदास व्याघ्रमुख होता तो उत्तंकाला म्हणाला; तूं माझें भक्ष्य आहेस. मी तुला खाऊन टाकणार. उत्तंक म्हणाला; तूं मला खुशाल खा; पण पूर्वीं मला मदयंतीचीं कुंडलें दे. तीं मी गुरुपत्नीला देऊन येतों. मग मी निश्चित होईन. सौदास म्हणाला; तूं किल्ल्यांत मदयंतीजवळ जा; व माझें नांव सांगून युक्तीनें कुंडलें मागून घे. नंतर आपलें वचन सत्य कर. उत्तंक जाऊन मदयंतीपाशीं कुंडलें मागूं लागला; ती म्हणाली; राजाची खूण आण. तेव्हां उत्तंक सौदासाजवळ खूण मागायला गेला. सौदास म्हणाला 'ज्यांवाचून सद्गति नाहीं; व जे दुर्गतीला नेतात' हें वाक्य तिला सांग; म्हणजे ती रत्नजडित कुंडलें देईल. उत्तंकानें ती खूण मदयंतीला सांगितली. मदयंतीनें कुंडलें काढून दिलीं; व ती उत्तंकास म्हणाली, हीं फार जपून ने, ह्यांकरितां तक्षक फार टपलेला आहे. कुंडलें घेऊन उत्तंक सौदासाजवळ आला; व म्हणाला कुंडलें मिळालीं; पण वाक्याचा अर्थ मला समजला नाहीं. कोणावांचून सुगति नाहीं व दुर्गतीला कोण नेतात हें सांगा. सौदास म्हणाला; ब्राह्मण संतुष्ट झाले असतां सुगति देतात; व असंतुष्ट होतील तर दुर्गति देतात, असा वसिष्ठाचा शाप मला झाला; व तो म्हणाला; जेव्हां हा प्रश्न तूं दुसऱ्याला समजावशील तेव्हां शापमुक्त होशील. उत्तंका! आज तुझ्या कृपेनें मी शापमुक्त झालों; व उत्तमलोक पावलों. आतां तूं खुशाल जा उत्तंक कुंडलें घेऊन निघाला. तो रस्त्यांत भुकेनें फार व्याकूळ झाला. त्यानें कुंडलें कृष्णाजिनांत गुंडाळून खालीं ठेविलीं; व फळें तोडण्याकरितां तो बेलावर चढला इतक्यांत तक्षक येऊन कुंडलें घेऊन बिळांत शिरला, तें उत्तंकानें पाहिलें, तोही त्याचे मागोमाग बिळांत शिरला; व दंडकाष्ठानें बीळ खणूं लागला. गुरुकार्याकरितां कष्ट पावणाऱ्या उत्तंकाला पाहून इंद्रानें आपल्या वज्रानें पृथ्वी खोदली. त्यांतून उत्तंक पाताळांत गेला. त्याला एक पांढरा उत्तम घोडा दिसला. घोडा उत्तंकाला म्हणाला, माझ्या गुदाला स्पर्श कर; म्हणजे तुझें काम होईल. उत्तंकानें तसें केल्यावरोबर सर्व पाताळ धुरानें व्यापलें. धुरानें सर्व सर्प व्याकूळ झाले; व तक्षकाला पुढें करून उत्तंकाजवळ आले. तक्षकानें उत्तंकाला कुंडलें दिलीं व सर्प निघून गेले. नंतर घोडा उत्तंकाला म्हणाला; मी अग्नि आहे. तूं गुरुघरीं जी माझी सेवा केलीस तिला जाणून मी संकटकालीं तज-

जवळ आलों. तूं माझ्या पाठीवर बैस. मी तुला गुरूजवळ नेतों. उत्तंक घोड्यावर बसून गौतमाजवळ आला. अहिल्या मार्गप्रतीक्षा करून समय टळतांच उत्तंकाला शापण्यास तयार झाली होती, इतक्यांत उत्तंक आलेला तिनें पाहिला. उत्तंकानें अहिल्येला नमस्कार करून कुंडलें दिलीं. अहिल्येनें संतुष्ट होऊन कुंडलें कानांत घातलीं; व उत्तंकाला जाण्यास परवानगी दिली. वसिष्ठ म्हणाला; अशा कारणानें तो खळगा पडलेला आहे. माझे मनांत तो फार दिवसांपासून बुजवावयाचा आहे. हिमाचला! तो तूं बुजव. तुझ्याशिवाय हें कोणाच्यानेंही होणार नाहीं.

---

## अध्याय ३ रा.

### नंदिवर्धनानें खड्डा बुजविला.

वसिष्ठाचें भाषण ऐकून हिमाचलानें पुष्कळ विचार केला; व तो वसिष्ठाला म्हणाला कीं एखादें शिखर तिकडे कसें जाऊं शकेल. इंद्रानें पर्वतांचे पक्ष पूर्वींच तोडले आहेत. तो जाण्याविषयीं आपणच विचार योजा वसिष्ठ म्हणाला; त्याला एक उपाय आहे. तुझा मुलगा जो नंदिवर्धन त्याचा अर्बुद-नामक पर्वत अतिशय स्नेही आहे. तो आकाशांत उडणारा असून पराक्रमीही आहे. तो एका क्षणांत आकाशमार्गानें त्याला नेईल हा विचार करूनच मी तुजकडे आलों आहें. तुझी जर माझेठायीं पूर्ण भक्ति आहे तर दुःख करूं नकोस, व आज्ञा कर. हें वसिष्ठाचें भाषण ऐकून हिमाचलाला फार दुःख झालें. कारण त्याचा धाकटा मुलगा मैनाक पक्ष तुटण्याच्या भीतीनें समुद्रीं लपला होता; व मोठा जो नंदिवर्धन त्यालाही वसिष्ठ नेऊं लागला. न द्यावा तर शापाचें भय, द्यावा तर पुत्रवियोग, असें त्याला संकट पडलें शेवटीं शापा-पेक्षां पुत्रवियोग पत्करून त्यानें नंदिवर्धनाला वसिष्ठाच्या आश्रमांत जाऊन खळगा बुजविण्याची आज्ञा दिली. अर्बुदावरून तूं जा म्हणून त्यानें पुत्राला सांगितलें. नंदिवर्धन म्हणाला; तो देश फार खराब व कंटकवृक्षांनीं व्याप्त आहे. तेथें नद्या नाहींत, व तेथें लबाड लोकांची वस्ती आहे, म्हणून तेथें रहाणें मला बरें वाटत नाहीं. तेव्हां घाबरलेल्या नंदिवर्धनाला वसिष्ठ म्हणाला; तूं अगदीं भिऊं नकोस, जरी तेथें दुष्ट वस्ती असली तरी माझा आश्रम तुझ्या शिखरावर राहील. तेथें तीर्थें, नद्या, पुण्यक्षेत्रें, सुंदर वृक्ष व मृगादिक पवित्र पशूंचा वास होईल. मी तुझ्याकारतां शंकराला तेथें आणीन; व सर्व देव तेथें राहतील.

हें वसिष्ठवाक्य ऐकून आनंद पावलेला नंदिवर्धन अर्बुदनागाला म्हणाला; चला! वसिष्ठाकरितां आपण तिकडे जाऊं. अर्बुद म्हणाला; मी तिकडे येईन व तुझ्या स्नेहानें तेथेंच राहीन; पण तेथें माझ्याच नांवानें प्रसिद्धि व्हावी, असें मी सांगतों. तें कबूल करून नंदिवर्धन अर्बुदावर बसून पित्याला नमस्कार करून वसिष्ठाबरोबर निघाला. अर्बुदानें नंदिवर्धनाला आणून खड्डयांत टाकला, तो पर्वत नाकापर्यंत त्या खळग्यांत गेला; व विवर साफ बुजालें. अशारीतीनें वसिष्ठाचें कार्य झालें असतां तो संतोषून अर्बुदाला म्हणाला; मी संतुष्ट झालों; तूं वर माग. अर्बुद म्हणाला ह्या पर्वतावरील झऱ्याला नागतीर्थ हें नांव असावें. व ह्या तीर्थांत स्नान करणारी स्त्री पुत्रवती व्हावी. वसिष्ठ म्हणाला; स्नान करणारी स्त्री पुत्रवती होईलच; पण श्रावण शुक्ल पंचमीला स्नान केलें असतां शंभर वर्षांच्या स्त्रीलाही पुत्र होईल, असा वर देऊन वसिष्ठ नंदिवर्धनाला म्हणाला; तूं वर माग. नंदिवर्धन म्हणाला; पूर्वी ठरल्याप्रमाणें आपण मजवर वास करावा; व माझी प्रसिद्धि अर्बुदनांवानें व्हावी. वसिष्ठानें तसा वर देऊन अनेक सुंदर वृक्षांनीं रम्य असें आपलें आश्रमस्थान त्याजवर केलें; व गोमती गंगा तेथें आणली, जीमध्यें स्नान केलें असतां स्वर्गप्राप्ति होते; व माघमासांत मकरेचा रवी असणें, हें तेथील पर्व आहे जो तेथें माघमास स्नान करून तिलदान करितो, त्याला तिळांच्या संख्येइतकीं वर्षें स्वर्गवास घडतो. येथें स्नान करून वसिष्ठाचें दर्शन व अरुंधतीचें पूजन करावें.

---

## अध्याय ४ था.

### अचलोत्पत्तिवर्णन.

सूत म्हणतात; वसिष्ठानें तेथें आश्रम केला; व शंकराला प्रसन्न करून तेथें आणण्याकरितां तपश्चर्या केली. त्यानें पूर्वी फलाहार करून नंतर दोनशें वर्षें पिकून गळलेलीं पानें खाऊन त्यानंतर पांचशें वर्षें जलाहार करून त्यापुढें हजार वर्षें वायुभक्षण करून; ग्रीष्मांत पंचाग्निसाधन, पर्जन्यांत उघड्यांत रहाणें; व हिंवाळ्यांत पाण्यांत बुडून तप करणें, अशीं हजार वर्षें पूर्ण केलीं; तेव्हां शंकर वसिष्ठावर प्रसन्न झाले असतां पर्वत विदारण होऊन त्यांतून लिंग उत्पन्न झालें. त्याला पाहिल्याबरोबर वसिष्ठानें शंकराची नामचरितवर्णनपर स्तुति केली, तेव्हां आकाशवाणी झाली कीं, वसिष्ठा! मी तुला प्रसन्न आहे. वर माग. वसिष्ठ म्हणाला; आपण ह्या लिंगांत चिरकाल

वास करावा. शंकर म्हणाला; आजपासून माझा ह्या लिंगांत वास होईल; व तुझ्या वाक्यानें सर्व खरें होईल. जे तूं केलेल्या ह्या स्तोत्राचा आश्विन वद्य चतुर्दशीला पाठ करतील, त्यांला उत्तम फलप्राप्ती होईल इंद्रानें पाठविलेली मंदाकिनी उत्तरेकडच्या कुंडांत वास करील. त्या कुंडांत स्नान करून जो ह्या लिंगाचें दर्शन घेईल, त्याला जरामरणरहित स्थान मिळेल. अचलाचा भेद करून हें लिंग उत्पन्न झालें, करितां हें अचलेश्वर ह्या नांवानें प्रख्यांत होईल, व तें प्रलयकाळींही चलन पावणार नाहीं, असें बोलून शंकर विराम पावले. वसिष्ठानें तप करून तेथें अनेक तीर्थें स्थापून आश्रमाचीहि स्थापना केला.

---

## अध्याय ५ वा.

### नागतीर्थमहात्म्य.

अर्बुदाचें महात्म्य विस्तारानें वर्णन करण्याविषयीं ऋषींनीं प्रार्थना केली असतां व्यास म्हणतात; पूर्वी पुलस्त्यनामक प्रसिद्ध महातपस्वी ऋषि ययातीचे घरीं गेला. ययातीनें अगस्त्याचें स्वागत व आतिथ्य करून अर्बुदमाहात्म्य वर्णन करण्याविषयीं प्रार्थना केली असतां पुलस्त्य म्हणाला; अर्बुद पर्वत अगाध असल्यानें त्याचें महात्म्य विस्तारानें वर्णन करणें अशक्य आहे, तरी तुला संक्षेपानें सांगतों. तेथें नागतीर्थ मुख्य असून तें सर्वांचे मनोरथ पूर्ण करणारें व स्त्रियांना संतति व सौभाग्य देणारें आहे. ह्याविषयीं एक गोष्ट सांगतों गौतमीनामक पतिव्रता स्त्री बालविधवा होती. तीं तीर्थें फिरत अर्बुदाला आली; व स्नानाकरितां नागतीर्थांत उतरली. तेथें एक पुत्रवती स्त्री यात्रेला आलेली असून तिची शुश्रूषा तिचा पुत्र करीत असलेली गौतमीनें पाहिली. तेव्हां पुत्रवती स्त्रिया धन्य आहेत, त्यांची शुश्रूषा पुत्र करतात. मी तर बालविधवा व निपुत्रिक आहे, असा खेद गौतमीला झाला. गौतमी नागतीर्थांतून स्नान करून निघाली तों तिचीं गर्भवतीचीं लक्षणें दिसूं लागलीं. त्या योगानें ती अतिशय दुःख पावून दुःखित होत्साती अग्निप्रवेश करण्यास सिद्ध झाली असतां 'गौतमी तूं अग्निप्रवेश करूं नकोस'. ह्या तीर्थाचें महात्म्यच असें आहे कीं, स्नान करणाराचे सर्व मनोरथ पूर्ण होतात. तूं त्या पुत्रवतीला पाहिल्यानें तुला पुत्राची इच्छा झाली; व तीं तीर्थानें पूर्ण केलीं. 'तुला मुलगा होईल' अशी आकाशवाणी झाली. तें ऐकून ती चकित झाली, व तिनें अग्निप्रवेश केला नाहीं. ती म्हणाली जर ह्या तीर्थाचा असा महिमा आहे, तर मी हें

सोडून कोठेंच जाणार नाहीं. असा निश्चय करून ती तेथेंच राहिली; व तिला लक्षणसंपन्न मुलगा झाला. आश्विन कृष्ण चतुर्दशीला जो येथें स्नान करून श्राद्ध करतो, त्याचा वंशच्छेद होत नाहीं. जो इच्छारहित स्नान करतो त्याला सद्गति मिळते. जी स्त्री ह्या तीर्थांत फुलें व फळें सोडत्ये, तिला पुत्र व सौभाग्य प्राप्त होतें; व स्वर्गहि मिळतो, करितां नागतीर्थाची यात्रा अवश्य करावी.

---

## अध्याय ६ वा.

### वसिष्ठाश्रममाहात्म्य.

नंतर वसिष्ठाच्या आश्रमाला जावें. त्याच्या दर्शनानें मनुष्य कृतार्थ होतो. तेथें असलेल्या कुंडांत वसिष्ठानें तपःप्रभावानें गोमती आणली आहे. त्यांत स्नान करणारा पातकापासून मुक्त होतो तेथें ऋषिधान्यानें श्राद्ध करणाराच्या दोन्ही कुळांचा उद्धार होतो. येथेंच नारदानें गाथा गायन केली. वसिष्ठाश्रमांत श्राद्ध करणाराला गयाश्राद्ध किंवा यज्ञ करण्याची जरूर नाहीं वसिष्ठाजवळच पतिव्रता अरुंधती आहे. तिचें पूजन करणाराचे सर्व मनोरथ पूर्ण होतात. तिन्हीं अवस्थांमध्यें केलेल्या पापाचा वसिष्ठदर्शनानें नाश होतो. वसिष्ठापुढें दिवा लावणारा तेजस्वी होतो. सप्तर्षींजवळ एक उपवास करणारा परमपद पावतो. त्रिरात्र उपोषण करणारा महर्लोक मिळवितो. एकमास उपवास करणारा जन्ममृत्यूच्या फेऱ्यांतून सुटतो. श्रावण्या पौर्णिमेस ऋषितर्पण करणारास ब्रह्मलोकप्राप्ती होते. वसिष्ठापुढें आठशे गायत्री जप करणाराचें एका जन्मातलें पाप नष्ट होतें. वामदेवाचें भजन करणाराला अग्निष्टोम यज्ञ केल्याचें फळ मिळतें. श्रद्धाळूंनीं वामदेवाचें पूजन जरूर करावें.

---

## अध्याय ७ वा.

### अचेलश्वरप्रभाववर्णन.

नंतर अचलेश्वराला जावें. त्याच्या दर्शनानें सिद्धि प्राप्त होते. तेथें आश्विन किंवा फाल्गुनांतल्या शिवरात्रीला श्राद्ध करणाराला उत्तम गति मिळते. दक्षिणेकडे बसून पूजा करणाराला अश्वमेध केल्याचें फळ मिळतें. पंचामृतस्नान घालणाराला शिवलोक मिळतो. प्रदक्षिणा व नमस्कार करणाराचीं संपूर्ण

पातकें नष्ट होतात. तेथें घडलेलें एक आश्चर्य मी नारदापासून ऐकिलें आहे, तें तुला सांगतों ऐक. तेथें एक पोपट घरट्यांत राहीं; व जातां येतां त्याला सहज देवप्रदक्षणा घडे. कांहीं दिवसांनीं तो मृत्यु पावला; व त्याला वेणुनामक राजाचा जन्म झाला. त्याला पूर्वजन्मींचें स्मरण राहिलें. तो अचलेश्वरापाशींच येऊन राहिला. तो अचलेश्वराला फक्त प्रदक्षिणा करी. दुसरें पूजन-अर्चन त्यानें कांहींही केलें नाहीं. तेथें कांहीं दिवसांनीं शौनकादिक महर्षि आले व त्यांनीं व्रत, तप, जप, होम, बली इत्यादि अनेक विधीनें अचलेश्वराचें अर्चन केलें. तेथें वेणुराजा फक्त प्रदक्षिणा करीत असलेला त्यांनीं पाहिला; व अन्योपचार न करितां केवळ प्रदक्षिणा करण्याचें कारण त्यांनीं त्याला विचारिलें, तेव्हां वेणुराजा आपलें पूर्वजन्मींचें वृत्त सांगून म्हणाला; अजाणतां नुसत्या प्रदक्षिणेंनींच जर मला पूर्वस्मरण, राजैश्वर्य व उत्तम जन्म मिळालें आहे, तर याजन्मींही प्रदक्षिणेशिवाय मी दुसरे कांहींही करीत नाहीं. हें वेणुराजाचें भाषण ऐकून सर्व ऋषींनीं त्याची फार प्रशंसा केली; व तेही अन्योपचार सोडून फक्त प्रदक्षिणाच करूं लागले. केवळ प्रदक्षिणा करूनच वेणुराजा मोक्षपद पावला.

---

## अध्याय ८ वा.

### भद्रकर्णह्रद व त्रिनेत्र यांचें माहात्म्य.

पुलस्त्य म्हणाला; नंतर भद्रकर्णह्रदाला जावें. अद्याप त्या ह्रदाजवळ पुष्कळ त्रिनेत्र शिळा मिळतात. त्याच्या पश्चिमेकडील लिंगाचें दर्शन केल्यानें मनुष्य शंकरासमान होतो. पूर्वीं येथें भद्रकर्णनामक शिवगण राहत असे. त्यानें ह्या लिंगाची व ह्रदाची स्थापना केली. एकदां स्कंद व सर्व शिवगण यांसह भद्रकर्ण दैत्यांशीं लढला, त्यावेळीं स्कंद; व वीरभद्रादिक गण जिंकले गेले; परंतु एकटा भद्रकर्ण नमुचि दैत्याशीं नेटानें लढला. शेवटीं भद्रकर्णानें नमुची दैत्याचा नाश केला असतां शंकर भद्रकर्णाला म्हणाले, तुला मी प्रसन्न आहें, इच्छित वर माग. भद्रकर्ण म्हणाला, मी जें लिंग अर्बुदपर्वतावर स्थापन केलें व ह्रद खोदला तेथें आपलें नेहमीं सांनिध्य असावें. शंकर म्हणाले; महाशिवरात्रीला माझें ह्या लिंगांत विशेष सांनिध्य राहील. जो भद्रकर्णह्रदांत स्नान व त्रिनेत्राचें दर्शन घेतो त्याला कैलासपदाची प्राप्ती होते.

---

# अध्याय ९ वा.

## केदारमाहात्म्यवर्णन.

नंतर पापनाशक अशा केदारक्षेत्राला जावें. तेथें गंगा व सरस्वती यांच्या संगमावर स्नान केल्यानें सर्वपापक्षय होतो. तेथील एक इतिहास सांगतों, ऐक. सूर्यवंशांत अजपालनामक राजा संपूर्ण पृथ्वीचा पति होता. तो हत्ती, घोडे, पायदळ, रथ व भांडारगृहें वाढविण्याची हांव न करतां प्रजेपासून वेतनाचा कर घेऊन त्यांचें उत्तम पालन करी. त्याचे कारकीर्दीत कोणीही अपराध करून सुटत नसे. अशा त्याच्या निष्कंटक राज्यांत प्रजा अतिशय सुखी असे. पाऊस वेळचेवेळीं उत्तम वृष्टि करी. धान्यें मुबलक व तेजस्वी असत. गाई अतिशय दूध देणाऱ्या निपजत. एकदां तीर्थयात्रा करीत वसिष्ठ-ऋषि त्याचे नगरांत आला. त्यानें वसिष्ठाचें योग्य स्वागत व पूजन केलें. वसिष्ठानें आनंद पावून अनेक राजांच्या व ऋषींच्या गोष्टी त्याला सांगीतल्या. शेवटीं अजपालराजा म्हणाला; आपण त्रिकालज्ञानी आहांत, कारितां माझ्या आश्चर्याचें परिमार्जन करा. वसिष्ठ म्हणाला; जें तुझ्या मनांत असेल तें खुशाल विचार. तें दुर्लभ असलें तरी मी तुला सांगेन. अजपाल म्हणाला; ज्यांत कोणी दुःखी, दीन, रोगी, अथवा दरिद्री बिलकुल नाहीं, असें निष्कंटक राज्य मला कोणत्या पुण्यानें मिळालें. माझी स्त्री मला प्राणापेक्षांही प्रिय समजून नेहमीं माझ्या सेवेंत तयार असते. हिचें सर्व हद्दत विस्तारानें सांगा; मी कोणतें दान, तप व्रत, याग किंवा नियम पूर्वजन्मीं केला कीं, ज्याचें फल सांप्रत लाभत आहे. वसिष्ठ म्हणाला; ऐक. परंतु लाजूं किंवा रागावूं नकोस. पूर्व-जन्मीं तूं शूद्र असून राणी तुझीच स्त्री असून पतिव्रता होती एकदां दुष्काळ पडून सर्व लोक भुकेनें अति व्याकूळ झाले. तेव्हां तूं आपल्या बायकोला घेऊन एका पर्वताच्या झऱ्यावर गेलास. तेथें तुला एक कमलवाटिका दिसली. तूं निर्झरांत स्नान करून पितृतर्पण केलेंस. नंतर तुझ्या मनांत आलें कीं, हीं कमळें नेऊन विकलीं असतां आपला उदरनिर्वाह होईल. तूं कमळें घेऊन स्त्रीसह गांवांत गेलास. लोक दुष्काळग्रस्त असल्यानें कमळें कोणीही घेईना. ह्यायोगानें तुला फार खेद झाला. सायंकाळीं एका गुहेंत गेलास; व जवळ कमळें ठेऊन पडून राहिलास. भुकेनें व्याकुलता असल्यानें ग्लानि तुला फार आली होती. कांहीं वेळानें वेद व पुराणपठण करीत असलेल्या ब्राह्मणांचा आवाज तूं ऐकलास. तूं कमळें घेऊन बायकोसह आवाजाचे धोरणानें शिवमंदिरांत गेलास, तेथें नागवतीनामक वेश्या शिव-

रात्रीचें उपोषण करून रात्रीं जागरण करीत होती. तिचे जवळ असलेल्या दासीस तूं विचारिलेंस, तेव्हां तिनें सर्व वर्तमान तुला सांगितलें; व ती म्हणाली; उपवास करून कमळांनीं केदारेश्वराचें पूजन केलें असतां रुद्रसालोक्य प्राप्त होतें. म्हणून हीं कमळें तूं मला दे. तुला त्याचें बारा तोळे सोनें देत्यें. तें तुला पुष्कळ दिवस पुरेल. तूं कमळें देऊन सोनें घेत होतास; पण तुझी बायको तसें न करूं देतां तुला म्हणाली; कमळें विकूं नका. अन्न न मिळाल्यानें दिवसभर उपास झालाच आहे. आपण दोघेही ह्या कमळांनीं केदारेश्वराची पूजा करूं. असें तिचें भाषण ऐकून तुम्हीं दोघांनीं केदारेश्वराचें पूजन व जागरण केलेंत. तेथें पुराण तुम्हांला सहजच ऐकूं आलें. तुझी दुसरे दिवशीं भिक्षा मागून पारणें केलेंत. कांहीं दिवसांनीं तूं मृत्यु पावलास. तुझी स्त्री तुजबरोबर सती गेली. तूं विदेहनगरींत राजकुळीं जन्मलास; व ती दशार्णदेशच्या राजाची मुलगी झाली. तूं प्राणिमात्राला प्रिय झालास व ती फिरून तुलाच प्राप्त झाली. तूं विचारल्यावरून तुला सांगितलेलें हें सर्व केदारेश्वराचें माहात्म्य आहे. कांहींही सरंजाम नसतां तूं पृथ्वीपति आहेस, हें ऐकून राजाला फिरून केदारेश्वराचे यात्रेला जाण्याची इच्छा झाली. तो प्रत्येक वर्षीं महाशिवरात्रीला केदारेश्वरीं जाई. नंतर तो पुत्राला राज्य देऊन वानप्रस्थाश्रमी झाला व स्त्रीसह अर्बुदावर जाऊन राहिला; आणि शेवटीं मोक्षाला गेला. हें तुला केदारेश्वराचें महात्म्य सांगितलें. माघ वद्य चतुर्दशीला महाशिवरात्र म्हणतात; ते दिवशीं जे केदारेश्वराचें दर्शन घेतात, त्यांना सद्गति मिळते. केदारकुंडांतील जलपान करणाऱ्याच्या चवदा पिढ्या उद्धरतात. हें महात्म्य ऐकणाराही केदारेश्वराचे कृपेनें पापमुक्त होतो.

---

## अध्याय १० वा.

### सर्वतीर्थांचें आगमन.

केदारतीर्थ हिमाचलावर आहे. हिमाचलांतून निघालेली गंगा पूर्वसमुद्राला मिळते. सरस्वतीचा उगम आम्रवृक्षांतून असून ती वडवानलाला घेऊन पश्चिमसमुद्राला जाते, असें ऐकतों. मग येथें केदार कसा आला. हें सर्व मला आश्चर्यकारक दिसतें; म्हणून आपण कृपा करून विस्तारानें सांगा' असा ययातीचा प्रश्न ऐकून पुलस्त्य म्हणतात; राजा! तूं जें विचारिलेंस तें सर्व खरें आहे. तरी त्याची साद्यंत कथा सांगतों, ऐक. गंगादिक तीर्थें केदारादिक देव, इंद्रादिक राजे, सर्व ऋषि, व मी पूर्वीं ब्रह्मदेवांकडे गेलों. तेथें धर्मविषयक

पुष्कळ कथा झाल्या. सर्व क्षेत्रें, तीर्थें, वनें, बाग हे सर्व तेथें जमले होते. तेव्हां इंद्रानें कौतकानें ब्रह्मदेवाला प्रश्न केला कीं, कृतादिक युगांचें प्रमाण व माहात्म्य ऐकण्याची मला फार इच्छा आहे. ब्रह्मदेव म्हणाला; सत्रा लक्ष अठ्ठावीस हजार कृतयुग, बारा लक्ष शाण्णव हजार त्रेतायुग, आठ लक्ष चौसष्ट हजार द्वापरयुग व चार लक्ष बत्तीस हजार वर्षें कलियुग, हें त्यांचें प्रमाण आहे. कृतयुगांत धर्म चतुष्पाद व शुक्लवर्ण जनार्दन-नामक आहे. त्या युगांत आधि, व्याधि, दुष्काळ व अकालीं मरण नाहीं. सर्व लोक धार्मिक असतात. नांगरल्याशिवाय शेतें पिकतात. गाई दुधाळ असतात, काम, क्रोध, भीति, लोभ मत्सर, ईर्ष्या हे दोष असत नाहींत नंतर त्रेतायुगांत धर्म त्रिपाद होतो. मनुष्य दीर्घायुषी असतात. जनार्दन रक्तवर्ण होतो यज्ञ फलदायक होतात मनुष्य कामवृत्त असत नाहींत. ते तप, ब्रह्मचर्य स्नान, दान, यज्ञ, जप होमपरायण असतात. पुढील द्वापरयुगांत धर्म द्विपाद, जनार्दन पीतवर्ण, यज्ञादि कर्में फलेच्छाप्रवृत्त, लोक सत्यानृतपर, राज्याकरितां युद्धप्रवृत्ति हीं होतात. नंतर चौथ्या कलि-युगांत धर्म एकपाद, पूजेचा कंटाळा, विष्णु कृष्णवर्ण, लोक पापप्रवृत्त; माया, मत्सर, काम, क्रोध, भय, मोह, लोभप्रवृत्त राजे, अर्थलोभी बनतात. मनुष्य अल्पायुषी, पृथ्वी नापिक, कमी दुधाच्या गाई, सत्यहीन ब्राह्मण, कपटी लोक शिश्नोदरपरायण, खोटसाळ व पापी कलियुगांत होतात. पुरुषांचे सोळाव्या वर्षीं केस पिकतील बायकांना बारावे वर्षीं मुलें होतील. वर्णांचा संकर होईल सर्व वर्ण एकरूप होतील. यज्ञ व कुलाचार नष्ट होतील. तीर्थें म्लेंछस्पर्शानें भ्रष्ट व प्रभावरहित होतील. हें ब्रह्मदेवाचें भाषण ऐकून तेथें असलेलीं तीर्थें ब्रह्मदेवाला म्हणालीं; कलियुग प्राप्त झालें असतां आम्हीं कोठें व कसें रहावें. ब्रह्मदेव म्हणाला; अर्बुद हा पर्वतांमध्यें श्रेष्ठ आहे. त्याजवर कलीचा प्रवेश नाहीं; म्हणून सर्व तीर्थांनीं देवतासुद्धां तेथें जावें. महापापीहि अर्बुदाचें दर्शन घेईल, तर कलिदोष त्याला स्पर्श करूं शकणार नाहींत; व तो उत्तम गति पावेल. पुलस्त्य म्हणाला; ह्याप्रमाणें सांगून ब्रह्मदेव सत्यलोकाला गेला. सर्वही तीर्थें कलीच्या भयानें अर्बुदपर्वतावर जाऊन राहिलीं. तेथें शांतवृत्तीनें वास करणारे मनुष्य मोक्ष पावतात. तेथें श्राद्ध केलें असतां पूर्वजांचा उद्धार होतो. तेथील एक आश्चर्यजनक इतिहास सांगतों. मंकणकनामक ऋषि शांत होत्साता सरस्वतीच्या तीरीं तप करीत असे. त्याला एकदां खोकला येऊन रक्ताचे खाकरे पडले. तें पाहून मंकणकाला फार आनंद झाला. मी सिद्ध आहे; असें मानून तो नृत्य करूं लागला त्यामुळें स्थावरजंगमात्मक विश्व क्षोभ पावलें. सर्वही घरधंदे सोडून आश्चर्यचकित झाले; व त्याजबरोबर

आनंदानें नृत्य करूं लागले. तेव्हां देवांनीं शंकराकडे जाऊन प्रार्थना केली कीं, हा ब्राह्मण स्वस्थ राहील असें करा. शंकर ब्राह्मणरूपानें मंकणकाकडे गेले व त्याला म्हणाले, तूं तपस्वी असून नृत्य कां करतोस? मंकण म्हणाला; रक्त व पित्त माझ्या शरीरांत आहे, ही मला सिद्धि झाली; म्हणून मी आनंदानें नृत्य करीत आहें. नंतर ब्राह्मणरूपी शंकरानें तर्जनीनें आपला आंगठा ठोकला; व त्यांतून पांढरें शुभ्र भस्म काढलें. पुलस्त्य म्हणतो; तें ऋषीनें पाहिल्याबरोबर हा शंकर आहे, असें समजून मंकणक आश्चर्यचकित झाला; व शंकराला म्हणाला, तूं महादेव आहेस, हें मी जाणिलें. हें दुसऱ्याचें सामर्थ्यच नव्हे. मजवर कृपा करून माझा उद्धार करा. शंकर म्हणाले; तूं बरोबर ओळखिलेंस. मी तुला प्रसन्न आहे. मंकणक म्हणाला; ह्या तीर्थांत जे स्नान करतील, त्यांना राजसूय व अश्वमेध यज्ञ केल्याचें फळ मिळावें. शंकर म्हणाले; जे येथें स्नान करतील त्यांना सर्व फळ मिळूनहि मोक्ष मिळेल. गंगासरस्वतीच्या संगमीं श्राद्ध करणारे उत्तम पद पावतील. येथें सुवर्णदान करणारे मोक्षपदाला जातील.

## अध्याय ११ वा.

### कोटीश्वरमाहात्म्य.

नंतर दर्शनानें उत्तम सिद्धि देणाऱ्या कोटीश्वराला जावें. तेथील एक आश्चर्यकारक गोष्ट सांगतों. पूर्वी दक्षिणेकडून कोट्यावधि ऋषि अचलेश्वराचें दर्शन करण्याच्या स्पर्धेनें अर्बुदावर आले. त्यांच्यांत प्रतिज्ञा ठरली कीं, जो शेवटीं येईल, तो पापी व भक्तिहीन समजावा. त्यांची भक्ति जाणून भगवान्महेश्वरानें कोटिलिंगरूप होऊन सर्वांना एकाच वेळीं दर्शन दिलें. त्यायोगानें ऋषींनीं वैदिकरीतीनें शंकराची स्तुति केला. शंकर प्रसन्न होऊन त्यांना म्हणाले; मी तुमची भक्ति जाणून प्रसन्न झालों. तुम्ही सर्वांनीं इच्छेला वाटतील तसें निरनिराळे वर मागा. सर्व ऋषि म्हणाले; आम्हां सर्वांस हा एकच वर इष्ट आहे कीं, सर्वांनीं एकदम दर्शन घेतलें असतां उत्तम फलप्राप्ती व्हावी. शंकर म्हणाले; माझें दर्शन व्यर्थ जाणार नाहीं. दर्शन करणाऱ्या ब्राह्मणाला तीर्थाचें फळ मिळेल. ऋषि म्हणाले; जर आपले मनांतून वर द्यावयाचाच आहे तर ह्या कोटिलिंगाचें एक लिंग व्हावें; व त्याच्या दर्शनानें कोटिलिंगदर्शनाचें फळ मिळावें. हाच आम्हाला वर असावा. पुलस्त्य म्हणतात; ऋषींनीं अशी प्रार्थना केल्याबरोबर पर्वत विदीर्ण होऊन त्यांतून लिंग

उत्पन्न झालें; व आकाशवाणी झाली कीं, हें माझें लिंग कोटीश्वर ह्या नांवानें प्रसिद्ध होईल. माघ वद्य चतुर्दशीला जे ह्याची पूजा करितील त्यांला कोटिपट पुण्य लागेल. जो दाक्षिणी ब्राह्मण येथें श्राद्ध करील, त्याला कोटिपट फल गयाश्राद्धासारखें मिळेल. ह्याकरितां हें लिंग विशेष पूज्य आहे, असें बोलून आकाशवाणी स्तब्ध राहिली. ऋषींनीं षोडशोपचारांनीं यथाविधि त्या लिंगाची पूजा केली; व त्यांना उत्तम सिद्धि झाली.

## अध्याय १२ वा.

### रूपतीर्थमाहात्म्य.

पुलस्त्य म्हणतात; नंतर रूपसौभाग्यदायक अशा रूपतीर्थाला जावें. तेथील वपुनामक अप्सरेची गोष्ट सांगतों. तेथें एक अतिशूद्र स्त्री होती. ती माघ शुक्ल तृतीयेला अर्बुदाचलावर फळें गोळा करण्याकरितां फिरत असतां एका डबक्यांत पडली. ती त्या तीर्थाच्या प्रभावानें एक रूपसंपन्न तरुणी झाली. त्या वेळीं त्या पर्वतावर क्रीडा करण्याकरितां इंद्र आला असतां तो तिला पाहून काममोहित होऊन म्हणाला; तूं कोण आहेस? व येथें कशाकरितां आलीस. देवी, नागकन्या, सिद्धा, विद्याधरी ह्यांपैकीं तूं कोण आहेस? हे सुंदरी, तूं माझें मन हरण केलेंस. मी इंद्र आहे, माझा स्वीकार कर. ती म्हणाली; मी अतिशूद्र जातीची व पुष्कळ नवऱ्यांची बायको आहे मी फळें तोडीत असतां झऱ्यांत पडल्यें. पडल्याबरोबर माझें रूप एकदम पालटलें. तूं देवांनांही दुर्मिळ आहेस मग मनुष्यांची कथा काय. सर्व देव तुझे ताबेदार आहेत. माझा स्वीकार करून उपभोग घे. इंद्र तिचा स्वीकार करून कामनिवृत्तीनंतर तिला म्हणाला; मी तुला प्रसन्न आहे, इच्छेला येईल तो वर माग. स्त्री म्हणाली; सर्व देवांनीं प्रसन्न होऊन ह्या तीर्थांत माघ शुक्ल तृतीयेला स्नान करणारास देवांपेक्षांही उत्तम स्वरूप द्यावें; व तूं मला स्वर्गांत ने. तसें होईल, असा वर देऊन इंद्रानें तिला स्वर्गांत नेलें. तिला स्वरूप मिळाल्यानें ती वपुनांवानें प्रसिद्ध झाली. माघ शुक्ल तृतीयेस पहांटे देव त्या तीर्थांत स्नानाला येतात. जे कोणी त्या तीर्थांत स्नान करितात त्यांना वपूसारखें स्वरूप प्राप्त होतें. त्याच्या पूर्वेला एक सुंदर तीर्थ आहे. नागकन्या तेथें स्नान करून व तीर्थोदक घेऊन पाताळांत जातात. तेथें विनायकपीठापाशीं मोठ्या पाषाणाखालून एक जलप्रवाह वाहत आहे. त्या उदकांत स्नान करणारा मनुष्य सिद्धि पावतो, ते जल बरोबर घेणाराला त्रैलोक्यांत कोणीही

उपद्रव करूं शकत नाहीं. तेथें गुहेच्या तोंडीं तिलनामक वृक्ष आहे. त्याच्या फुलानें किंवा फळानें सर्व कार्यें सिद्ध होतात. त्या तीर्थाभोंवतालचे दगड शंखासारखे आहेत; पण त्या तीर्थोदकस्पर्शानें ते सुवर्णमय होतात. वांझ स्त्री त्या तिलाच्या फूल किंवा पानासह त्या तीर्थाचें जलप्राशन करील, तर तत्काल गरोदर होईल. त्या तीर्थांत स्नान करणाऱ्या मनुष्याचा रोग किंवा ग्रहपीडा नाहींशी होते. भूत, प्रेत, पिशाचबाधा नाहीशी होते. पाप नष्ट होतें. पक्षी, पिशाच, पशु सर्वही त्या तीर्थोदकस्पर्शानें सद्गति पावतात. ययाति म्हणाला; हे मुने! आपण सांगितलेलें हें रूवतीर्थाचें माहात्म्य फारच आश्चर्यकारक आहे. असें अत्युत्तम माहात्म्य असण्याचें कारण काय, ते सविस्तर सांगा. तें ऐकण्याची मला फार उत्कंठा आहे. पुलस्त्य म्हणतात. जेव्हां इंद्र राज्यभ्रष्ट झाला; व बली त्रैलोक्याचें राज्य करूं लागला, तेव्हां अदितीनें येथें मोठें तप केलें. अदितीच्या उदरीं भगवानानें अवतार घेतला. तो जन्मल्याबरोबर अदितीनें त्याला ह्या झन्यावर ठेविलें, त्या कारणानें हें तीर्थ अतिपवित्र व मनोरथ पूर्ण करणारें झालें. हें ह्या तीर्थाच्या प्रसिद्धीचें कारण तुला सांगितलें. भगवानानें अदितीच्या उदरीं अवतार माघशुद्ध तृतीयेला घेतला. ह्या तिलकवृक्ष अदितीनें आपल्या हातानें पाणी घालून मुलासारखा वाढविला आहे. हें ह्या तीर्थाचें माहात्म्य सांगितलें आहे. ह्यांत स्नान करणाराचे मनोरथ इहलोकीं व परलोकींही पूर्ण होतात. करितां ह्यांत अवश्य स्नान करावें.

---

## अध्याय १३ वा.

### हृषीकेशमाहात्म्य.

पुलस्त्य म्हणतात; नंतर ईशान्य दिशेला असलेल्या अंबरीषाच्या तीर्थाला जावें. त्या तीर्थावर अंबरीषाच्या सांगण्यावरून भगवान राहिला आहे. पूर्वी कृतयुगांत अंबरीषनामक राजा भगवदाराधना करून दुष्कर तप करता झाला. त्या तीर्थावर अंबरीष जितेंद्रिय व मिताहार होऊन एक हजार वर्षें राहिला. नंतर फलाहारानें दोन हजार वर्षें काढिलीं. त्यानंतर आपोआप पिकून गळालेलीं पानें खाऊन दोन हजार वर्षें तप केलें. नंतर दोन हजार वर्षें जलाहार, व तीन हजार वर्षें वायुभक्षण करून तप केलें. अशारीतीनें हजार वर्षांच्या तपानें प्रसन्न होऊन विष्णूनें त्याला दर्शन दिलें. भगवान् इंद्ररूपानें ऐरावतावर आरोहण करून अंबरीषाला म्हणाला; तुझ्या इच्छेला वाटेल तो वर माग.

तुझी भक्ति पाहून मी तुला दर्शन दिलें आहे. अंबरीष म्हणाला; तूं मला मोक्ष देण्याला तर असमर्थ आहेस; व त्रैलोक्याचें राज्य तर माझेंच आहे. अर्थात् तुजपाशीं कांहीं ही मागण्याची मला इच्छा नाहीं. जा, तुझें स्वागत असो. इंद्र म्हणाला; अंबरीषा ! वर माग, संपूर्ण देवांचा मी राजा आहे. मी प्रसन्न आहे तर सर्व देव तुला प्रसन्न आहेत. अंबरीष म्हणाला; तूं त्रैलोक्याचा व सर्व देवांचा राजा आहेस. मीही सप्तद्वीपवती पृथ्वीचा अधिपति आहे; व विष्णूचा उपासक आहे, मला विष्णु वर देईल. इंद्र म्हणाला; मी वर देत असतां जर तूं मागितला नाहींस तर तुजवर वज्र टाकीन, असें म्हणून इंद्रानें वज्र टाकण्याकरितां गरगर फिरविलें, त्याबरोबर पर्वतांचीं शिखरें कोसळलीं. आकाशांत मेघ कडाडूं लागले, चोहींकडे अंधकार व्यापला. अंबरीष डोळे झांकून समाधिस्थ झाला. भगवानानें स्वरूप पालटिलें. तत्काळ ऐरावताचा गरुड झाला; व वज्राचे जागीं शंख, चक्र, गदा, पद्म आयुधें धारण केलेला भगवान अंबरीषाला म्हणाला. तुझी अनन्य भक्ति पाहून मी तुला प्रसन्न झालों आहे. दुर्मिळ असाही इच्छित वर माग. अंबरीष म्हणाला; तुम्ही प्रसन्न झालांत तर माझी संसारसागरांतून मुक्तता करा. पुलस्त्य म्हणतात; नंतर भगवानानें अंबरीषाला ज्ञानयोगाचा उपदेश केला. ज्याचें श्रवणेंकरून मनुष्य संसार-समुद्रांतून मुक्त होतो. नंतर अंबरीष भगवानाला नमस्कार करून म्हणाला; ज्याचा मला उपदेश केला हा ज्ञानयोग मनुष्याला जाणण्याला अशक्य आहे. व कलियुगांत तो जास्तच दुर्घट आहे. जर आपण प्रसन्न अहांत, तर लो-कोपकारार्थ मला आपण क्रियायोगाचा उपदेश करा पुलस्त्य म्हणतात; नंतर भ-गवानांनीं अंबरीषाला कर्मयोगाचा उपदेश केला, तो श्रवण करून अंबरीष म्हणाला, हे भगवन् ! जर आपण मजवर प्रसन्न आहांत तर ह्याच रूपानें माझ्या आश्रमांत नेहमीं वास करावा. मी जशारीतीनें आपल्या मूर्तीचें अर्चन केलें तसेंच आपल्या मूर्तीचें लोक पूजन करतील. हा वर भगवंतांनीं अंबरीषाला दिला असतां अंब-रीषानें देवमंदिर तयार केलें; व भगवत्प्रतिमेची पूजा केली. भगवान् विष्णू त्या प्रतिमेंत येऊन राहिले; व अद्याप वास करीत आहेत. तेव्हांपासुन पृथ्वीवर कर्म-योग व प्रतिमापूजा प्रवृत्त झाली. अर्बुदाचलावर त्या मूर्तीचें पूजन करणाला भगवत्सालोक्य प्राप्त होतें. एकादशीस निराहार करून हृषीकेशाजवळ जागरण करणारास देवांनाही दुर्लभ असें स्थान मिळतें. पुष्कळ क्षेत्रांत कार्तिकीला कपि-लादान केल्याचें पुण्य हृषीकेशाच्या दर्शनानें मिळतें. शुक्लपक्षांतील अथवा कृष्णपक्षांतील हरिवासर हृषीकेशाजवळ केला असतां अश्वमेध केल्याचें पुण्य लागतें. जो कोणी हृषीकेशाची चार महिने व्रतस्थ राहून पूजा करील, त्याला पुनर्ज-न्म मिळत नाहीं. संपूर्ण तीर्थांचें स्नान, सत्पात्र ब्राह्मणाला संपूर्ण दानें, दिल्याचें

फळ, सहस्र कन्यादानाचें फळ, सूर्यग्रहणीं कुरुक्षेत्रांत उत्तम दानाचें फळ, अग्निष्टोमादिक यज्ञ दक्षिणासह यथाविधि केल्याचें फळ, हिमालयांत देहपाताचें फळ, तीर्थांत देहत्यागाचें फळ, प्रायोपवेशानें देहत्यागाचें फळ, ब्रह्मज्ञानोपदेशाचें फळ, पितृपक्षांत गयाश्राद्धाचें फळ, हजार वर्षें व्रत किंवा तप केल्याचें फळ, चारी वेद पठन केल्याचें फळ, हें सर्वही चातुर्मास हृषीकेशदर्शनानें प्राप्त होतें; म्हणून प्रयत्नपूर्वक अंबरीषानें स्थापिलेल्या हृषीकेशाजवळ वास करावा. कितीही पाप केलें असलें तरी हृषीकेशाचे दर्शनानें तो पापमुक्त होतो.

## अध्याय १४ वा.

### सिद्धेश्वरमाहात्म्य.

विश्वावसु नांवाच्या एका गंधर्वानें शंकराची आराधना केली. शंकर प्रसन्न होऊन विश्वावसूला वर मागण्याबद्दल सांगितलें असतां आपण येथें सिद्धेश्वर या नांवानें राहावें; व सर्व भक्तांच्या इच्छा पूर्ण कराव्या, असें त्यानें सांगितलें. व शंकर तेथें सिद्धेश्वर या नांवानें राहिले.

## अध्याय १५ वा.

### शुक्रेश्वर.

पूर्वी सर्व दैत्यांना जिंकून देवांचा विजय झाला, तेव्हां शुक्रानें पुनः दैत्यांना जयप्राप्ती व्हावी, या इच्छेनें शंकराची आराधना केली. त्यानें हजार वर्षें तप केलें, तेव्हां शंकर प्रसन्न झाले; व त्यांनीं शुक्राला संजीवनी विद्या दिली; व जेथें शुक्रानें तप केलें तेथें शंकर स्वतः शुक्रेश्वर नांवानें राहते झाले. शुक्रेश्वराजवळ एक कुंड आहे, त्यांत स्नान करून शुक्रेश्वराचें पूजन केलें असतां एकवीस कुळांचा उद्धार होतो; असें सांगितलें आहे.

## अध्याय १६ वा.

### मणिकर्णिकेश्वर.

नंतर मणिकर्णिकेश्वराजवळ एक कुंड आहे, मणिकर्णिका नांवाची एक भिल्लीण पाणी पिण्याकरितां आली. त्या वेळीं सूर्यग्रहण होतें; सूर्यग्रहणाचे वेळीं त्या

कुंडांत शिरताच तिचें स्वरूप देवस्त्रीप्रमाणें सुंदर झालें. भिल्लीणीचा पति शोधीत तेथें आला; व आपल्या स्त्रीची हकीकत ऐकून तो भिल्लही त्या कुंडांत शिरला, व रूपवान् झाला; व तीं उभयतां विमानांत बसून स्वर्गी गेलीं. त्या दिवसापासून त्या कुंडाला मणिकर्णिकाकुंड असें नांव प्राप्त झालें. सूर्यग्रहणाचे वेळीं मणिकर्णिकाकुंडांत स्नान करून मणिकर्णिकेश्वराचें पूजन केलें असतां सर्व मनोरथ सफल होतात.

## अध्याय १७ वा.



### पंगुतीर्थ.

पंगु नांवाचा ब्राह्मण च्यवन ऋषीच्या कुळांत जन्माला आला होता; तो जन्मतांच पांगळा होता; त्यानें ह्या कुंडांत स्नान करून तेथें शिवलिंगाची स्थापना केली; शंकरानें प्रसन्न होऊन त्यास पाय दिले. चैत्र शुक्ल चतुर्दशीला या पंगुतीर्थांत स्नान करण्याचें महात्म्य विशेष सांगितलें आहे.

## अध्याय १८ वा.

### यमतीर्थ.

पूर्वी चित्रांगद नांवाचा एक लोभी, क्रूर, दुष्ट, व दुराचारी राजा होता. तो अर्बुदपर्वतावर फिरत असतां तहान लागल्यामुळें तो त्या सरोवरांत उतरला इतक्यांत एक सुसर तेथें आली; व तिनें राजाला खाऊन टाकिलें. यमदूतांनीं त्याला नरकांत टाकिलें; पण राजाच्या सहवासानें त्या नरकांत राहणाऱ्या इतर प्राण्यांना सुख झालें. यमतीर्थांत ह्या राजाला मृत्यु प्राप्त झाल्यामुळें हा सर्व विचित्र प्रकार घडला, असें जाणून यमानें राजाला तेथून काढून शिवलोकीं पाठविलें; व दूतांना सांगितलें कीं, आजपासून यमतीर्थांत मरण पावलेल्या प्राण्यांना तुम्ही यमलोकीं न आणतां शिवलोकीं न्यावें.

## अध्याय १९ वा.

### वाराहतीर्थ.

विष्णूनें वराहाचा अवतार घेऊन पृथ्वी स्थिर केली. त्या वेळीं पृथ्वीनें वर मागितला कीं, हे विष्णो! जर आपण वैकुंठीं जात असाल तर आपण या

तीर्थात वराहरूपानें वास्तव्य करावें. ह्या वाराहतीर्थात माघ शुद्ध एकादशीच्या दिवशीं स्नान केलें असतां ते ब्रह्महत्यादि दोषापासून मुक्त होतात.

## अध्याय २० वा.

### चंद्रप्रभासतीर्थ.

चंद्रानें दक्षाच्या सत्तावीस कन्यांबरोबर विवाह लाविला. त्या सत्तावीस स्त्रियांमध्यें रोहिणी नांवाच्या स्त्रीशींच चंद्राचें प्रेम ज्यास्त असल्यामुळें इतरांचा त्याग करून तो तिच्यांशींच रममाण झाला. अर्थात् बाकीच्या सव्वीस स्त्रियांना दुःख झालें; व त्यांनीं दक्षाध तें वर्तमान कळविलें. दक्षानें चंद्राला तूं क्षयी होशील, असा शाप दिला. क्षयरोगापासून आपली निवृत्ति व्हावी, म्हणून चंद्रानें अर्बुदपर्वतावर जाऊन तपश्चर्या केली. शंकर प्रसन्न होऊन त्यानें चंद्रास शुक्लपक्षांत वृद्धि व कृष्णपक्षांतच फक्त क्षय होईल, असा वर दिला; त्या शिवलिंगाला चंद्रप्रभासतीर्थ असें नांव प्राप्त झालें. चंद्रग्रहणांत सोमवार आला असतां त्या दिवशीं ह्या चंद्रप्रभासलिंगाचें पूजन व चंद्रप्रभास तीर्थांत स्नान केल्यानें मुक्ति मिळते.

## अध्याय २१ वा.

### पिंडोदकतीर्थ.

पिंडोदक नांवाचा एक ब्राह्मण मंदबुद्धि असल्यामुळें अध्ययन करण्यास असमर्थ झाला, व दुःखी होऊन त्यानें अर्बुदपर्वतावरील एका गुहेंत प्रवेश केला. त्या गुहेंत हातांत वीणा घेऊन सरस्वती बसली होती. तिनें ब्राह्मणाला बुद्धि व ऐश्वर्य दिलें; आणि त्या गुहेंतील तीर्थाला पिंडोदकतीर्थ असें नांव दिलें; व तीर्थात स्नान करणारा मंदबुद्धि असला तरी सर्वज्ञ होतो, असें त्याचें माहात्म्य सांगितलें आहे.

## अध्याय २२ वा.

### श्रीमाता.

कृतयुगामध्यें कालिंग नांवाच्या दैत्यानें स्वर्ग जिंकून स्वर्गाधिपत्य मिळविलें; व दिग्पालाच्या जागींहि दैत्यांची योजना केली. तेव्हां देवांनीं अर्बुदपर्वतावर

जाऊन श्रीमातादेवीची दहा हजार वर्षे आराधना केली. तेव्हां कलिंगमातेनें आपल्या मुखांतून कोट्योवधि सैन्य उत्पन्न करून कलिंगसैन्याचा फडशा पाडला; परंतु कालिंग अमर असल्यामुळें त्याला आडवा पाडला; व त्याच्या उरावर श्रीमातेनें एक पर्वताचें शिखर ठेवून त्यावर ती बसली. त्या दिवसापासून त्या शिखरावर बसलेल्या देवीला श्रीमाता असें नांव प्राप्त झालें. नंतर इंद्राला व इतर देवांना आपआपल्या राज्याची प्राप्ती झाली. चैत्र शुक्ल चतुर्दशीच्या दिवशीं जे ह्या श्रीमातेचें दर्शन घेतात, ते सद्गतीला प्राप्त होतात, असें वर्णन आहे.

## अध्याय २३ वा.

### शुक्लतीर्थ.

पूर्वी एक शमिलाक्ष नांवाचा परीट होता. त्या परीटानें स्वच्छ धुण्याकरितां आणिलेलीं लोकांचीं वस्त्रें चुकीनें निळ्या रंगांत बुडविलीं; त्यामुळें सर्व वस्त्रें निळ्या रंगाचीं झालीं. नंतर एका दाश कन्येच्या सांगण्यावरून तीं वस्त्रें परीटानें अर्बुदपर्वतावर असलेल्या एका कुंडांत बुडवितांच तीं सर्व दुधाप्रमाणें स्वच्छ झालीं. त्या दिवसापासून त्या तीर्थाला शुक्लतीर्थ असें नांव प्राप्त झालें आहे.

## अध्याय २४ वा.

### कात्यायनी.

पूर्वी शुंभ नांवाचा एक दैत्य शंकराच्या वरानें गर्विष्ठ होऊन व देवांना जिंकून त्रैलोक्याचें राज्य करूं लागला. तेव्हां देवांनीं अर्बुदावर जाऊन तपश्चर्या केली. देवीनें प्रसन्न होऊन शुंभासुराचा पराजय केला; व इंद्राचें राज्य इंद्राला मिळवून दिलें; व देवी स्वतः त्या पर्वतावर कात्यायनी नांवानें जगाच्या उद्धारार्थ राहिली.

## अध्याय २५ वा.

### पिंडारकतीर्थ.

पूर्वी मंकी नांवाचा ब्राह्मण ब्रह्मकर्मांत अनभिज्ञ व मूर्ख असा होता. एक म्हैस शेणगोळे विकण्याकरितां म्हणून पाळिली. शेणाचे गोळे विकून मिळविलेल्या

पैशांतून दोन गाई खरेदी केल्या. पण त्या गाईंना उंटानें मारिलें. तेव्हां त्यानें तप करण्यास सुरुवात केली. इतक्यांत एके दिवशीं पार्वतीसह शंकर फिरत फिरत तेथें आले. मंकीनें शंकराला नमस्कार करून पिंडारकनांवानें येथें तीर्थाची स्थापना करा, असें सांगितलें. शंकरानें त्याप्रमाणें कबूल केलें; व शंकर पार्वतीसह कैलासीं निघून गेले. त्या दिवसापासून ह्या तीर्थाला पिंडारक-तीर्थ हें नांव प्राप्त झालें.

---

## अध्याय २९ ते ६३



**कनकतीर्थ**—पूर्वी एक सुमती नांवाचा राजा पुष्कळ सुवर्ण बरोबर घेऊन सूर्यग्रहणकाळीं कनखलतीर्थांत स्नान करण्याकरितां गेला. अव्यवस्थितपणा-मुळें तें सर्व सोनें नाहींसें झालें. राजानें पुष्कळ शोध केला, पण त्याला तें सांपडलें नाहीं. राजा काळजी करीत बसला असता आकाशवाणी झाली कीं, येथें पडलेल्या वस्तूचा कधीही नाश होत नाहीं. पूर्वी नष्ट झालेलें तुझें सोनें कोटी-पटीनें वाढलें आहे, असें समज. जे कोणी ह्याठिकाणीं सुवर्णदान करतात त्याचें फल त्यास कोटीपटीनें मिळतें. ह्याकरितां प्रत्येकानें येथें स्नान करून सुवर्णदान व श्राद्धदान करावें; म्हणजे कोटीगुणित फळ मिळतें, असें वर्णन आहे.

---

**चक्रतीर्थ**—येथें पूर्वी विष्णूनें चक्र टाकलें होतें, म्हणून याला चक्रतीर्थ म्हणतात. विष्णूनें दैत्यांचा नाश केल्यानंतर ह्या तीर्थांत स्नान केलें; म्हणून हें पवित्र मानलें आहे.

---

**मनुष्यतीर्थ**—एके दिवशीं ह्या सरोवराचे काठीं मृगांचा कळप पाणी पिण्या-करिता आला असता व्याधाच्या भीतीनें त्या सरोवरांत त्यांनी उडी टाकली; त्याबरोबर त्यां सर्वांस मनुष्यत्व प्राप्त झालें. मागाहून व्याध तेथें आला; व हरणाचा कळप कोठें गेला म्हणून त्यांस विचारूं लागला. तेंव्हा आम्हीच हरिण होतों; पण ह्या सरोवरांत स्नान केल्यामुळें आम्हांला मनुष्यस्वरूप प्राप्त झालें आहे. असें त्यांनीं व्याधास सांगितलें. तें ऐकून त्या व्याधानें त्या सरोवरांत स्नान केलें, व त्यामुळें त्यास मुक्ति मिळाली. बुधवारीं अष्टमी आली असतां ह्या मनुष्यतीर्थांत स्नान करणारास मुक्ति मिळते, अशी कथा आहे.

---

कपिलातीर्थ—पूर्वी सुप्रभनांवाचा राजा मृगया करीत अर्बुद पर्वतावर गेला. त्याठिकाणीं मृगी आपल्या बालकास स्तनपान करवीत असतां राजानें हरिणीला बाण मारिला. तेव्हां प्राण सोडतांना मृगीनें राजास तूं भयंकर वाघ होशील, असा शाप दिला. मृगीच्या शापाप्रमाणें राजा व्याघ्ररूपानें अर्बुदपर्वतावर भ्रमण करीत असतां एक कपिला गाय त्याच्या दृष्टीस पडली. व्याघ्राला पाहतांच कपिलागाय त्यास म्हणाली, मी वासराला दूध पाजून येतें; नंतर तूं मला खा. गाईचें भाषण ऐकून वाघ गाईला म्हणाला; तुझ्या बोलण्यावर माझा विश्वास बसत नाहीं; जर शपथ घेत असशील तर मी तुला जाण्याची परवानगी देतो. वाघाचें भाषण ऐकून गाय म्हणाली; ब्राह्मणाला फसविल्यामुळें, गुरुहत्येमुळें, ब्रह्महत्येमुळें, मित्रहत्येमुळें जें पाप मनुष्याला लागतें तें सर्व पातक जर मी येथें पुनः आल्यें नाहीं तर मला लागेल. गाईची शपथ ऐकून वाघानें तिला जाण्याची आज्ञा दिली. वचनाप्रमाणें वासरास स्तनपान करून गाय परत आली. तिला पाहतांच त्यास मनुष्यरूप येऊन पूर्व जन्माचें सर्व स्मरण झालें; व तो म्हणाला, हे कपिला माते ! मी पूर्वी राजा होतो; व हरिणीच्या शापानें व्याघ्र झालों आहे; परंतु तुझ्या समागमानें मी आज शापमुक्त होऊन मला पूर्व जन्मीचें स्मरण झालें आहे. मी तुझें कोणतें काम करूं, तें सांग. कपिलागाय म्हणाली, राजा ! मला तहान लागली आहे; पाणी प्यावयास दे. गाईचें भाषण ऐकून राजानें हातांत धनुष्य घेतलें; व जमिनीवर हापटलें. त्याबरोबर तेथें पाणी निर्माण झालें. कपिला गाय तृषारहित झाली, इतक्यांत यमधर्म तेथें आला; आणि तें उदक कपिलातीर्थ या नांवानें प्रसिद्ध होईल; व चतुर्दशीच्या दिवशीं येथें स्नान करणारा मुक्त होईल, असा त्यानें वर दिला; व गाईसह राजास स्वर्गांत नेलें.

---

अग्नितीर्थ—एकदां बारा वर्षे अवर्षण झाल्यामुळें दुष्काळ पडला होता त्या वेळीं भुकेलेला विश्वामित्र एका चांडाळाच्या घरीं जाऊन कांहीं खावयास मिळेल, या आशेनें पाहूं लागला असतां तेथें एक मेलेला कुत्रा त्यानें पाहिला; व तो चोरून त्याचें मांस विश्वामित्रानें शिजविलें; व होमहवनादि यज्ञविधि करून नंतर तें कुत्र्याचें स्वतः शिजविलेलें मांस त्यानें प्रसाद म्हणून खाल्लें; कुत्र्याच्या अपवित्र मांसानें होमहवनादि यज्ञकृत्य केल्यामुळें अग्नि क्रुद्ध होऊन यज्ञकुंडांतून निघून गेला; अग्नि नष्ट झाल्यामुळें यज्ञकार्यें बंद पडलीं; तेव्हां देवांनीं अग्नीचा शोध लावण्याचें काम सुरू केलें. देवांनीं पोपट, हत्ति व बेडूक यांस अग्नीचें वसती स्थान विचारलें; व त्यांनीं अनुक्रमें बांबू, शमीचें झाड, व सरोवर यांत असल्याचें कळविलें. आपली चहाडी केली, म्हणून अग्नीनें त्यांस शाप दिला. त्या शापाप्रमाणें

पोपट बोबडा झाला, हत्तीची जीभ उलटी झाली; आणि बेडकाला दोन जिव्हा झाल्या. देवांनीं अग्नीची पुष्कळ स्तुति केल्यावर अग्नि संतुष्ट होऊन देवांस म्हणाला, इंद्र पाऊस पाडित नाहीं, त्यामुळें मला कुत्र्याचें मांस खावें लागतें; त्याकरितां मी भूलोक सोडून येथें लपून बसलों आहे. नंतर देवानीं अग्नीचें समाधान करून इंद्र पुनः अवर्षण होऊं देणार नाहीं, असें अभिवचन दिलें; आणि अग्नि यज्ञादिकर्मांत भाग घेऊन देवांना संतुष्ट ठेऊं लागला. अर्बुदपर्वतावरील ज्या जलाशयांत देवांना अग्नीचें दर्शन झालें, त्या जलाशयाला अग्नितीर्थ म्हणतात.

---

रक्तानुबन्ध—पूर्वीं इंद्रसेन नांवाचा एक राजा होता. त्याची सुनंदा नांवाची स्त्री महासाध्वी होती. कोणे एकेदिवशीं तो राजा परिवारासह परदेशीं जाऊन व शत्रूचा नाश करून परत येत असतां अर्ध्या मार्गांत आल्यानंतर बायकोची परीक्षा पाहण्याकरितां दूतामार्फत निरोप पाठविला कीं, इंद्रसेन राजा युद्धांत मरण पावला. हें दूतवाक्य श्रवण करतांच इंद्रसेनाची बायको सुनंदा हिनें तत्काळ देहत्याग केला. अशाप्रकारें राजाला स्त्रीहत्येचें पातक लागल्यानें त्याचें शरीर पापमय झालें. राजा फार दुःखित झाला, व पापनाशार्थ यात्रा करण्याकरितां निघाला. यात्रा करीत करीत तो रक्तानुबंधतीर्थावर आला. तेथें स्नान करतांच त्याचा उद्धार झाला. या तीर्थाला रक्तानुबंध हें नांव पडण्याचें कारण-रक्त म्हणजे त्या तीर्थावर प्रेम करणारे जे लोक त्यांना अनुबंध म्हणजे मोक्ष देणारें हें तीर्थ आहे. सूर्यग्रहणामध्यें येथें स्नान करणारा ब्रह्महत्यादि पातकापासून मुक्त होतो. व चंद्रग्रहणांत स्नान करणारा पितरांचा उद्धार करतो.

---

विनायकमाहात्म्य—एकेदिवशीं पार्वतीनें पुष्कळसें चंदनकाष्ठ उगाळून त्याची एक मूर्ति निर्माण केली. ती मूर्ति मस्तकरहित अशी बनल्यामुळें मस्तक बनविण्याकरितां आणखी चंदनकाष्ठ आणण्याविषयीं कार्तिकस्वामीस सांगितलें. कार्तिकस्वामीस चंदन मिळेना, तेव्हां एक हत्तीचें मस्तक घेऊन पार्वती जवळ आला. तें मस्तक पार्वतीनें त्या चंदनमूर्तीला चिकटविलें. त्या बरोबर ती मूर्ति सजीव झाली; शंकरानें त्या मूर्तीला शिवगणांचा विशिष्ट नायक बनविलें; म्हणून विनायक असें नांव प्रसिद्ध झालें. त्याच ठिकाणींही विनायकाची मूर्ति निर्माण झाली; म्हणून या स्थानीं "गणानां त्वा०" ह्या मंत्रानें जे येथे येऊन विनायकाचें दर्शन घेतात; व त्यास तीन प्रदक्षिणा करितात ते निष्पाप होतात. असें वर्णन आहे.

---

पार्थेश्वर— पूर्वी देवल ऋषीची पार्था नांवाची एक साध्वी स्त्री होती. ती वंध्या होती; तिनें अर्बुदपर्वतावर हजार वर्षें तपश्चर्या केली. त्या वेळीं पृथ्वींतून एक शिवलिंग बाहेर पडलें; व आकाशवाणी झाली कीं, हे पार्थे! तूं त्या लिंगाचें पूजन कर. त्याप्रमाणें पार्थेनें त्या लिंगाचें पूजन केलें. त्यामें तिला पुढें शंभर मुलगे झाले. त्या दिवसापासून तें शिवलिंग पार्थेश्वर या नांवानें प्रसिद्ध झालें. शुक्लपक्षांतील चतुर्दशीला पार्थेश्वराचें पूजन करून रात्रीं जागरण करण्याचें माहात्म्य विशेष सांगितलें आहे.

---

कृष्णतीर्थ—सृष्टीच्या आरंभीं सृष्टि उत्पन्न करण्याविषयीं ब्रह्मदेव विचार करूं लागला असतां एक चतुर्भुज मूर्ति त्याचे समोर येऊन म्हणाली; मी आदिपुरुष आहे. तुला मींच उत्पन्न केलें आहे; व पुनः सर्व सृष्टि उत्पन्न करण्याची माझी इच्छा आहे. त्याचें भाषण ऐकून ब्रह्मदेवाला राग आला; व दोघांत मोठें युद्ध सुरू झालें. तें हजारों वर्षे चालल्यानंतर त्या दोघांच्या मध्यें एक शिवलिंग प्रकट झालें. आणि आकाशवाणी झाली कीं, जो कोणी ह्या लिंगाचा अंत पाहील तो श्रेष्ठ; व तोच सर्वांच्या आदि उत्पन्न झाला, असें समज. उगीच युद्ध करूं नका. एकानें खालच्या बाजूनें अंतलावावा व एकानें वरच्या बाजूनें अंत लावावा. अशी आकाशवाणी ऐकतांच ब्रम्हदेव आकाशमार्गें शिवलिंगाचा अंत लावण्यास निघाला; व आदि पुरुष श्रीकृष्ण पातालमार्गें शिवलिंगाचा अंत लावण्यास निघाला. श्रीकृष्ण पृथ्वी व सप्तपाताळ यांचा भेद करून पुढें गेला तेथें कालाग्निरुद्राचें त्यास दर्शन झालें. तेथून पुढें जाण्याचा प्रयत्न करीत असतां कालाग्निरुद्राच्या ज्वाळांनीं तो दग्ध होऊन गेला; त्यामुळें तो परत स्वस्थानीं निघून आला. इकडे ब्रह्मदेव आकाशमार्गानें शिवलिंगाचा शोध करीत चालला असतां त्यास केतकीपुष्पाचें दर्शन झालें; व त्यानें सर्व हकीगत केतकीपुष्पास सांगितली, तेव्हां केतकीपुष्प ब्रह्मदेवांस म्हणालें, तुला ह्या कामीं यश येणार नाहीं. शिवलिंगाच्या मस्तकापासून मी खालीं पडलों त्यास चार कोटी युगें झालीं. इतका काळपर्यंत मी खालीं उतरत आहे, तरी अजून मला भूमिस्पर्श होत नाहीं. आणखी किती खालीं जावें लागतें, कोणास ठाऊक. त्याकरितां विष्णु श्रेष्ठ आहे, असें म्हण; व स्वस्थ बस. असें सांगितल्यानंतर ब्रह्मदेव विष्णूजवळ आला. आणि केतकीपुष्प दाखवून श्रीकृष्णास म्हणाला, मी शिवलिंगाच्या मस्तकाचा अंत लावून त्याच्या मस्तकावरील हें केतकीपुष्प आणिलें आहे पहा! ब्रह्मदेवाचें हें असत्य भाषण ऐकून शंकरास राग आला, व ब्रह्मदेवाची पूजा कोणीही करूं नये, तसेंच केतकीपुष्प मला वाहूं नये,

असा त्यांनीं ब्रह्मदेवास व केतकीपुष्पास शाप दिला; आणि सत्य भाषणाबद्दल श्रीकृष्णाची स्तुति करून म्हणाले, आजपासून हें शिवलिंग अनंत या नांवानें प्रसिद्ध होईल; व ह्या तीर्थाला कृष्णतीर्थ म्हणतील.

---

भानुह्रदमहात्म्यः—एके दिवशीं इंद्राचा दूत विमानांत बसून मुद्गलाजवळ आला; व म्हणाला कीं, मी इंद्राच्या आज्ञेनें तुला नेण्याकरितां आलों आहे. नंतर मुद्गलानें स्वर्गाची माहिती विचारिली असतां इंद्राच्या दूतानें ती सर्व माहिती मुद्गलास सांगितली. इंद्रदूताच्या मुखांतून स्वर्ग हा क्षणिक आहे, असें समजतांच मुद्गलानें स्वर्गांत येण्याचें नाकारिलें; व मुद्गल तेथें शिवलिंगाची पूजा करीत बसला; व शेवटीं शिवलोकीं गेला, अशी कथा आहे.

---

चंडिकाश्रमोत्पत्तिः—पूर्वी कृतायुगांत महिष नांवाच्या दैत्याच्या त्रासानें देव त्रस्त झाले; व अर्बुदपर्वतावर तप करूं लागले. देवांच्या तपःसामर्थ्यानें तेथें एक तेजस्वी कन्या उत्पन्न झाली. त्या कन्येला इंद्रादि देवांनीं वज्र, शक्ति वगैरे अनेक आयुधें देऊन महिष नांवाच्या दैत्याला मारण्याविषयीं प्रार्थना केली; इकडे नारदऋषि महिषासुराकडे गेले, व अर्बुदपर्वतावर एक त्रैलोक्यसुंदर अशी एक कन्या तुझ्यासारख्याला भार्या करून घेण्याला योग्य आहे. असें त्यांनीं त्यास सांगितलें. तें ऐकतांच महिषानें आपला एक सेवक तिला आणण्याकरितां अर्बुदपर्वतावर पाठविला. सेवकानें त्या कन्येस महिषाचा निरोप सांगितला. कन्येनें त्याचा धिक्कार करून त्यास परत पाठविलें. महिषास फार राग आला; व आपलें अगणित सैन्य तिला पकडून आणण्याकरितां त्यानें पाठविलें. पण त्या सैन्याचा त्या कुमारिकेनें क्षणांत नाश केला; तेव्हां महीष स्वतः अर्बुदपर्वतावर गेला. उभयतांत मोठें युद्ध झालें; व शेवटीं कन्येनें महिषाला ठार मारिलें. दैत्य पडतांच ब्रह्मदेव सर्व देवांसह तेथें आले आणि स्तुति करून कुमारिकेस म्हणाले, ज्यापेक्षां तूं हें चंड म्हणजे भयंकर कृत्य करून आमचें रक्षण केलेंस, त्यापेक्षां ह्या स्थानाला चंडिकाश्रम असें नांव प्राप्त होईल; व तुला आजपासून चंडिका हें नांव प्राप्त होईल. आश्विन कृष्ण चतुर्दशीच्या दिवशीं येथें श्राद्ध, स्नान दान वगैरेंचें माहात्म्य विशेष मानलें आहे.

---

नागोद्भवतीर्थ—कद्रूच्या शापानें भ्यायलेले नाग शेषाजवळ जाऊन शापमुक्तीचा उपाय विचारूं लागले. शेषानें नागास अर्बुदपर्वतावर जाऊन चंडिकाश्रमाजवळ तप करण्यास सांगीतलें, व त्याप्रमाणें नाग या ठिकाणीं

तप करून चंडिकेच्या प्रसादानें ते शापमुक्त झाले, म्हणून या तीर्थाला नागोद्भवतीर्थ म्हणतात.

---

शिवगंगाकुंडः—सर्व देवांनीं शंकराची प्रार्थना करून अर्बुदपर्वतावर नेहमीं रहावें, अशी विनंति केली. देवांच्या प्रार्थनेप्रमाणें शंकरानें गंगेसह तेथें वास्तव्य करून शिवगंगा नांवाचें एक कुंड निर्माण केलें. चैत्र शुक्ल त्रयोदशीच्या दिवशीं ह्या कुंडांत स्नान करण्याचें महत्व विशेष सांगितलें आहे.

---

सक्तुदानः—दक्षयज्ञांत सतीचा नाश झाला असतां एके दिवशीं शंकर कामपीडित होऊन वालखिल्य ऋषींच्या आश्रमाला प्राप्त झाला. तेथें असणाऱ्या ऋषिपत्न्यांनीं नग्न अशा शंकराला पाहतांच त्याही कामपीडित झाल्या. हा प्रकार वालखिल्य ऋषींनीं अवलोकन करतांच त्यांनीं शंकराला शाप दिला कीं, ज्या लिंगानें तूं व्यभिचार केलास तें तुझें लिंग गळून पडेल. त्याप्रमाणें तें शिवलिंग अर्बुदपर्वतावर गळून पडलें. ह्या ठिकाणीं सक्तु म्हणजे सातू यांचें दान करण्याचें महत्व विशेष सांगितलें आहे. एका कोळ्यानें या ठिकाणीं कुत्र्याला सातू खाऊं घातले, त्या पुण्यानें दुसरे जन्मीं तो राजा झाला, अशी कथा दिली आहे.

---

कामेश्वरः—एकदां कामपीडित झालेले शंकर सर्व क्षेत्रें व तीर्थें हिंडत अर्बुदपर्वतावर आले; व आपल्या अग्निरूपी तिसऱ्या डोळ्यानें त्यांनीं कामाला जाळून टाकिलें. तेव्हां कामाची पत्नि रती हिनें शिवाची आराधना करून आपल्या पतीस पुन्हा जिवंत केलें, तेव्हां कामानें तेथें कामेश्वर या नांवानें शिवलिंगाची स्थापना करून त्याची पूजा केली.

---

मार्कण्डेयेश्वरः—मृकंड नांवाच्या एका ऋषीला वृद्धापणीं झालेला एकच मुलगा होता, पण तो अल्पायुषी आहे, असें जाणून त्यानें त्याची मुंज केली; व वेदशास्त्र शिकवून सर्व ब्रह्मवृंदास नमस्कार करण्याचा परिपाठ ठेवण्याची आज्ञा केली. एके दिवशीं सप्तर्षींची व मृकंडपुत्राची गांठ पडला; पितृआज्ञेप्रमाणें त्यानें सप्तर्षींना नमस्कार केला; तेव्हां 'दीर्घायु हो' असा त्यांनीं त्यास आशीर्वाद दिला; नंतर मृकंडपुत्रानें म्हणजे मार्कण्डेयानें ऋषींच्या आज्ञेप्रमाणें अर्बुदपर्वतावर मार्कण्डेयेश्वर नांवाचें शिवलिंग स्थापून त्याची आराधना केली; व तो दीर्घायु झाला.

---

उद्दालकेश्वरः—हें उद्दालक ऋषीनें स्थापन केलें आहे.

---

सिद्धेश्वरः—हें सिद्ध नामक देवांनीं स्थापिलें आहे. या ठिकाणीं असलेल्या कुंडांत स्नान करून सिद्धेश्वराचें पूजन केलें असतां ब्रह्महत्येच्या पातकापासून प्राणी मुक्त होतात.

---

गजतीर्थः—हें दिग्गजांनीं स्थापिलेलें असून येथें स्नान करणारास गजदानाचें फळ मिळतें. रावणादि दैत्यांनीं येथेंच तपश्चर्या करून दिगंत कीर्ति मिळविली, अशी कथा आहे.

---

देवखाततीर्थः—या तीर्थांत स्नान केल्यामुळें इंद्रादिदेवांना कीर्ति व ऐश्वर्य मिळालें, अशी कथा आहे.

---

व्यासतीर्थ—हें व्यासानें स्थापिलें असून तेथें व्यासेश्वराचें देवालय आहे.

---

गौतमाश्रमतीर्थ—हें गौतम नांवाच्या ऋषीनें तपःसामर्थ्यानें स्थापन केलें आहे. माघ कृष्ण चतुर्दशीच्या दिवशीं ह्या गौतमतीर्थांत स्नान करण्याचें माहात्म्य विशेष सांगितलें आहे.

---

कुलसंतारणतीर्थ—अप्रस्तु नामक राजा होता. पितरांनीं त्याचे स्वप्नांत येऊन त्यास कांहीं सत्कर्म करून आपला उद्धार करण्याविषयीं सांगितलें. पित्राज्ञाप्रमाणें त्यानें अर्बुदपर्वतावर पितृयज्ञ केला; व त्यायोगें पितरांचा उद्धार झाला. ज्याठिकाणीं यज्ञ करून पितर उद्धारिले, त्याठिकाणीं कुलसंतारण नांवाचें एक तीर्थ शिवरूपेनें निर्माण झालें. ह्या तीर्थांत चंद्रग्रहणकालीं, अमावास्येच्या दिवशीं स्नान केलें असतां मोक्षप्राप्ति होते. असें सांगितलें आहे.

---

**रामतीर्थ**—याठिकाणीं परशुरामानें निःक्षत्रिय पृथ्वी करण्याच्या उद्देशानें शंकराची आराधना करून पाशुपतास्त्र मिळविलें होतें. कार्तिकी पूर्णिमेला ह्या तीर्थास स्नान करण्याचें महत्व विशेष सांगितलें आहे.

---

**कोटितीर्थः**—एके काळीं सर्व जगत् मुसलमानानें व्याप्त झालें, त्या वेळीं सर्व तीर्थें भीतीनें या तीर्थांत येऊन राहिलीं; म्हणून ह्यास कोटितीर्थ म्हणतात. पुष्करक्षेत्र, कुरुक्षेत्र, प्रयाग येथील एक एक कोट आणि काशी येथील अर्धकोट मिळून साडेतीन कोटि तीर्थें ह्या कोटितीर्थांत येऊन राहिलीं आहेत, असें वर्णन आहे.

---

**चंद्रोद्भेदतीर्थः**—हें तीर्थ चंद्रानें निर्माण केलें आहे. चंद्रसूर्यांनीं चहाडी केल्यामुळें विष्णूनें राहूचें मस्तक तोडल्यानंतर तें वैर मनांत ठेऊन राहू नेहमीं चंद्रसूर्यांना ग्रहणरूपानें पीडा देऊं लागला असतां राहूच्या भीतीनें चंद्र अर्बुद-पर्वतावरील एका शिखरांत बीळ निर्माण करून त्यांत तप करीत बसला असतां तेथें त्यास शंकर प्रसन्न झाले; व या तीर्थाची स्थापना झाली. चंद्रग्रहणसमयीं येथें स्नान करण्याचें महत्व विशेष सांगितलें आहे.

---

**ईशानीशिखरः**—देवांनीं पार्वती व शंकर यांच्या रतिक्रीडेंत विघ्न आणिल्या-मुळें पार्वती दुःखित होऊन अर्बुदपर्वताच्या एका शिखरावर तपश्चर्या करीत बसली. हजारों वर्षें तप केल्यानंतर देवांसह शंकर पार्वतीजवळ आले; व त्यानें पार्वतीचें समाधान केलें. नंतर चवथे दिवशीं पार्वतीला गजानन नांवाचा एक मुलगा झाला. त्या दिवसापासून ह्या शिखराला ईशानीशिखर म्हणतात. ह्या शिखरावर तपश्चर्या करण्याचें महत्व विशेष सांगितलें आहे.

---

**ब्रह्मपदतीर्थः**—संसारांतून प्राणीमात्रास तरून जातां यावें, म्हणून ऋषींच्या विनंतीवरून ब्रह्मदेवानें जमिनीवर पाय हापटून हें तीर्थ उत्पन्न केलें, अशी कथा आहे.

---

**रुद्रह्रदः**—पूर्वी शंकरानें अंधकासुराला मारल्यानंतर ह्याच ह्रदांत स्नान केलें, म्हणून याला रुद्रह्रद म्हणतात.

---

**गुहेश्वरः**—हें गुहानें गुहेंत स्थापिलें; म्हणून यास गुहेश्वर म्हणतात.

---

उमामहेश्वरतीर्थः--हें धुंधुमार नांवाच्या राजानें स्थापिलें.

---

महौजसतीर्थ—पूर्वी इंद्राला ब्रह्महत्या लागली असतां बृहस्पतीच्या सांगण्यावरून तो अर्बुदपर्वतावर आला; व ह्या महौजसतीर्थांत त्यानें स्नान केलें. त्यायोगें त्याची ब्रह्महत्या नष्ट झाली.

---

जंबूतीर्थ—जंबुद्वीपांतील सर्व तीर्थें या तीर्थांत वास करतात. पूर्वी निमि नामक राजानें या तीर्थांत स्नान केलें, त्यायोगें तो सदेह स्वर्गांत गेला, अशी कथा आहे. येथें श्राद्ध करणारास गया श्राद्धाचें फळ प्राप्त होतें. असें सांगितलें आहे.

---

गंगाधरतीर्थ—आकाशांतून पडणाऱ्या गंगेला त्याठिकाणीं शंकरानें आपल्या जटेंत धारण केलें; म्हणून ह्या तीर्थाला गंगाधरतीर्थ म्हणतात.

---

कटेश्वरगंगेश्वर—पूर्वी सौभाग्यवृद्धीच्या निमित्तानें पार्वती व गंगा याच्यांत वाद उपस्थित झाला. शेवटीं उभयतांनीं प्रतिज्ञा केली कीं, जिच्या पूजनानें शंकर लवकर प्रसन्न होईल, ती श्रेष्ठ समजावी. पार्वती व गंगा उभयतां अर्बुदपर्वतावर येऊन शिवाराधना करूं लागल्या. त्या वेळीं शंकरानें पार्वतीला प्रथम दर्शन दिलें, नंतर गंगेलाहि दर्शन देऊन सांगितलें कीं, तुम्ही उभयतांनीं स्थापिलेल्या ह्या लिंगाचें जे दर्शन घेतील, त्यांस अखंड कुलसौभाग्याची प्राप्ति होईल.

---

अर्बुदखंडमाहात्म्य—पुलस्त्य म्हणतात; ययाते! याप्रमाणें तुम्हाला अर्बुदक्षेत्रांतील सर्व तीर्थांचें माहात्म्य सांगितलें. अर्बुदक्षेत्रांतील प्रत्येक पदार्थांत शिवलिंगाचें वास्तव्य आहे. स्वर्गापेक्षांहि अर्बुदपर्वत अत्यंत पवित्र, व पुण्य देणारा आहे. जे कोणी ह्या अर्बुदपर्वतावर येऊन तेथील तीर्थांत स्नान करून शिवलिंगांचें दर्शन घेतात, ते शिवलोकीं जाऊन अमर होतात.

॥ इति अर्बुदखण्ड समाप्त ॥ ३ ॥

# स्कंदपुराण.

## प्रभासखंड ७ द्वारकामाहात्म्य ४.

## अध्याय १ ला.

### विष्णुप्राप्तीविषयीं प्रश्न.

शौनक सूताला प्रश्न करितात, हे सूत ! ह्या कलियुगांत विष्णूचें राहण्याचें ठिकाण कोणतें ? तें आम्हांला सांगा. असा शौनकाचा प्रश्न ऐकून सूत म्हणतात; हे शौनक ! रामवतारानंतर विष्णूनें कृष्णावतार घेऊन; व कंसादिकांचा नाश करून निजधामाला गमन केलें असतां असित, देवल, धौम्य वगैरे ऋषी ब्रह्मदेवाजवळ गेले, वत्यांनीं "कलियुगांत विष्णुप्राप्ति कशी होणार" असा प्रश्न विचारिला. त्या वेळीं ब्रह्मदेव म्हणाले, हे ऋषिहो ! तुमच्या प्रश्नाचें उत्तर मला देतां येणार नाहीं, तुम्ही पाताळांत प्रल्हादाजवळ जा; म्हणजे तो तुम्हांला सर्व कांहीं सांगेल, असें ब्रह्मदेवाचें भाषण ऐकून सर्व ऋषी पाताळांत प्रल्हादाकडे गेले; व त्यांनीं त्यास तोच प्रश्न केला असतां प्रल्हाद भगवंत्प्राप्तीच्या उपाय सांगू लागले.

## अध्याय २ रा.

### दुर्वासाचें द्वारकेंत आगमन.

प्रल्हाद ह्मणाला; ऋषिहो ! पश्चिमसमुद्राच्या काठीं कुशस्थलीनांवाचें एक क्षेत्र आहे, त्यासच द्वारका ह्मणतात; रामपुत्र जो कुश यांनीं ह्या क्षेत्राची स्थापना केली असल्यामुळें ह्यास कुशस्थली ह्मणतात. त्याठिकाणीं चक्रादिआयुधांनीं युक्त अशी श्रीकृष्णाची मूर्ति राहते. त्या मूर्तीचें दर्शन घेतलें असतां मनुष्य विष्णुलोकाला प्राप्त होतो. एकदां दुर्वास ऋषि श्रीकृष्णाच्या घरीं मोठ्या आनंदानें जावयास निघाला असतां दुर्वासानें श्रीकृष्णास रथाचें घोडें सोडण्यास सांगून घोड्याचें ऐवजीं श्रीकृष्ण व रुक्मिणी ह्यांस रथ ओढण्यास लाविलें; व स्वतः रथांत बसून रथ हाकलूं लागला; अर्ध्या वाटेंत रुक्मिणीला तहान लागल्यामुळें श्रीकृष्णानें चालतां चालतां जमिनीवर एक जोरानें लाथ मारून रुक्मिणीकरितां पाताळांतून

भोगावती नांवाची गंगानदी वर आणिली; व रुक्मिणीनें त्या नदीचें जळ प्राशन केलें, तें पाहून दुर्वासाला राग आला, व त्यानें रुक्मिणीला शाप दिला कीं, ज्यापेक्षां तूं माझ्या आज्ञेशिवाय जल प्राशन केलेंस, त्यापेक्षां तूं मद्यादि अपवित्र पदार्थांवर प्रेम करणारी होशील; व तुला पुष्कळ काळपर्यंत पतिविरह होईल. असा शाप देऊन दुर्वास रथांतून खालीं उतरला; व पायांनींच चालू लागला. नंतर श्रीकृष्णानें रुक्मिणीचें समाधान करून दुर्वासाची प्रार्थना केली; व त्यास द्वारकेंत नेऊन त्याचें आतिथ्य केलें.

---

## अध्याय ३ रा.

---

### रुक्मिणीदुःखमोचन.

नंतर दुःखित झालेल्या रुक्मिणीचें नारदानें, समुद्रानें, व गंगेनें पुष्कळ प्रकारें सांत्वन केलें; तथापि रुक्मिणीच्या मनाचें समाधान न होऊन ती एका अरण्यांत जाऊन व एकाग्र मन करून तपश्चर्येसाठीं उद्युक्त झाली असतां श्रीकृष्ण व दुर्वास ऋषि तिजपाशीं येऊन त्यांनीं रुक्मिणीचें सांत्वन करून दुर्वासानें तिजकडे कोपांतून पाहून अपराधाची क्षमा मागितली. नंतर रुक्मिणी येथें गंगेच्या काठीं तप करण्याकरितां राहिली. जे कोणी येथें गंगास्नान करून रुक्मिणीचें दर्शन घेतात ते सर्व दुःखांपासून मुक्त होतात.

---

## अध्याय ४ था.

---

### द्वारकायात्राविधि.

त्याच गंगाकाठीं असणाऱ्या कृष्णाचें व दुर्वासाचें जे दर्शन घेतात ते सर्व-पातकांपासून मुक्त होतात. श्रीकृष्णचंद्रांनीं स्थापिलेल्या अनेक पवित्रमार्गें स्वर्ग मिळण्याचें पुण्य सांगितें. हें द्वारकाक्षेत्र लोकांना मुक्ति देण्याकरितां निर्माण केलें आहे. या द्वारकेंत असणाऱ्या चक्रतीर्थ, शंखोद्धारतीर्थ, पिंडारकतीर्थ, गोमतीतीर्थ वगैरे तीर्थांत स्नान केलें असतां मनुष्याला मुक्ति प्राप्त होते.

---

## अध्याय ५ वा.

### गोमत्युत्पत्ति.

प्रल्हाद म्हणतात, ऋषिहो! नंतर गोमतीतीर्थांत स्नान करावें. एकदां सनत्कुमारादि ऋषि दक्षिणसमुद्राचे कांठीं बसून भगवद्दर्शनाच्या इच्छेनें हजारों वर्षे तप करीत बसले असतां [illegible] निर्माण झालें. त्याला पाहून सनत्कुमारादि ऋषींना आश्चर्य वाटलें. नंतर प्रगट झालेल्या भगवंताची स्तुति करून त्यांनी [illegible] भगवंताची पूजा केली. नंतर भगवंताच्या आज्ञेवरून त्याठिकाणीं गंगाजही गोमती या नावानें अवतीर्ण झाली.

---

## अध्याय ६ वा.

### गोमतीसमुद्रसंगम.

प्रल्हाद म्हणतो, ऋषिहो! आतां तुम्हांला गोमतीतीर्थविधि व माहात्म्य सांगतों, ऐका. प्रथम गोमतीचे कांठीं जाऊन गोमतीस साष्टांग नमस्कार करावा. नंतर हातपाय धुवून व आचमन करून, [illegible] फळ आणि अक्षता घेऊन गोमतीला अर्घ्यप्रदान करावें. त्यावेळीं "ब्रह्मलोकात्समायाते वसिष्ठानुगते शुभे। सर्वपापविशुद्ध्यर्थं गृहाणार्घ्यं तु गोमति॥" असा मंत्र म्हणावा. नंतर यथाविधि गोमतीतीर्थांत स्नान करावें. नंतर त्याठिकाणीं श्राद्ध, गोप्रदान वगैरे विधि करावेत. गोमती व समुद्र यांचा जेथें संगम झाला आहे, त्या ठिकाणीं सत्कृत्य करणारे लोक विष्णुलोकीं जातात.

---

## अध्याय ७ वा.

### चक्रतीर्थमाहात्म्य.

नंतर चक्रतीर्थाला जावें. चक्रचिन्हांनीं युक्त असलेल्या चक्रतीर्थांत "ॐ नमो विष्णुरूपाय विष्णुचक्राय ते नमः। गृहाणार्घ्यं मया दत्तं सर्वकामप्रदो भव॥" हा मंत्र म्हणून अर्घ्य द्यावें. नंतर 'अग्नेश्च तेजो मृडया च रुद्रो रेतोधा विष्णुरमृतस्य नाभिः॥ एतद्ब्रुवन्नृतवाक् सत्यवाक्यम्

ततोऽवगाहेत पतिं नदीनाम् ॥ " हा वेदमंत्र म्हणून चक्रतीर्थांत स्नान करावें. नंतर ब्राह्मणांना तेथें रत्नें, सुवर्ण, अलंकार, वस्त्रें वगैरेचीं दानें करून श्राद्धादि कृत्येंहि करावींत. मातृगयेंत व पितृगयेंत श्राद्ध करून जी पितरांना गति मिळते ती गति चक्रतीर्थांत पितरांच्या नांवानें श्राद्ध केलें असतां मिळते. चक्रतीर्थाचे काठीं विष्णुमूर्तीचें पूजन करणारास विष्णुलोकाची प्राप्ति होते.

## अध्याय ८ वा.

### विष्णुपूजामहात्म्य.

नंतर श्रीविष्णूचें पूजन करावें. जो विष्णु चक्रतीर्थाचे काठीं येऊन राहिला आहे. हा विष्णु सर्व देवामध्यें श्रेष्ठ आहे. सुदर्शन, लक्ष्मीनारायण, त्रिविक्रम, श्रीपति, वासुदेव, प्रद्युम्न, बलभद्र, पुरुषोत्तम, दशावतार, चक्रधर, द्वादशात्मा, नवव्यूह ह्या विष्णूच्या बारा नांवांचा उच्चार करून चक्रतीर्थस्थ विष्णूचें पूजन करावें; म्हणजे विष्णुलोकाची प्राप्ति होते.

## अध्याय ९ वा.

### रुक्मिणीह्रदमाहात्म्य.

ज्या वेळीं सात ऋषींनीं लक्ष्मीवर सात जलधारांनीं अभिषेक केला, त्या वेळीं सात प्रवाह सुरु होवून त्यांचीं सात कुंडें निर्माण झालीं. त्या सात कुंडांना लक्ष्मी-ह्रद किंवा रुक्मिणी-ह्रद म्हणतात. भृगूनें ह्या ह्रदांत स्नान केलें, म्हणून कोणी ह्याला भृगुतीर्थ म्हणतात. जे कोणी ह्या लक्ष्मीह्रदांत स्नान करितात ते लक्ष्मी-वान् व धनधान्य, पुत्रपौत्र यांनीं युक्त होऊन सद्गतीला प्राप्त होतात.

## अध्याय १० वा.

### नृगतीर्थमाहात्म्य.

पूर्वी नृग नांवाचा एक राजा होता. एके दिवशीं त्या राजानें जैमिनी नांवाच्या ब्राह्मणाला दान दिलेली गाय त्या ब्राह्मणाच्या हातांतून निसटून परत राजाच्या

गोठ्यांत आली. हें राजाला माहिती नसल्यामुळें राजानें तीच गाय दुसऱ्या सोमशर्मा नांवाच्या ब्राह्मणाला दिली. इकडे जैमिनी गाईचा शोध करीत राजाकडे येत असतां जैमिनीनें सोमशर्मा नेत असलेल्या गाईला पाहिलें; व ही आपली गाय म्हणून ओळखिलें; व तो सोमशर्म्यास म्हणाला कीं, ही आमची गाय तूं चारून कोठें नेत आहेस. असें ऐकताच जैमिनीला घेऊन सोमशर्मा गाईसह राजाजवळ आला. ह्या दोघांचा वाद सुरू असतां राजा त्या दोघांना सांगतो. तुम्हांपैकीं एकानें गाईवरचा हक्क सोडावा; व जो हक्क सोडील त्यास मी ह्या गाईसारख्या हजारो गाई देईन. असें राजानें सांगितलें असतांहि त्या दोघांनींहि आग्रह धरून पुनः माझी गाय, माझी गाय, असें म्हणून वादाला प्रारंभ केला. ह्याप्रमाणें तीन दिवस वाद सुरू होता. शेवटीं त्या दोघांनीं त्रासून नृगराजाला तूं कृकलास म्हणजे सरडा होशील, असा शाप दिला. नंतर शापाप्रमाणें नृगराजा हजार वर्षें सरड्याच्या रूपानें राहिला. एकेदिवशीं यादवांनीं त्या सरड्याला पाहून श्रीकृष्णास म्हटलें, हे कृष्णा ! हा केवढा मोठा सरडा ह्या विहिरींत पडला आहे, पाहिलास काय ? आम्ही ह्याला विहिरींतून बाहेर काढण्याचा प्रयत्न केला; परंतु सर्व व्यर्थ गेला. नंतर श्रीकृष्ण सरड्याजवळ जाऊन त्याला वर काढणार, इतक्यांत कृष्णाच्या हस्तस्पर्शानें सरड्याच्या रूपांतून नृगराजा शापमुक्त होऊन प्रगट झाला; व त्यानें श्रीकृष्णाची स्तुति केली. नंतर नृग कृष्णास म्हणतो कीं, ही विहीर नृगतीर्थ ह्या नांवानें प्रसिद्ध व्हावी. येथे स्नान करणारांना गोदानाचें फळ मिळतें.

## अध्याय ११ वा.

### विष्णुपदतीर्थमाहात्म्य.

नंतर विष्णुपदतीर्थाला जावें. ज्याच्या दर्शनानें गंगास्नानाचें फळ मिळतें. ह्या ठिकाणीं श्रीकृष्णानें रुक्मिणीकरितां पाणी निर्माण केलें. ह्या उदकाच्या सेवनानें अश्वमेधयज्ञाचें फळ मिळतें. ह्या विष्णुपदतीर्थांत स्नान करून देव, पितर व मनुष्य ह्या सर्वांची तिलाक्षतांनीं तृप्ति करावी.

## अध्याय १२ वा.

### मयतीर्थमाहात्म्य.

एकदां उद्धव गोपींना घेऊन द्वारकेंत श्रीकृष्णाजवळ आला. श्रीकृष्णासह सर्व गोपी विहार करीत असतां गोपींनीं कृष्णाला प्रश्न केला कीं, ह्या सरोवराचें नांव

काय ? त्या वेळीं श्रीकृष्ण म्हणतात; त्याला मयतीर्थ म्हणतात; व त्याच्या दर्शनानें मोक्षप्राप्ति होते.

---

## अध्याय १७ वा.

### गोपीतीर्थमाहात्म्य.

नंतर गोपींच्या सांगण्यावरून श्रीकृष्णानें [illegible] एक तीर्थ निर्माण करून त्याचें गोपीतीर्थ असें नांव ठेविलें; ह्या तीर्थाला [illegible] मोक्षद्वारतीर्थ म्हणतात. जे कोणी ह्या तीर्थांत स्नान करून [illegible] करितात, त्यांस पुनर्जन्माचीं दुःखें प्राप्त होत नाहींत; व त्यांस ऐहिक सुखें मिळून अंतकाळीं मोक्षप्राप्तिहि होते.

---

## अध्याय १८ वा.

### पंचनदीतीर्थमाहात्म्य.

एकदां महादेवानें ब्रह्मकुंड या नांवाचें एक तीर्थ उत्पन्न केलें. नंतर चंद्र, इंद्र, शंकर, पार्वती यांनींहि आपआपल्या नांवांनीं तीर्थें निर्माण केलीं. ह्या देवांनीं स्थापिलेल्या सर्व तीर्थांला पंचनदीतीर्थ म्हणतात. जे कोणी ह्या पंचनदीतीर्थांत स्नान करितात ते शिवलोकीं जातात.

---

## अध्याय १९ वा.

### ऋषितीर्थमाहात्म्य.

एकदां महादेव सनकादि ऋषींना म्हणाले; कीं, ज्यापेक्षां तुम्ही नित्य श्रीकृष्णाची आराधना करितां, त्यापेक्षां तुम्ही धन्य आहां. आतां तुम्ही जशी श्रीकृष्णाची आराधना करितां तशी शंकराचीहि आराधना करीत जा. असें महादेवाचें भाषण ऐकून सनकादि ऋषींनीं द्वारकाक्षेत्रांत एक तीर्थ निर्माण करून शिवलिंगाची स्थापना केली; व शिवाराधना करण्यास प्रारंभ केला. त्या शिवलिंगाचें नांव ऋषितीर्थ असें ठेविलें. त्या ऋषितीर्थांत स्नान व श्राद्धादि सत्कर्में करून सिद्धेश्वराचें पूजन करणारे सात जन्मपर्यंत सुखैश्वर्यसंपन्न होऊन शिवलोकीं जातात.

## अध्याय १६ वा.

### गदाप्रमुखतीर्थमाहात्म्य.

नंतर गदातीर्थ, वाराहतीर्थ, नागतीर्थ, महातीर्थ, चित्रतीर्थ, चंद्रभागातीर्थ, महिषतीर्थ, मुक्तिद्वार, गोमतीतीर्थ, [illegible], शंखतीर्थ, नागसरतीर्थ, कालिन्दीसरतीर्थ, रुक्मिणीतीर्थ, कंकुसरतीर्थ, कुशतीर्थ, गुप्ततीर्थ, कुशतीर्थ, जालतीर्थ, आनकदुंदुभीतीर्थ, सूततीर्थ, भद्रतीर्थ, नारायणतीर्थ, बलरामतीर्थ, अर्जुनतीर्थ, सुभद्रातीर्थ, कृष्णतीर्थ, रोहिणीतीर्थ, उद्धवतीर्थ, [illegible]तीर्थ, सत्यभामातीर्थ, चक्रतीर्थ, जालंधरतीर्थ, भास्तीर्थ, शुक्रतीर्थ, कर्दमतीर्थ, कपिलतीर्थ, [illegible] या सर्व तीर्थांत स्नान केलें असतां मनुष्य पापमुक्त होऊन विष्णुलोकीं जातो.

## अध्याय १७ वा.

### श्रीकृष्णपूजाविधि.

श्रीकृष्णाच्या पूर्वद्वारावर असणाऱ्या जयंत, वज्रनाभ, सुनाभ, वज्रबाहु, महाहनु, वज्रदंष्ट्र, वज्रधारी, वज्रहा, वज्रलोचन, श्वेतमूर्धा, श्वेतमाली ह्या देवतांचें; नंतर आग्नेय द्वारावर असणाऱ्या ज्वालामुख, रक्ताक्ष, श्मशाननिलय, क्रथ, मांसाद, रुधिराहार, कृष्ण, कृष्णजटाधर, त्रासन, भंजन या देवतांचें; दक्षिणद्वारावर राहणाऱ्या दंडपाणि, महानाद, पाशहस्त, सुलोचन, अनिवर्त्यक्रम, दुंदुभिनिस्वन, खरस्वन, घर्घरवाक्, मौनप्रिय, पिंगाक्ष यांचें; नैर्ऋत्यद्वारावर वास करणाऱ्या गीतकृत, नर्तक, नग्न, कंदली, दुर्मतिप्रिय, हस्त, नेत्रभंग, भ्रूविकार, विजृंभक, मुशली ह्या देवतांचें; पश्चिमद्वारावर पुष्पदंत, विनायक, बद्धवाक्, शिव, तुंबुरु, घृताची, महोदर, नागेंद्र, राक्षस, घटोत्कच ह्या देवतांचें; वायव्यद्वारावर भंजन, भैरव, कालिक, घटोदर, लोककामर्दन, [illegible], रुरु, सर्वमुख, अजपी, कुमार ह्या देवतांचें; उत्तरद्वारावर असणाऱ्या सर्वतोभद्र, विरूपाक्ष, कोरक, महेश, सूर्य ह्या देवांचें पूजन करावें. नंतर ईशान्य दिशेच्या द्वारावर राहणाऱ्या कुबेर, किंकिणीक, कराल, विकट, बहिर्मुख वगैरे देवतांचें पूजन करावें. नंतर कृष्णाचें, रुक्मिणीचें व रुक्मि नांवाच्या गणपतीचेंहि पूजन करावें. ज्या वेळीं श्रीकृष्णानें जरासंधादि राजे पळवून लावून रुक्मिणीचें हरण केलें, त्या वेळीं रुक्मीनें प्रतिज्ञा केली कीं, श्रीकृष्णाला युद्धांत जिंकल्याशिवाय नगरांत शिरणार नाहीं. अशी प्रतिज्ञा करून रुक्मि कृष्णाबरोबर युद्ध करूं लागला. त्या युद्धांत रुक्मीचा

पराजय झाला; त्यामुळें रुक्मि मरण्यास तयार झाला. त्या वेळीं श्रीकृष्णानें रुक्मीचें सांत्वन करून त्याची आपल्या गणामध्यें गणपति या नांवानें स्थापना केली; व सांगितलें कीं, त्या रुक्मि नांवाच्या गणपतीचें पूजन केल्याशिवाय श्रीकृष्णपूजा सफल होणार नाहीं; त्याकरितां तेथें असणाऱ्या रुक्मिगणपतीची अवश्य पूजा करावी.

## अध्याय १८ वा.

### दुर्वासऋषीचा पराजय.

नंतर दूर्वास, कृष्ण व बलराम यांचेंहि पूजन करावें. पूर्वी कृतयुगांत बलिराजानें इंद्राला जिंकून त्रैलोक्य पादाक्रांत केलें असतां विष्णूनें वामनावतार घेऊन बलीला पाताळीं नेलें; व इंद्राला स्वराज्य मिळवून दिलें. एकदां दुर्वासऋषि गोमतीसमुद्रसंगमावर प्राप्त झाला. तेथें कुश नांवाचा एक दैत्य राज्य करीत होता. इतक्यांत पुष्कळ दैत्य दुर्वासाजवळ आले; व मारा! मारा! असा आरडाओरडा करून त्या दैत्यांनीं दुर्वासाला खूप मार दिला. शेवटीं रुरु नांवाच्या एका दैत्यानें त्यास जीवदान दिलें; व त्याला एका अरण्यांत नेऊन सोडून दिलें; व बजावलें कीं, आज तुला जीवदान देत आहे, जर तूं पुनः येथें आलास तर तुला आम्ही ठार मारून टाकूं, हें पक्कें लक्षांत ठेव. असें सांगून दैत्य निघून गेले. नंतर दुर्वासानें श्रीकृष्णाची आराधना केली. तत्काळ तेथें वामनावतारी विष्णु प्रगट झाले; व विष्णूजवळ दुर्वासानें गोमतीसागरसंगमांत स्नान करण्याची माझी इच्छा पूर्ण कर, असा वर मागितला.

## अध्याय १९ वा.

### दुर्वासस्नान.

असें दुर्वासाचें भाषण ऐकून विष्णु दुर्वासाला म्हणतात; मी बलीच्या स्वाधीन आहे. तो जर मला आज्ञा देईल तर मी तुझी इच्छा पूर्ण करूं शकेन. असें ऐकून दुर्वास बलीची प्रार्थना करूं लागला. नंतर बलीच्या आज्ञेवरून दुर्वासा, श्रीविष्णु व बलराम गोमतीसागरसंगमावर आले; व श्रीविष्णूच्या सांगण्यावरून दुर्वासा स्नानसंध्यादि विधि करूं लागला.

## अध्याय २० वा.

—:०:—

### शिवलिंगस्थापना.

त्याप्रमाणें दुर्वासा संध्यापूजादि विधि करीत असतां तद्विषयक वेदघोष ऐकून दुर्वासाला मारण्याकरितां दैत्य आले; तें पाहून विष्णूनें सुदर्शनचक्रानें दैत्यांचीं मस्तकें उडवून दिलीं. नंतर कुश नामक दैत्यानें शिवलिंग स्थापून त्याच्या पूजनानें अमरत्व मिळविलें. नंतर कुश श्रीविष्णूबरोबर युद्ध करूं लागला. विष्णूनें शेंकडो वेळा सुदर्शनचक्रानें कुशाचें मस्तक तोडलें; तथापि शिवानें दिलेल्या अमरत्वानें तो पुनः जिवंत होई, शेवटीं श्रीविष्णूनें कुशाला एका खळग्यांत पुरून त्याच्यावर एका शिवलिंगाची स्थापना केली, तेव्हां दैत्य श्रीविष्णूला शरण गेला; व क्षमा मागूं लागला.

## अध्याय २१ वा.

### भगवत्पूजामाहात्म्य.

नंतर श्रीकृष्णानें कुशदैत्याला वर दिला कीं, तुझ्या शरीरावर स्थापिलेल्या शिवलिंगाला कुशेश्वर हें नांव प्राप्त होईल, असें म्हणून विष्णु स्वतः तेथें राहिला. जे कोणी कुशेश्वराचें व विष्णूचें पूजन करितात ते मुक्त होतात. भाद्रपदांत विष्णुपूजा केली असतां इष्ट मनोरथ पूर्ण होऊन विष्णुलोकांची प्राप्ति होते.

## अध्याय २२ वा.

### रुक्मिणीपूजनमाहात्म्य.

नंतर दुर्वासा, बलराम व गरुडादि देवता यांचें पूजन केल्यावर रुक्मिणीचें पूजन करावें. जोंपर्यंत रुक्मिणीचें दर्शन घेतलें नाहीं तोंपर्यंत ग्रहादिकांची पीडा होते. त्याकरितां ग्रहादिकांनीं पीडित झालेल्या लोकांनीं अवश्य तत्पीडापरिहारार्थ श्रीरुक्मिणीचें दर्शन घ्यावें. याप्रमाणें रुक्मिणीचें पूजन केल्यावर उन्मत्तक नांवाच्या द्वारपाळाचें पूजन करावें. नंतर चौसष्ट योगिनी, हरसिद्धि, क्षेत्रपाल, विरूपस्वामिनी, ब्राह्मी, माहेश्वरी, कौमारी, वैष्णवी, वाराही, इंद्राणी, चामुंडा, या सात देवता; रुक्मिणी, सत्यभामा. जांबवती, मित्रविंदा, कालिंदी, ह्या सर्व देवतांचें पूजन करावें. जो याप्रमाणें पूजन करितो त्यावर विष्णु प्रसन्न होतो.

## अध्याय २३ वा.

### तुलसीधारणमाहात्म्य.

एकदां मार्कंडेय इंद्रद्युम्नाला म्हणतात; हे इंद्रद्युम्न राजा, मी तुला द्वारका-माहात्म्य सांगतों, एक हजार मन्वंतरपर्यंत काशीवास केल्याचें जें फळ तेंच फळ द्वारकेंत पांच दिवस राहिल्यानें प्राप्त होतें. द्वारकेंत येऊन श्रीकृष्णाला पंचामृतानें स्नान घालावें. जो कोणी श्रीकृष्णाचे मंदिरांत कथा व पुराण यांचें वाचन करितो, त्याला प्रत्येक अक्षरागणिक शंभर कपिला गाईंच्या दानाचें पुण्य मिळतें. जे कोणी श्रीकृष्णाच्या अंगावरील तुळशीनिर्माल्याच्या माळेचें धारण करितात, त्यांस प्रत्येक क्षणाला अश्वमेध यज्ञ केल्याचें पुण्य लागतें. तुळशी-काष्ठाची माळा प्रत्यक्ष विष्णूला अर्पण करून नंतर स्वतः धारण करणारा मनुष्य निष्पाप होतो. जे तुळशीमाळा धारण करीत नाहींत त्यांची नरकांतून मुक्तता व्हावयाची नाहीं, उन्मीलिनी, वंजुलिनी, त्रिस्पृशा, पक्षवर्द्धिनी, जयंती, विजया, जया ह्या नांवाच्या अष्टम्या पापनाश करणाऱ्या; व श्रीकृष्णाला प्रिय असल्या-मुळें मस्तकांत तुळशीमाळा धारण करून त्या दिवशीं श्रीकृष्णाचें पूजन करावें; त्यायोगें पूर्णकाल सद्गति प्राप्त होते.

## अध्याय २४ वा.

### द्वारकामाहात्म्य.

येथ त्रैलोक्यांतील सर्व पदार्थ वास करितात. वैशाख शुद्ध द्वादशीला त्रिस्पृशा द्वादशी म्हणतात. त्या दिवशीं श्रीकृष्णाचें पूजन केलें असतां पितरांसह स्वतःला सद्गति प्राप्त होते. ह्या द्वारकेशिवाय इतर सर्व प्रदेश कलीनें व्यापलेला असल्यामुळें द्वारकेंत राहणाराला कलिबाधा होत नाहीं.

## अध्याय २५ वा.

### वंजुलीद्वादशीमाहात्म्य.

मार्कंडेय म्हणतात; हे इंद्रद्युम्न ! मथुरेंत कालिन्दी, द्वारकेंत गोमती व अयो-ध्येंत शरयू ह्या तीन नद्या अत्यंत पवित्र आहेत. द्वारकेंत श्रीकृष्ण, अयोध्येंत

श्रीरामचंद्र व मथुरेंत विष्णु ह्यांचें स्मरण केल्यानें सर्व पापांचें क्षालन होतें. मनानें द्वारकेचे स्मरण करणारासहि दहा हजार कपिलागाई दिल्याचें पुण्य लागतें. मी सात कल्पपर्यंत जगलेला मार्कंण्डेयसुद्धां असें म्हणतों कीं, द्वारकेची बरोबरी करणारी एकही नगरी नाहीं. द्वादशीलाच उपवास व पारणा केल्यानें ती वंजुलीद्वादशी होते; व त्यायोगें विष्णुपदाची प्राप्ति होते. वंजुलीला जागरण केलें असतां मोक्षप्राप्ती होते.

---

## अध्याय २६ वा.

### द्वादशीजागरणमाहात्म्य.

प्रल्हाद म्हणतात; ऋषिहो! एकादशीच्या व द्वादशीच्या दिवशीं जे जागरण करितात त्यांस अग्निष्टोमयज्ञाचें फळ प्राप्त होतें. रात्रीं जागरण करून विष्णुदर्शन घेतल्यानें जितके अंगावर रोमांच उभे राहतील तितकीं त्याचीं कुळें विष्णुसन्निध जाऊन राहतील. द्वादशीच्या दिवशीं जागरण करून श्रीमन्महाभारत, रामायण वगैरे विष्णुग्रंथांचें जे जे पठण करितात ते ते विष्णुलोकाला जातात. द्वादशीजागरण हें सर्व सत्कृत्यांत श्रेष्ठ आहे.

---

## अध्याय २७ वा.

### एकादशीजागरणमहात्म्य.

एकादशीच्या दिवशीं जागरण करून श्रीमद्भागवताचें पठण करावें. द्वादशीयुक्त एकादशीचें फळ अधिक आहे. जो कोणी एकादशीच्या दिवशीं गंगादि नदीमध्यें स्नान करून पितरांना उद्देशून तर्पण करितो, त्यास हजारों वर्षे पितृश्राद्ध केल्याचें पुण्य मिळतें. एकच एकादशीव्रत स्वीकारिलें असतां दुसरें कोणतेंहि व्रत करावें लागत नाहीं; व ह्या व्रतानें विष्णु प्रसन्न होतो. एकादशीव्रतासारखें दुसरें श्रेष्ठ व्रत नाहीं. दशमीयुक्त एकादशी निषिद्ध असल्यामुळें द्वादशीयुक्त एकादशीच्या दिवशीं उपोषण व जागरण करावें; म्हणजे विष्णुलोकप्राप्ति होते.

---

## अध्याय २८ वा.

—:०:—

### उन्मीलिनी—द्वादशी—माहात्म्य.

मार्कण्डेय म्हणतात; उन्मीलिनीद्वादशीचें व्रत करणारा मनुष्य सूर्यमंडळाचा भेद करून श्रेष्ठ पदाला जाऊन पोहोंचतो. उन्मीलिनी व्रत करणारा मनुष्य जितकी पृथ्वीवर वाळू आहे तितकीं वर्षे स्वर्गांत राहतो. त्याकरितां उन्मीलिनी-द्वादशीच्या दिवशीं जागरण केलें असतां विष्णु प्रसन्न होतो; व सद्गति मिळते.

## अध्याय २९ वा.

—:०:—

### द्वारकागोमतीप्रभाव.

एकदा सिंहस्थांत नारद ऋषी व गौतम ऋषी गौतमीचे काठीं स्नानाकरितां गेले होते. त्यावेळीं गौतमी दुःखित होऊन गौतमास म्हणते; हे गौतम! सर्व प्राणिमात्र माझ्याजवळ येऊन व स्वतःजवळ असलेलें पाप मला देऊन पवित्र होत्साते जातात; व सर्वांचीं पापें माझ्यामध्यें येऊन मिळतात, त्यामुळें मला फार त्रास होतो; तेव्हां माझ्याजवळ असणारीं पातकें कशीं नष्ट होतील, तें सांगा. असें गौतमीचें भाषण ऐकून गौतमानें शंकराचें ध्यान केलें. तत्काळ शंकर गौतमाजवळ येऊन गौतमास म्हणतात; हे गौतम! द्वारकेंत गोमती नांवाची नदी आहे, ती गौतमीच्या पापाचें क्षालन करण्यास समर्थ आहे. असें म्हणतांच सर्व देव व ऋषि गौतमीसह गोमती नदींत स्नान करून कृतार्थ झाले. तात्पर्य; द्वारका हें क्षेत्र सर्व क्षेत्रांत श्रेष्ठ आहे; व गोमती नदी सर्व नद्यांत श्रेष्ठ आहे.

## अध्याय ३० वा.

—:०:—

### द्वारकागमन.

नंतर नारदादि ऋषि द्वारकेंत गेले; व त्यांनीं तेथें मोठा उत्सव केला. द्वारकेंत गेल्यावर स्नान करून वैष्णवांना भोजन घातलें; व श्रीकृष्णरुक्मिणीची पूजा केली. द्वारकेंत हिंडतांना पायांत जोडे, व्हाणा, बूट वगैरे पादुका घालूं नयेत. तेथें विष्णुसहस्रनामाचा पाठ करून मुक्त व्हावें.

## अध्याय ३१ वा.

---:o:---

### द्वारवतीदर्शनमाहात्म्य.

द्वारकानगरी म्हणजे भूलोकांतील वैकुंठपुरी आहे. द्वारकेंत सर्व तीर्थें, क्षेत्रें, गोमत्यादि नद्या ह्या ठिकाणीं येऊन राहतात. ह्या ठिकाणीं येऊन व गोमतीनदींत स्नान करून श्रीकृष्णाची व रुक्मिणीची पूजा करावी.

---

## अध्याय ३२ वा.

---:o:---

### वैष्णवकृतद्वारकावर्णन.

एकदा नारदानें द्वारकेंत येऊन द्वारकेचें पुष्कळ वर्णन केलें. तें ऐकून द्वारका नारदाला ह्मणते कीं, हे नारदा, तूं केलेलें वर्णन ऐकून मला फार आनंद झाला आहे, वर माग. असें ह्मणताच नारद म्हणतात; हे द्वारके! माझा नित्य तुझे ठिकाणीं वास असावा; व तुझा आणि श्रीकृष्णचरणाचा कधींहि विरह नसावा, असा वर दे. असा वर मागताच द्वारकेनें त्याप्रमाणें श्रीनारदाला वर दिला. त्यावेळीं नारद, सनत्कुमार वगैरे वैष्णवहि तेथें एकत्र जमून द्वारकेचें व श्रीकृष्णाचें वर्णन करूं लागले; व सर्वांनीं श्रीकृष्णाची पूजा केली.

---

## अध्याय ३३ वा.

---

### द्वारकेंत सर्वतीर्थांचा निवास.

द्वारकेंत भागीरथी, यमुना, सरस्वती, सरयू, गंडकी, गोमती, मंदाकिनी, भागीरथी, नर्मदा, शिप्रा, सरस्वती, चक्षुर्भद्रा, पयोष्णी, तपती, विदर्भा, पयस्विनी, गोदावरी, भीमा, कृष्णा, कावेरी व सात समुद्र; काशी, उज्जयिनी, कान्ची, मथुरा, माया, अयोध्या, कुरुक्षेत्र, हरिद्वार, शिवक्षेत्रें, पुरुषोत्तमक्षेत्रें, भृगुक्षेत्र, प्रभास, श्रीरंग, लोहदंड, नारसिंहक्षेत्र, कोकामुख क्षेत्र, मेरुपर्वत, कैलासपर्वत, हिमालयपर्वत, श्रीशैलपर्वत, महेंद्र, ऋषभ, व दुसरेहि अनेक लोक ह्या द्वारकेंत राहतात. ज्या वेळीं कन्याराशीवर गुरु येतो, त्या वेळीं द्वारकेचें दर्शन घेऊन, श्रीकृष्णरुक्मिणीचें पूजन, व गोमतीसागरसंगमावर स्नान करावें.

---

## अध्याय ३४ वा.

### द्वारकायात्रा.

प्रल्हाद म्हणतात; ऋषीहो ! काशींत एक संन्यासी राहत असे; व तो अश्वमेधतीर्थाचे काठीं भागीरथीच्या [illegible] करीत असतां तेथें एक सुंदर स्त्री नग्न होऊन स्नान करूं लागली. तिला पाहून तो कामपीडित झाला; व तत्काळ तो तिच्याबरोबर तिच्या घरीं जाऊन तिच्याशीं रममाण झाला. नंतर त्या संन्याशानें तिच्या पोषणाकरितां अन्यायाच्या मार्गीं पुष्कळ द्रव्यहि मिळविलें. चौर्यादि क्रूरकर्मांत तो प्रवृत्त होऊन उद्दामपणा करूं लागला. अशा रीतीनें काल क्रमित असतां त्याच स्त्रीच्या घरीं तो मृत झाला; परंतु काशीक्षेत्रीं मरण आल्यामुळें इतका पापी असतांही तो नरकांत पडला नाहीं; परंतु काशीक्षेत्रीं केलेलें पाप वज्रलेप होतें; म्हणजे कधींहि नाश पावत नाहीं, त्या नियमाला अनुसरून त्याला पूर्वपापकर्मांच्या योगें लांडगा, वाघ, सर्प, कुत्रा, कोल्हा, डुक्कर वगैरे पशुयोनींत जन्म घ्यावे लागले. शेवटीं त्याला जन्म राक्षसाचा प्राप्त झाला. नंतर त्याच्या जन्मीं तो राक्षस झाला. तो राक्षस बिंदुसरोवरावर हिंडत असतां द्वारकादर्शन घेऊन कोणी यात्रेकरू त्या राक्षसाच्या हातीं लागला. [illegible] त्या यात्रेकरूला [illegible] पूर्वीचें [illegible] काशी-क्षेत्रांत केलेलें पूर्वीचें सर्व [illegible] आठवून [illegible] होऊन तो राक्षस यात्रेकरूची स्तुति करूं लागला. नंतर यात्रेकरूनें राक्षसाजवळ द्वारकामाहात्म्य वर्णिलें असतां-तो राक्षस द्वारकेंत जाऊन श्रीकृष्णरुक्मिणींचें दर्शन घेऊन मुक्त झाला.

---

## अध्याय ३५ वा.

### द्वारकानाममाहात्म्य.

हें क्षेत्र [illegible] [illegible] ओतप्रोत भरलें आहे. द्वारकेंत राहणारे सर्व लोक देवाप्रमाणें चतुर्भुज दिसतात. द्वारकेंत श्रीकृष्णनामांकित जी माती मिळते ती माती इतर ठिकाणीं मिळणें कठीण आहे. ज्या दिवशीं गुरु सिंहराशीला येतो, त्या दिवशीं जर गोमतीसागरसंगमावर स्नान केलें, तर गोदावरीस्नानाच्या बारा पटीनें [illegible]क फळ प्राप्त होतें.

---

# अध्याय ३६ वा.

—:o:—

## द्वारकादर्शनफल.

जे कोणी चक्रतीर्थांत जाऊन स्नान करितात त्यांस पुनर्जन्म प्राप्त होत नाहीं. वैशाख शुद्ध द्वादशीच्या दिवशीं येणारी जी त्रिस्पृशा द्वादशी त्या दिवशीं द्वारकेचें दर्शन करणें लाभदायक आहे. रुक्मिणी, सत्यभामा, मित्रविंदा, जांबवती, कालिंदी, भद्रा, नाग्नजिती व लक्ष्मणा ह्या श्रीकृष्णाच्या आठ स्त्रियांचें पूजन केलें असतां उत्तम पुत्रलाभ होतो.

---

# अध्याय ३७ वा.

—:o:—

## चक्रांकितपाषाणमाहात्म्य.

प्रल्हाद म्हणतात कीं, [illegible] करील तरी तो कृष्णाला होईल. [illegible] दिवशीं एकादशी तिथी असून दुसरे दिवशीं द्वादशी तिथि असेल तर त्या द्वादशीला वंजुळी द्वादशी म्हणतात. जे कोणी वंजुळी द्वादशीच्या दिवशीं द्वारकेंत येऊन श्रीकृष्णाचें सान्निध्य जागरण करितात, त्यांस कोट्यवधि गाई दान दिल्याचें पुण्य लागतें. ज्या द्वारकेंतील पाषाणावर (दगडावर) एक चक्र आहे, त्यास सुदर्शन पाषाण असें नांव आहे. त्याच्या दर्शनानें मोक्षप्राप्ति होते. दोन चक्रांनीं युक्त पाषाणाला लक्ष्मीनारायण पाषाण म्हणतात, तीन चक्रांच्या पाषाणास अच्युत म्हणतात. अच्युतपाषाणाच्या पूजनानें ऐश्वर्यप्राप्ति होते. चार चक्रांनीं युक्त पाषाण जनार्दन नांवानें प्रसिद्ध आहे. पांच चक्रांच्या पाषाणाला वासुदेव म्हणतात, सहा चक्रांचा प्रद्युम्न, सात चक्रांचा पाषाण बलदेव नांवानें प्रसिद्ध आहे. आठ चक्रांचा पुरुषोत्तम. नव चक्रांकित पाषाण विष्णु नांवानें प्रसिद्ध आहे. दहा चक्रांकित पाषाणाला दशावतार म्हणतात. अकरा चक्रांच्या पाषाणाला अनिरुद्ध म्हणतात. बारा चक्रांच्या [illegible] म्हणतात; ह्यापेक्षां ज्या पाषाणावर अधिक चक्रें आहेत, त्यास अनंत म्हणतात. ह्या पाषाणांच्या दर्शनानें मोक्षप्राप्ति होते.

---

## अध्याय ३८ वा.

—:०:—

### द्वारकाश्रेष्ठत्ववर्णन.

द्वारका ही सर्व क्षेत्रांत श्रेष्ठ आहे. मथुरा, काशी, आवंती, माया, अयोध्या त्या सर्वांहून द्वारका श्रेष्ठ आहे. द्वारकेचें श्रद्धेनें व भक्तीनें दर्शन घेतलें असतां सर्व पापांचा नाश होतो.

---

## अध्यया ३९ वा.



### द्वादशीव्रतमाहात्म्य.

जया, विजया, जयंती, उन्मीलिनी, वंजुली व त्रिस्पृशा ह्या सहाप्रकारच्या द्वादशा फारच पुण्यफल देणाऱ्या आहेत. त्या दिवशीं श्रीकृष्णपूजन व रात्रीं जागरण करावें; त्या योगानें मनुष्य विष्णुरूप होतो. याप्रमाणें प्रल्हादानें सर्व ऋषींना द्वारकामाहात्म्य सांगितलें, हें माहात्म्य नित्य पठण करावें.

---

## अध्याय ४० वा.



### अन्नदातृप्रशंसा.

काळ्या तुळशीच्या पानांनीं जे विष्णूची पूजा करितात ते सप्त लोकांत जाऊन सप्तद्वीपवती पृथ्वीचें राज्य करितात. श्रीकृष्णाच्या नामस्मरणानें पूर्वींच्या सात व पुढील चौदा मिळून एकवीस कुळांचा उद्धार होतो. जे कोणी द्वारकेंत येऊन संन्याशांना भोजन घालतात, त्यांस प्रत्येक घासामागें शंभर यज्ञ केल्याचें पुण्य लागतें. संन्याशांना अन्न वस्त्र देणारांना हजारों गयाश्राद्धांचें फळ मिळतें. द्वारकेंत जरी एकाद्या भिक्षुकाला भोजन घातलें तरी हजारों ब्राह्मणांना गयाक्षेत्रीं भोजन घातल्याचें फळ मिळेतें.

---

## अध्याय ४१ वा.

### श्राद्धमाहात्म्य.

प्रल्हाद म्हणतो; ऋषिहो ! जे गोमती नदीचे काठीं श्राद्धकर्म करितात ते पुरुष धन्य होत. जे केवडा व तुळशीपत्र यांनीं विष्णूची पूजा करितात, त्यांस पुनर्जन्मादि दुःखें प्राप्त होत नाहींत; व ते देवत्वाला पावतात. जे मृत प्राणी नेहमीं श्वेतद्वीपांत राहतात, ते सर्व प्राणी व तसेच अग्निष्वात्त, बर्हिषद, आज्यप, सोमप, आणि एकवीस पितृगण हे द्वारकेंत येऊन नेहमीं राहतात. वैशाख शुक्ल द्वादशीच्या दिवशीं, किंवा कार्तिक शुक्ल द्वादशीच्या दिवशीं अथवा चंद्रग्रहण, सूर्यग्रहण, वगैरे दुसऱ्याहि पुण्य दिवशीं ह्या द्वारकेंत येऊन गोमतीसागरसंगमावर स्नान, श्रीकृष्णरुक्मिणीपूजन, व गोमतीसंगमाचें काठीं श्राद्धविधि करतात, त्यांच्या पितरांची अक्षय्य तृप्ति होऊन ते पितरांसह विष्णुलोकीं जातात.

## अध्याय ४२ वा.

### द्वारकामाहात्म्यफलश्रुति.

प्रल्हाद म्हणतात; ऋषीहो ! जे कोणी येथें वैशाखी पौर्णिमेस अगर कार्तिकी पूर्णिमेस वृषोत्सर्ग ( बैलाचें दान ) पितरांना उद्देशून करितात, त्यांचे पितर पिशाचादि कुयोनींतून मुक्त होतात. ब्रह्महत्या, मद्यपान, चोरी, परस्त्रीगमन हीं महापातकें करणारा मनुष्य गोमतीस्नानानें व श्रीकृष्णदर्शनानें निष्पाप होऊन मुक्तीला जातो. ज्यांनीं रुक्मिणीदर्शन घेऊन द्वारकेला प्रदक्षिणा घातली, त्यास ब्रह्मांडाला प्रदक्षिणा घातल्याचें फळ मिळेल. द्वादशीच्या दिवशीं जे हे द्वारकामाहात्म्य श्रीकृष्णासंनिध पठण करितात, ते विमानांत देवांप्रमाणें बसून त्रैलोक्यांत संचार करून आणि अप्सरादिकांसह अनेक स्वर्गीय भोग्य पदार्थांचा उपभोग घेऊन विष्णुलोकीं जातात. हें माहात्म्य दुःखनाशक असून संपत्ति देणारें आहे. जो ह्याचें पठण करील त्यास सहा महिन्याच्या आंत पुत्रप्राप्ति होऊन संपत्ति व मुक्ति प्राप्त होईल.

## अध्याय ४३ वा.

### बलिकृतद्वारकायात्रा.

प्रल्हाद ह्मणतात; ऋषिहो ! सावित्री, पार्वती, दुर्गा व सरस्वती यांचें तुळशीपत्रांनीं पूजन केलें असतां सर्व इच्छा पूर्ण होतात. तुळशीपत्रांनीं विष्णूची पूजा

केली असतां त्यास त्रैलोक्यांतील देवतांचें पूजन केल्याचें फळ मिळतें. श्राद्धाचे-वेळीं पिंडावर जर तुळशीकाष्ठ व चंदनकाष्ठें वाहिलीं, तर शंभर गयाश्राद्धचें त्यास फळ प्राप्त होईल सूत ह्मणतात; शौनकादि ऋषिहो! ह्याप्रमाणें प्रल्हादानें सांगितलेलें द्वारकामाहात्म्य श्रवण करून सर्व ऋषींना मोठा आनंद झाला. नंतर बलिराजा सर्व ऋषींसह द्वारकेंत येऊन व गोमतीसंगमांत स्नान करून श्रीकृष्णदर्शनानें कृतार्थ झाला. व ऋषि आपआपल्या स्थानीं निघून गेले; व बलिहि पाताळीं गेला.

## अध्याय ४४ वा.

—:०:—

### उपसंहार.

सूत ह्मणतात; शौनकादि ऋषि हो! हें स्कंदपुराण स्कंद ह्मणजे शिवपुत्र जो कार्तिकस्वामी यानें ब्रह्मपुत्र जो भृगु त्याला प्रथम सांगितलें. भृगूनें अंगिरा ऋषीला, अंगिरानें च्यवन ऋषीला, च्यवनानें ऋचीक ऋषीला सांगितलें, व त्याच क्रमाक्रमानें ह्या स्कंदपुराणाचा सर्वत्र प्रसार झाला. हें स्कंदपुराण सात खंडांनीं युक्त आहे. ह्याच्या श्रवणानें मनुष्यास अनंतपुण्याची प्राप्ति होते. जे कोणी हें स्कंदपुराण ब्राह्मणाला दान करितात, ते जितकीं अक्षरें स्कंदपुराणांत आहेत तितकीं वर्षें स्वर्गांत राहतात. पुत्राची इच्छा धरून जर हें पुराण पठण केलें तर त्यास पुत्रप्राप्ति होईल, धनाची इच्छा करणाराला धनप्राप्ति, पतीची इच्छा करणाऱ्या स्त्रीला पतिप्राप्ति, तात्पर्य, ज्याची ज्याची जी जी इच्छा असेल ती ती इच्छा स्कंदपुराणाच्या पठणानें पूर्ण होईल. एक अध्याय, किंवा एक श्लोक अथवा अर्धा श्लोक जरी पठण केला तरी त्याचोगें विष्णुलोकाची प्राप्ति होईल. व्यास म्हणतात; ऋषिहो! ह्याप्रमाणें शौनकादि ऋषींना सूतानें स्कंदपुराण सांगितलें असतां शौनकादि ऋषि सूताला म्हणतात; हे सूत! आपण सांगितलेलें हें पुराण ऐकून आह्मी कृतार्थ झालों आहों. आतां आह्मी तुह्मांस आशीर्वाद देतों कीं, हे सूत! तूं दीर्घायु हो; व सुखी हो. असा आशीर्वाद दिल्यावर सूत स्वस्थानाला निघून गेले; व शौनकादि ऋषि आपल्या यज्ञादि कर्मांत व्यग्र झाले.

॥ द्वारकामाहात्म्य समाप्त ॥ ४ ॥

॥ प्रभासखंड समाप्त ॥ ७ ॥

॥ स्कन्दपुराण समाप्त. ॥